# प्रस्तावना

'माझी पृथ्वी प्रदक्षिणा' हे लहानसे पुस्तक मराठी वाचकांना मी आज सादर करीत आहे. हे सादर करताना मला आनंद होणे साहाजीक असले तरी या आनंदावर भीतीची छाया पसरलेली आहे. आणि याचे कारणहि उघडच आहे कीं, ही माझी 'कुमारी (Maiden) कृति' आहे.

या पुस्तकांत वर्णिलेला असंख्य मैलांचा प्रदीर्घ प्रवास संपवून सुखरुपपणे मी जेव्हां स्वगृही परत आलो तेव्हां अशा या प्रवासाची हकीकत ऐकायला मिळावी म्हणून मला भेटेल ती ओळखीची व्यक्ती तशी इच्छा प्रगट करूं लागली. एकतर अशा प्रत्येकाला येवढ्या मोठ्या प्रवासाची हकीकत सर्वच्या सर्व सांगणे अशक्य आणि त्यांतून मला 'एक हात लाकूड व सात हात झिलपी' अशा थाटानें अघळपघळ गप्पा मारण्याचा मुळांतच कंटाळा! बरं, प्रवासांतील गमती व अनुभव तर स्वाभाविकच इतके विविध व श्राव्य की त्यांचा खरा आनंद दुसऱ्याला सांगितल्याशिवाय स्वतःलाहि लुटता येत नाही. अशा परिस्थीतींत त्याचे संगतवार टाचण करून ते जाहीर रीतीनें छापून प्रसिद्ध करणेंच केव्हांहि इष्ट ठरेल !

तसेच मी केले. गेल्या जवळ जवळ वर्षभर 'महाराष्ट्रा'च्या कृपेनें चोवीस लेखांत ते खंडशः लिहून प्रसिद्ध केले. भिन्न-

भिन्न रूचीच्या अनेक वाचकांनी ते वेळोवेळी वाचून माझें अभिनंदन केले व ते पुस्तक रुपानें प्रसिद्ध करण्याचा आग्र-हाचा सल्ला दिला. अशा रितीने या 'लेखकू' च्या क्षेत्रांत जें एक छोटेसे स्थान मला आज प्राप्त होऊ पाहत आहे त्याचे सारे श्रेय 'महाराष्ट्रा'च्या सुलभ सहकार्याला व वाचक मित्रांच्या प्रेमळ प्रोत्साहनालाच दिले पाहीजे.

प्रवास ही सानथोरांच्या मनींची एक मोठीच गोष्ट आहे. लहान मुलांना तर प्रवास म्हटला कीं आनंदाचे भरते येते व त्यांत अनुभवाला येणाऱ्या गमतीजमतीच्या केवळ कल्पनेनेंच तशा त्या प्रवासाला निघण्यापूर्वींच गुदगुदल्या व्हायला लागून त्यांच्या अगावर रोमांच उभे रहातात.

माझ्या बालपणी मला तर अतिशय त्रासाचे खाचर-बैलाचेच प्रवास विशेष करावे लागत, पण पुढें जेंव्हां आग-गाड्यांचा प्रसार वाढूं लागला तेंव्हां पहिल्याच एका छोट्याशा प्रवासांत त्याकाळीं आम्ही वापरीत असलेली जरीची टोपी औत्सुक्यानें खिडकीतून बाहेर पहाता पहाता भुरकन कशी उडून गेली आणि त्या नुकसानीं प्रीत्यर्थ खाव्या लागलेल्या खरपूस माराची आठवण सदैव ताजीच राहीली आहे.

आज अतिप्रगल्भ असा विज्ञानाच्या विकासाचा काळ आहे. प्रवासाच्या विविध व अकल्पित अशा सोयी तर झाल्याच आहेत. पण घरबसल्या आरामखुर्चीवर प ून उभ्या जगांतील पाहिजे ते दृष्य 'जणूं ते पहाणाराच्या समोर प्रत्यक्ष उभे आहे', असे पाहाता येते. मग निव्वळ शाब्दिक वर्णनानें मी असे काय चित्र आपल्या मनःचक्षूसमोर उभे करणार आहे कीं हे माझें लिखाण आपल्याला वाचावेसे वाटवे ?

याचे उत्तर देण्याला वाचकच समर्थ असतात !

आपल्या भोंवतालचे वातावरण नित्याच्या परिचयानें कुंद होत जाते व त्यांतून अल्पकाळ कां होईना पण थोडेसे बाहेर पडून नव्या परिस्थीतीचा अनुभव व उपभोग घ्यावा असे साहजीकपणें प्रत्येकाला वाटते. म्हणून प्रवास, मग तो कोणत्याहि उद्देशानें केलेला असो वरील हेतू साध्य झाल्याशिवाय मात्र रहत नाही हे खास ! प्रत्येकाच्या भोवतालची परीस्थिती व त्यांचा मनावर होणारा परीणाम मात्र एक साच्याचा असूच शकत नाही; म्हणून तशा त्या बदलत्या वातावरणाचा परीणाम व त्याची अनुभूती यांतहि महदतर पडते.

प्रवास हा रूचीपालट म्हणून जसा प्रीय मानता येतो तसाच प्रवासवर्णन हें अनुभूतीच्या वैचित्र्यानें भरलेले असते आणि त्यांत स्वभावतःच लेखकाचे व्यक्तीमत्व उतरलेले असते.

या दृष्टींनें ही माझी अल्प कृति आपण वाचून काढलीत तर त्यांत विखुरलेले माझे भलेबुरे व्यक्तिमत्व आपल्या चोखंदळ नजरेत भरल्याशिवाय राहणार नाही व या लिखाणाचें मूल्यमापनहि आपोआपच होईल.

शेवटी एका गोष्टीबद्दल क्षमा मागणें आवश्यक आहे. आणि ती म्हणजे छपाईत असलेल्या अनेक व अक्षम्य चुकां. अशा या चुकांबद्दल उभयपक्षी व्यर्थ कारणमीमांसा करीत बसण्यापेक्षा वाचकांनी उदार मनाने क्षमा करावी हीच प्रार्थना.

नागपूर,
ता. १ सप्टेंबर १९५५

**गोपाळ जयराम पाठक**

# माझ्या पृथ्वी प्रदक्षिणेच्या जमाखर्चाचा तक्ता

## — जमा —

रु. ५०००–०–० भारत सरकारकडून मिळालेली ग्रॅन्ट.

रु. १०००–०–० मध्यप्रदेश सरकारकडून मिळालेली ग्रॅन्ट.

रु. १००–०–० म. प्र. राज्यपाल, माननीय श्री. पट्टाभी सीतारामय्या, यांचेकडून आलेली देणगी.

रु. १०१–०–० श्री. इ. आर. नायडू, मालक आर. आय्. वर्क्स, यांचेकडून आलेली देणगी.

रु. २००–०–० नागपूर युनिव्हर्सिटीकडून आलेली देणगी.

रु. २५०–०–० अन्नामलाई युनिव्हर्सिटीकडून आलेली देणगी.

रु. ५०–०–० शेठ श्रीराम दुर्गाप्रसाद, तुमसर, यांचेकडून आलेली देणगी.

रु. ५०–०–० श्री. जनरल करिआप्पा, आस्ट्रेलीयातील भारतीय हायकमीश्नर यांचेकडून देणगी.

रु. ५१–०–० श्री. वा. रा. पुराणीक अ. भा शा. शि. महामंडळाचे अध्यक्ष, यांचेकडून देणगी.

रु. १०१–०–० बिहार युनिव्हर्सिटीकडून आलेली देणगी.

रु. ५००–०–० पाठक ब्रदर्स, फोटोग्राफर्स यांचेकडून मिळालेली देणगी.

रु. ३५००–०–० पाठक ब्रदर्स, फोटोग्राफर्स यांचेकडून घेतलेले कर्ज.

---

एकूण रु. १०,९०३–८–०

# माझ्या पृथ्वी प्रदक्षिणेच्या जमा खर्चाचा तक्ता

## – खर्च –

| | |
|---|---|
| रु. ६१७५–०––० | मुबई ते न्यूयॉर्क व सॅनफ्रांसिस्को ते मुबई हवाई प्रवासाच्या तिकीटाचा खर्च. |
| रु. ५२५–१४–० | न्यूयार्क ते सॅनफ्रॅसिस्को या अमेरीकेतील अतर्गत प्रवासाचा खर्च. |
| रु. ४२–१––० | केबल व तारेच्या पत्रव्यवहाराचा खर्च. |
| रु. ३–११–० | डॉलर परमिट प्रित्यर्थ रिझर्व्ह बॅकेल दिलेली रक्कम. |
| रु. ४१५६–१४–० | प्रवासाच्या तयारीप्रित्यर्थ व प्रवासांत झालेला इतर सर्व खर्च. |

एकूण . रु. १०,९०३–८–०

मे. महेश्वर गद्रे आणि कंपनी, चार्टर्ड अकौन्टन्टस् व ऑडिटर्स, नागपूर, यांनी वरील हिशेब तपासून सर्टीफिकेट दिले आहे.

## पृथ्वीगोलाच्या ऐंशीं दिवसांच्या संपूर्ण सफरीची

# —दैनंदिनि—

मुंबई दिनांक ४ एप्रिल ते मुंबई दिनांक २२ जून (१९५४)

**एप्रिल**

रविवार दि. ४ – रात्रौं ११–३०–मुंबईहून प्रयाण–विमान
(एअर इंडिया एअर वेज.)

सोमवार दि. ५ –सकाळी ५ –बाहारीन (पर्शियन गल्फ)
मुक्काम ३० मिनिटें

,, ,, – ,, ९–१०–कैरो (इजिप्त) मु. ६० मिनिटें

,, ,, –सायंकाळी५ –जिनेवा (स्वित्झरलंड) ३० मिनिटें

,, ,, – ,, ७–३०–डसोलडरोफ (जर्मनी) ३०मिनिटें

,, ,, –रात्रौ १०–लंडन मुक्काम दोन दिवस.

बुधवार दि.७– – ,, ८–३०–लंडनहून प्रयाण–विमान.
(पॅन अमेरिकन एअरवेज)

,, ,, – ,, १२–शानॉन (आयर्लंड) ३० मिनिटें

गुरुवार दि. ८– –सकाळ ९ हिंदी वेळ–गॅंडर–(न्युफाउंडलंड)
६ ग्रिनविच वेळ ७५ मिनिटें
४॥ न्युयॉर्क वेळ

,, ,, – ,, ७ न्युयॉर्क वेळ बोस्टन (अमेरिका) २०मिनिटें

,, ,, – दुपार १२ ,, न्युयॉर्कला पोचलो–तीन दिवस मु.

रविवार दि. ११ – सकाळ ९–३० न्युयार्कहून प्रयाण–व्हाइट माऊंटन.
एक्स्प्रेस

,, ,, – दुपार १– नार्थ हॅपटनला पोचलो–पांच दि. मु.
आंतर्राष्ट्रीय शा. शि. परिषदेचे अधिवेशन.

शुकवार दि. १६ –सकाळ ९–३० नार्थ हॅंपटनहुन प्रयाण–बस.
" " –दुपार १२ सार्जंट कॅंपला पोंचलो–मु. दीड दिवस
शनिवार दि. १७ –रात्रौ ११–३०सार्जंट कॅंपहून प्रयाण–बस.
रविवार दि. १८ –सकाळी २ बोस्टनला पोचलो–विश्रांति पांच तास
" " – " ७–३० बोस्टनहून प्रयाण–रेल्वे.
" " –दुपार १२ न्मुयॉर्कला पोचलो–मु. दहा दिवस.
वुधवार दि. २८ –सकाळ ८–१५ न्युयॉकहून प्रयाण ग्रेहाउंड बस.
" " –सायंकाळ ८ रॉचेस्टरला पोचलो–मु. अडीच दिवस.

**मे**

शनिवार दि. १ मे–सकाळ ९–३० रॉचेस्टरहुन प्रयाण–बस.
" " –सकाळ १०–३० नायगाराला पोंचलो–मु. १२ तास,
" " –रात्रौ १०–३० नायगाराहून प्रयाण–बस.
" " – " ११–३० रॉचेस्टरला पोचलो–मु. १२ तास.
रविवार दि. २ –दुपार १२–१० रॉचेस्टरहून प्रयाण–ग्रेहाउंड बस.
सोमवार दि. ३ –सकाळ ७–३० शिकॅगोला पोचलो–मु. पांच दिवस.
शनिवार दि. ८ –दुपार ४–३० शिकॅगोहून प्रयाण–रेल्वे
कॅलिफोर्निया झायफर.
रविवार दि. ९ –रात्रौ १०–२० साल्टलेक सिटीला पोचलो–मु.३दि.
बुधवार दि. १२ – १०–४५ साल्टलेक सिटीहून प्रयाण–ग्रेहाउंडबस
गुरुवार दि. १३–सायं. ६–१५ लॉस ऐंजेलीसला (हॉलिवूड) पोचलो
मु. सहा दिवस.
बुधवार दि. १९–सकाळ ६–१५ लॉसऐंजेंलिसहून प्रयाण–रेल्वे.
" " –दुपार २ फ्रेस्नोला पोचलो–मु. ११ तास.
गुरुवार दि. २०–सकाळी १–१५ फ्रेस्नोहून प्रयाण–रेल्वे.
" " – " ८ सॅनफ्रॅसिस्कोला पोचलो–मु. पांच दि.
मंगळ. दि. २५ –दुपारी ११–३० सॅनफ्रॅसिस्कोहूत प्रयाण–
विमान (पॅन अमेरिकन एअरवेज)
" " –सायं. ८–३० होनोलोलुला (हवाई बेटे) पोचलो–
(६–३० हवाई टाईम) मु. दोन दिवस.

गुरुवार दि.२७—सायं. ७—३० हवाईतून प्रयाण—विमान (पॅन अमेरिकन)

शुक्र. दि. २८ | स, ४—१५ वेक बेटावर मुक्काम—१ तास.
शनि. दि. २९ | २—४५ (टोकिओ टाइम)

टीपः—येथें आम्ही काल्पनीक आंतरर्ष्ट्रीय तिथीरेषा पश्चिमेकडून ओलाडली, त्या प्रित्यर्थ आयुष्यात एका दिवसाचा घाटा सोसावा लागला.

शनि. दि. २९ सकाळ ८ टो. वेळा—टोकिओंला (जपान) पोचलो—
,, २ हवाई वेळा मु. नऊ दि.

**जून**

सोम. दि, ७ ,, २ टोकिओहून प्रयाण—विमान (पॅन अमेरिकन)
,, ,, ,, — १० हाँगकागला (चीन) पोचलो—मु. तीन दिवस
गुरु. दि. १० —सायं. ५ हाँगकांगहुन प्रयाण—
,, ,, — रात्रौ ८—४० मॅनिलाला (फिलिपाईन्स) पोचलो
मु. साडेतीन दिवस.
सोम. दि, १४ —सकाळी ९ मॅनिलाहून प्रयाण—विमान (पॅन अमेरिकन)
,, ,, —दुपारी २-१५ सायगांव विमानतळ मु. ४५ मि. ,,
,, ,, —साय, ६ सिंगापूरला पोचलो—मु. दीड दिवस
बुध. दि. १६ —दुपार १२-३० सिंगापूरहुन (थायलॅंड) प्रयाण
विमान (इडोनेशियन एअरवेज)
,, ,, — ,, ४—३० बॅंगकॉकला पोचले— मु. तीन दिवस
शनि. दि. १९ — ,, ३—३० बॅंगकॉकहुन प्रयाण—विमान (एअर इंडिया)
,, ,, —सायं. ५—३० रंगूनला पोचलो—मुकाम दीड दिवस.
सोम. दि. २१ —दुपार १२—४५ रंगुनहून प्रयाण—विमान (एअर इडिया.)
,, ,, — ,, २ कलकत्यास पोचलो— ,,
,, ,, — रात्रो ११ कलकत्याहुन प्रयाण— ,,
मंगळ. दि.२२ —सकाळी ५-३० मुबईला परत.

# -: अनुक्रमणिका :-

---

टीपः—१६ व १७ हे खंड चुकीचे छापल्या गेल्यामुळें कंसातील दुरुस्ती प्रमाणें वाचावे.

याशिवाय प्रस्तावना, पृथ्वीगोलाच्या ऐंशी दिवसांच्या संपूर्ण सफरीची 'दैनंदिनि' व माझ्या पृथ्वी प्रदक्षिणेच्या प्रवासाचा जमा-खर्चाचा तक्ता सुरूवातीलाच घातला आहे.

# चित्रसूची



सुरूवातीला 'माझी आई चंद्रभागाबाई' व शेवटी या पृथ्वी प्रदक्षिणेच्या प्रवासाचा माहीतीपर्ण नकाशा घातलेला आहे.

# माझी आई चंद्रभागाबाई



"माझ्या मातोश्रीने माझ्या बालपणीं संपादन केलेल्या पृथ्वी प्रदक्षिणेच्या पुण्याचे फळ, तिला स्वर्गप्राप्तींत कितपत होणार असेल ते होवो, पण मला प्रत्यक्ष पृथ्वी प्रदक्षिणा घडविण्यांत, तिची तीच पुण्यमय भावना आज माझ्या कामी पडली, असा माझा विश्वास आहे."

फोटो-मधुकर हरीभाऊ पाठक ] [ पृष्ठ क्र.–५

# पूर्वतयारी

## प्रथम खंड

मुंबईहून गेल्या एप्रिल ४ ला मी पृथ्विपर्यटनाला निघालो आणि जूनच्या २२ तारखेला ती संपवून मुंबईला सुखरूप परत आलो. या ऐंशी दिवसाच्या प्रदक्षिणेंत इजिप्त, युरोप, अमेरिका, हवाई बेटे, जपान, चायना, फिलिपाईन्स, मलाया, थायलंड, ब्रम्हदेश इत्यादि देशात फेरफटका करून मी हे चक्र पूर्ण केले. विमानानें हुकुमी प्रवास करण्याची सोय नसती तर अशा तऱ्हेचा प्रवास इतक्या अल्प अवधींत पार पाडणें शक्य झाले नसते.

महाभारतांत अश्वमेध यज्ञाचे महापुण्य सांगितले आहे. अश्वमेध यज्ञ विधिपूर्वक करणाऱ्या नरपुंगवाला स्वर्गप्राप्ति होते, अशी आपली ठाम समजूत आहे. पुराणकालीन राजेमहाराजे अश्वमेध करून स्वर्ग प्राप्तीचे पुण्य पदरी बांधून ठेवीत असत. जे पुण्य अश्वमेध यज्ञाचे तेच पुण्य पृथ्विप्रदक्षिणेचेहि सांगितले आहे. पण आज विमानाच्या शोधामुळे व त्याने प्राप्त करून दिलेल्या सोयीमुळें पृथ्विप्रदक्षिणा करणें जसे शक्य झाले आहे, तसे त्याकाळी कांही साधने असावीत असे दिसत नाहीं. तरीपण काही तांत्रिक साधनांनीं अशा प्रदक्षिणेचें पुण्यहि पदरांत पाडून घेतल्याच्या कथा पुराणांतरी नमूद आहेत.

त्रैलोक्याचे भ्रमण करणारे विनोदमूर्ति नारदमुनी एकदां फिरता फिरता कैलासांत येऊन दाखल झाले. चालता बोलता कळ लावणें हा त्यांचा धंदाच होता. म्हणून त्यांना आपण कळीचे नारद म्हणून ओळखतो.

पण त्याच्या या विनोदीवृत्तीचा कोणी राग करीत नसे. कारण हसतां हसतां त्यानी अनेक महत्वाच्या कामगिऱ्या पार पाडल्या आहेत. त्यामुळें ते जिथे जातील तिथें त्यांच्या आदरसत्कारांत कधीच कमतरता पडत नसे.

ते कैलासात आले तों कैलासनाथ शंकर एका टेकडीवर बसले होते व तुदिलतनू गणेशजी मोदक खाऊन तट्ट फुगल्यामुळें लोळत होते. कार्तिकस्वामी कांहीतरी उद्योगांत गर्क होते. कार्तीकस्वामीना त्या ढेरपोट्याच्या आळशीपणाचा राग आला व त्यांनी नारदाजवळ त्याची तक्रार केली. नारदांनी ओळखले की या सरळसोट ब्रह्मचाऱ्याला गजाननाच्या तल्लख बुद्धीची अजून ओळख झालेली दिसत नाही. त्यानी दोघांनाहि जवळ बोलावून सागितले की पृथ्वीला प्रदक्षिणा करून जो आधी परत येईल त्याला मी फार मोठे बक्षिस देईन. कार्तीकस्वामी क्षणाचाहि विलंब न करता आपल्या मयूरावर स्वार झाले व पृथ्वीपर्यटनाला निघाले. गणपती किलकिले डोळे करून हे सर्व पहात होते. कार्तीकस्वामी मागे न पाहतां तीरासारखे निघाले व पर्यटन पूर्ण करून परतले. त्याच्या मोरपंखाची दुरून फडफड कानी पडताच गजानन हळूच उठले व त्यांनी

यानि कानि च पापानि जन्मांतर कृतानि च ।
तानि तानि विनश्यंति प्रदक्षिण पदेपदे ।।

हा श्लोक म्हणत स्वत.भोवती तीन प्रदक्षिणा घातल्या व कार्तीकेयाच्या मयूराचे जमिनीला पाय लागण्यापूर्वी नारदाजवळ येऊन उभे राहिले. कार्तिकेयाचा विजयमद ओसंडत होता. ते मोरावरून उतरून नारदाजवळ आले व 'कां जिंकली की नाही पैज?' असे म्हणून गजाननाकडे कुत्सित बुद्धीनें पाहू लागले. पण नारदाचा निर्णय ऐकून त्यांची सारी घमेंड विरून गेली. नारदांनी सांगितले की पैज गजाननानें जिकली. कारण, "आत्मवत सर्वभूतानि" हे तत्व त्यानीं आत्मसात केलें आहे. आणि म्हणून ते स्वतः पृथ्वीच काय पण सर्वं कांहि तेच आहेत.

भारतात पृथ्वीप्रदक्षिणेचे महान पुण्य सांगितलें आहे. आणि म्हणून अशी प्रदक्षिणा करणें प्रत्यक्षांत जेव्हां अशक्य असें, तेव्हा पुण्य संपादनाच्या तीव्र इच्छेने मानवी मनाने अनेक कथा रचल्या व प्रथाहि पाडल्या.

माझ्या बालपणाची गोष्ट. आमचे वडील गोमातेचे कट्टर भक्त होते. त्यानी आपल्या पदरी एक सुन्दर गाय बाळगिली होती. तिची ते भक्तीभावाने सेवा करीत. एकदा ती गाय व्यायला आली. तिचे बाळतपण आमचे वडील फार प्रेमाने करीत होते. पृथ्वितलावर अवतरणाऱ्या त्या नवीन वत्साची पुढची दोन खुरे दृष्टीस पडताच आमच्या वडिलांच्या धावपळीला पारावार राहिला नाहीं. त्यांनी आमच्या मातोश्रीस लगबगीने स्नान करून येण्याची आज्ञा फर्माविली. आणि आमच्या मातोश्रीने तितक्याच भक्तीभावाने ओलेत्याने त्या गोवत्सास, त्या वत्साच्या पाऊलाचा पृथ्वीला स्पर्श होण्यापूर्वी, तीन प्रदक्षिणा घातल्या. भावना ही की, आपल्याला पृथ्वीप्रदक्षिणेचे पुण्य लाभावे!

मी पृथ्वीप्रदक्षिणा करून नुकताच परत आलो होतो आणि अधुनिक विज्ञानाच्या सहाय्याने हा सारा चमत्कार अवघ्या ऐंशी दिवसात पार पाडला होता.

नागपूर युनिव्हर्सिटीचे न्यायशास्त्राचे विद्वान प्राध्यापक श्री. कुरुंभट्टेशास्त्री याची सहज गांठ पडली. मी त्यांना विचारले, "शास्त्रीबोवा! मी केलेल्या या पृथ्वीप्रदक्षिणेचे मला काय पुण्य लाभणार आहे?" ते म्हणाले, "अहो फार मोठे पुण्य लाभणार आहे. पृथ्वीप्रदक्षिणेचे पुण्य म्हणजे 'अश्वमेध' यज्ञ केल्याचे पुण्य आहे. पुराणकाली मोठे मोठे सम्राटच अशा तऱ्हेचा याग पार पाडू शकत होते." मी म्हटले "ते सारे ठीक आहे; पण 'अश्वमेघ' यज्ञाचे काय पुण्य आहे ते तरी सांगा." त्यांचे उत्तर ऐकण्यास मी फार उतावीळ झालो होतो. ते म्हणाले, "अश्वमेघ यज्ञ काय किंवा पृथ्वीप्रदक्षिणा काय! दोन्हीचे पुण्य म्हणजे स्वर्गप्राप्ती." "अहाहा! शास्त्रीबोवा, मग मला स्वर्गप्राप्तीचा लाभ होणार तर!"—"अहो नक्कीच, आपल्याला शंका यायचं कारणच नाही."

प्रतिनिधीची अनुपस्थिती जगांतील राष्ट्रासमोर दिस देणें, भारताला अवमानित करणारे असल्यामुळे मला आपल्या राष्ट्राच्या इभ्रतीकरीता पुढे होणें भागच पडले.

"निश्चयाचे ऐसे बळ। तुका म्हणे तेची फळ" या न्यायाने—थोडे बहुत का होईना पण आर्थिक सहाय्यहि उपलब्ध झाले व मी तयारीला लागलो.

'दाम करी काम' अशी जरी परिस्थिति असली तरी प्रत्येक लक्ष्मीपुत्र उठला की केली पृथ्वीप्रदक्षिणा असें काही घडून येत नाही. विद्यार्थी, व्यापारी अगर राजकीय कामगिरीवर पाठविले जाणारे सरकारी कर्मचारी याची गोष्ट सोडली तर आंतर्राष्ट्रीय परिषदांतून प्रतिनिधित्व करण्याची एक महत्वाची कामगिरी स्वतंत्र भारतावर आलेली आहे. भारतासारख्या सस्कृतिसंपन्न देशाला तर ही कामगिरी नाजुक असून तितकीच महत्त्वाची आहे. पण इतर सर्व क्षेत्रामध्ये सरकारीरित्या भारताचे प्रतिनिधी जरी जात येत असले तरी 'शारीरिक शिक्षणा' सारख्या समाजविकासाच्या मूलभूत अंगाबाबत आपण असावे तितके जागरूक नाही,असे दुःखाने म्हणणें प्राप्त आहे.

परदेशगमनाची ही माझी तिसरी खेप. आणि यावेळी अमेरिकेसारख्या पृथ्वीच्या दुसऱ्या टोकाला जायचें, मग पूर्ण पृथ्वीप्रदक्षिणाच कां करू नये, असा विचार साहजीकच माझ्या मनांत डोकावला.

माझ्या मातोश्रीने माझ्या बालपणी संपादन केलेल्या पृथ्विप्रदक्षिणेच्या पुण्याचे फळ तीला स्वर्गप्राप्तीत कितपत होणार असेल ते होवो, पण मला प्रत्यक्ष पृथ्विप्रदक्षिणा घडविण्यांत, तिची तीच पुण्यमय भावना आज माझ्या कामी पडली, असा माझा विश्वास आहे.

हे सर्व होता होता मार्चची वीस तारीख उजाडली. ही अमेरिकेंतील परिषद एप्रिलच्या ११ तारखेपासून सुरू होणार होती. या उरलेल्या अवघ्या वीस दिवसांत, अमेरिकेसारख्या एका अति प्रगल्भ देशांतील अंतर्राष्ट्रीय परिषदेत भाग घेऊन पृथ्वीप्रदक्षिणा करून परत येण्याची, केवढी तरी प्रचंड तयारी मला आटोपावयाची होती !

पासपोर्ट मजजवळ होताच. त्यांत जगांतील उरलेले बहुतेक सारे देश समाविष्ट करून घेतले. कॉलऱ्याचे इंजेक्शन हात्याहप्त्याच्या मुदतीने घ्यावयाचे असते तेहि घेतले. इनकम टॅक्सचे सर्टीफिकेट तेहि जवळजवळ मिळालेच. पण अमेरिकन व्हिसा व डॉलर परमीट या दोन भानगडी पर्वतप्राय अडचणी निर्माण करतील याची मला कल्पना नव्हती. रिझर्व बँकेमार्फत अमेरिकेतील खर्चाकरीतां डॉलरचे परमीट मिळविणें भाग असते व असे परमीट मिळाल्याशिवाय अमेरिकेला पदस्पर्श करण्याचा परवाना (व्हिसा) मिळत नाही.

आज डॉलर परमीट सुखासुखी कधीच मिळत नाही. रिझर्व्ह बॅंक सतरा चौकशा करून मध्यवर्ती सरकारकडे लिहिते व मध्यवर्ती सरकारच्या फॉरेन अफेअर्सच्या खात्यामधून अधिक चौकशी होऊन रिझर्व्ह बॅंकेला तशी अनुज्ञा दिली जाते.

माझ्या अनेक पत्रांना रिझर्व्ह बँकेचे ठरावीक ठशाचे उत्तर येत असे की, आपली केस मध्यवर्ती सरकारच्या विचाराधीन आहे 'स्वत: मेल्याशिवाय स्वर्ग दिसत नाही' असे जे म्हणतात ते काही खोटें नाही. आणि मी तर स्वर्गप्राप्तीचें पुण्य संपादन करण्याचा चंग बांधला असल्यामुळे, बाकीची सारी कामे सारून गेलो मुबईला. खुद्द सरकारनेच ज्या कार्याला मदत केली आहे, त्या प्रित्यर्थ डॉलर परमीट नाही असे कसें होईल! जेव्हां हे सारे रिझर्व्ह बँकेत खुद्द जाऊन पटवून दिले आणि तारा करण्यात पैसे वेचले तेव्हां एकदाचे हे 'परमिट' हातात पडलें आणि अमेरिकन व्हिसा मिळविण्याचा मार्ग मोकळा झाला.

जी गत डॉलरची तीच व्हिसाची. पण प्रकार मात्र निराळा. चार तारखेच्या विमानांत मी जागा मिळवून ठेवली होती. पण व्हिसाशिवाय परदेश गमनाचे तिकिट कसें मिळणार! आज दोन तारीख उजाडली होती. मागच्या खेपेला अनेक देशाचे व्हिसा मी मिळविलें होते, पण अमेरिकेचा खाक्या काही औरच दिसला.

आपल्या सरकारी कामकाजांत रेड 'टेपिझम्ने' नागरिक त्रस्त होतो तर अमेरिकन कॉन्सुलेटमध्ये 'रेडरॅगिझमचे' भूत त्यांच्या मानगुटीवर बसलेले दिसते. मी स्वत: अमेरिकन कॉन्सल जनरलला भेटल्याशिवाय व्हिसा मिळणार नाही, असे जे मला कळविण्यांत आले होते, त्याचे इंगित आता माझ्या ध्यानांत आले.

डॉलर परमीट व एक लांबलचक अर्जाचा नमुना भरून मी त्याच्या कचेरीत दाखल झालो. तेथे प्रथम जेलच्या कैद्याप्रमाणे माझ्या दोन्ही हाताच्या दहाहि बोटांचे वेगवेगळया कागदावर ठसे घेण्यांत आले. दोन्ही आगठयांचे तर काळजीपूर्वक दाबून फिरवून पुन्हापुन्हा ठसे घेतल्या गेले. अशा तऱ्हेने सारे व्हिसाचे कागद तयार होताच मला कॉन्सल जनरल समोर पेश करण्यात आले. त्यानी माझेकडे दृष्टी रोखून सारे कागदपत्र नीट तपासले व मला चारदोन औपचारिक प्रश्न केले. नंतर मला सरळ उभे रहाण्यास सांगून उजवा हात वर करण्यास सांगितले. तो स्वत: त्याच पवित्र्यांत माझ्यासमोर उभा राहिला व गंभीरपणे उद्गारला, " अमेरिकेंत वावरण्याच्या या परवान्याचा आपण दुरुपयोग करणार नाही अशी मी आशा करतो."

येवढा प्रकार झाल्यानंतर त्याने तो व्हिसा (परवाना) व माझा पासपोर्ट माझ्या स्वाधीन केला व हस्तादोलन करून "आपली यात्रा सुखाची होवो, अमेरिकेतील लोकाकडून आपल्याला पूर्ण सहकार्य लाभेल," अशी सदिच्छा व्यक्त केली आणि मला निरोप दिला.

आतां फक्त एकच भीति उरली होती. ती ही की तिकीट खरेदी करावयास जावे आणि त्यानी चक्क सांगावे की फार उशीर झाला! इतका वेळ तुमची वाट पाहिली आणि वेटीग लिस्टमधल्या दुसऱ्या इसमानें भाडून तुमची जागा पटकाविली. पण सुदैवाने तसे कांहीच झाले नाही. मी, मुंबई ते मुबई, असे पूर्ण पृथ्वीप्रदक्षिणेंचे तिकिट खरेदी केले व उरलेल्या पैशाचें कांही पौड व कांहीं डॉलर असे 'ट्रॅव्हलर्स चेक' खरेदी करून बाकीच्या व्यवस्थेला लागलो. रात्री ११॥ ला विमान निघणार असल्यामुळें, तेवढा एक दिवस तरी मला मोकळा मिळाला.

बहुतेक प्रवास विमानानेंच करावयाचा असल्यामुळे (Travel light)'मोजके सामान' हे तत्व अंगिकारणें मला भागच होते. विमानातून प्रवास करणाऱ्या प्रवाश्याला फक्त चवेचाळीस पौन्ड वजनाचे सामान बरोबर नेता येते. वरच्या पौन्डागणिक जास्त सामानाला आव्वाचे सव्वा किंमत पडते. कमालीच्या काटकसरीवर माझ्या यशाची सारी भिस्त. मी फक्त एक बॅग घेतली, त्यांत अर्धा डझन शर्ट, एक गरम सूट, एक भारतीय पोषाख व इतर आवश्यक चिल्लर सामान भरून तयारी पूर्ण केली. शिवाय तेथें भरणाऱ्या प्रदर्शनात ठेवण्याकरितां भारतीय व्यायामकलेची कित्येक पुस्तके मी जमा केली होती, त्यांचा भार वाहणे मला प्राप्तच होते.

याशिवाय ओव्हरकोट, ब्रिफकेस व कॅमेरा या उपाधीहि बाळगणें अवश्य होते.

आज माझ्या प्रयाणाचा मुहुर्त होता. हा सुमुहुर्त साधण्याकरीता किती प्रचंड खटाटोप करावा लागला! मुहुर्त आणि ज्योतिष या गोष्टीवर माझा कधीच विश्वास बसला नाही. पण कुंडली पाहून एखाद्या प्रसिद्ध ज्योतिषानें ग्रहांची अनुकुलता वर्तवावी तसा हा योग जळून तर आला. दोन वेळा बोटीच्या तारखा हातच्या गेल्या होत्या. आणि आजचे हे विमान शेवटच्या घटकेपर्यन्त लाभेलच याची शाश्वति नव्हती.

एका मित्राची गोष्ट आठवते. हे मित्र महाशय कोणत्याहि कामाला मुहूर्ताशिवाय हात घालीत नसत. त्यांचा विश्वासच तसा जबरदस्त होता. (आत्मविश्वास नव्हे) ! त्याना पंजाबच्या मॅट्रिकला बसावयाचे होते. परीक्षा सुरू होण्याचा दिवस त्याच्या हातचा नव्हता. पण त्या परीक्षेत खात्रीने यश मिळावे म्हणून त्यानी धरून निघण्याचा चागला मुहूर्त पाहिला. तो आठ दिवस आगाऊ निघाला. मग त्यानी त्या मुहूर्तावर घर सोडून गांवाच्या बाहेर एका बागेंत आठ दिवस आपले प्रस्थान ठेविले. नंतर परीक्षेला गेले. पण—पण शास्त्र कोठे तरी थोडक्यानें चुकले व बिचारे नापास झाले. तरी त्यांचा मुहुर्तावरील विश्वास रतिभर ढळला नाही, यातच खरी मौज आहे.

चार एप्रिलला रविवार होता. रात्रौ ११॥ ला एअर इंडियाचे विमान सांताक्रूझ विमानतळावरून सुटणार होते. मित्र मंडळी निरोप देण्याकरितां जमली होती. एकाने सहज गोष्ट काढली,

" आज वर्षप्रतिपदेचा शुभ दिवस आहे. तुम्ही आपल्या कामगिरीकरिता मुहूर्त तर फार चांगला शोधून काढलात ! आपल्या कार्यात आपल्याला शंभर टक्के यश प्राप्त होणार याची खात्री बाळगा."

'शुभास्ते पंथानः " म्हणून सर्वांनी निरोप दिला आणि मी विमानांत चढलों.



" बाहेर पाहून पाहून तरी काय पहाणार ! " (पान १२)

# मुंबई ते न्यूयॉर्क

## खंड २ रा

"मन चिंती ते वैरी न चिंती," असे म्हणतात ते कांहि खोटे नाही विश्वसंचार करण्याच्या निश्चयानें मी विमानांत चढलो त्यावेळची, मनाची स्थिति मोठी विचित्र होती. कुठें विमानाची गती आणि कुठे मनाची गती. माझ्या अंतःचक्षूंसमोरून, त्या विमानाच्या पायऱ्या चढता चढता, किती नानाविध तरंग भराभर सरकत होते!

हे विमानाचे प्रचंड धूड! जमीनीपासून वर उंचच ऊंच उडणार! आणि कुठे नेणार आपल्याला! चैत्र शुद्ध प्रतिपदा ती! काळीकुट्ट अंधारी रात्रच! किति प्रयत्न केला हा विमानाचा प्रवास टाळण्याचा. पण तेच नशिबी आले. पण आता काय त्याचे! सुखाच्या जलद प्रवासाबरोबर दारुण अपघाताची भयानक दृष्येहि अधूनमधून डोकावीत होतीच. विमानाने जशी पृथ्वीप्रदक्षिणा माणसाच्या आटोक्यात आणून दिली, तशी विनासायास सरळ स्वर्गवासी होण्याची वाटहि सुगम करून दिली, हेहि तितकेच खरे!

मी विमानांत चढलो तो कांहिशा घाईनेच. मी विमानाचा प्रवास कधी केला नव्हता असे नाही. मग येवढी घाई कशाची सुटली होती मला! घाई येवढ्याचकरीता की, भारावलेल्या अंतःकरणानें इतके आप्त सुऱ्हद आपल्याला निरोप देण्याकरिता तासचे तास उभे आहेत, त्यांचे शेवटचे उडते दर्शन घडावे. आणि घाई केल्यासारखे विमानतळाच्या बाजूकडच्या खिडकीशेजारी, जागा तर मी पटकाविली.

बरोबर घेतलेल्या सामानाचे वजन चव्वेचाळीस पौन्डाचेवर भरू नये म्हणून, गरज नसताना अंगावर भाराभर कपडे घालून कित्येक तास मित्रमंडळीच्या गर्दीत मी वावरत होतो! अंगातून घामाच्या धारा वहात होत्या. त्यांतच कस्टम्स, डॉक्टरी तपासणी, पासपोर्टची पहाणी, अशा अनेक,

इधरजाव उधरजावच्या धरमधक्क्यानें, जीव गुदमरून गेला होता. शिवाय अंगिकारलेल्या जबाबदारीच्या कार्यांचा मनावर ताण. अशा परिस्थितीत मनोव्यापाराचे चक्र आगतिक झाले नाही तरच नवल.

अंगावरील कपड्यांचा भार शक्य तितका कमी करून, मी हुश्श करीत खुर्चीत बसलो. एका दृष्टीक्षेपांत त्या 'कॉन्स्टेलेशन' विमानाची आतून पहाणी करून टाकली. आता विमानातूनहि, पहिला व दुसरा वर्ग अशी, विभागणी झाली आहे. या विमानांत पहिल्या वर्गात अठरा व टुरिस्ट वर्गात चव्वतीस जागा होत्या. आणि सर्वच्या सर्व खचून भरल्या होत्या. आम्ही सर्व ठाकठीक बसतो न बसतो तों तेथील परिचारिकेने, प्रत्येकानें आपल्याला बैठकीच्या पट्ट्याने जखडून घेतले किंवा नाही, हे तपासून घेतले. लाउड-स्पीकरवरून व झळकत्या दिव्याच्या पाट्यांवरून तशी सूचनाहि दिली जातच होती. शिवाय धूम्रपान स्थगीत करण्याचाहि इशारा दिला जात होता.

त्या परिचारिकेनें लेमनड्रॉपचे ताट फिरवून सर्वांची तोंडे आंबटगोड केली व गोड शद्बात सर्वांचे स्वागत करून उड्डाण करण्याला हवा अनुकुल असल्याचा निर्वाळा दिला. तसेंच हा मुंबई ते लंडन तब्बल चोविस तासांचा, सुमारे चार हजार मैलाचा प्रवास आपल्याला सुखकर होवो, अशी सदिच्छाहि प्रगट केली.

इकडे त्या चार इंजीनें असलेल्या प्रचंड विमानाची कर्णकटू घरघर सुरू झाली आणि मीं काचेच्या झरोक्यातून दृष्टी खिळवून विमानतळाच्या कटघरात कोंडलेल्या त्या सुन्हृद समुदायांत आपल्या ओळखीचे चेहेरे न्याहाळू लागलो.

त्या समुदायांतील स्त्रीपुरुषांचे चेहेरे व्याकूळ दिसत होते. प्रत्येकाचा 'कुणीतरी' दूरदेशी जाण्याला निघाला होता. रात्रीची वेळ असल्यामुळे आमचे चेहेरे जरी त्यांना दिसत नव्हते तरी, आमचे प्रतीक असलेल्या त्या विमानाच्या हालचालीवर त्यांची दृष्टी, ते संपूर्ण दृष्टीआड होईपर्यंत खिळून रहाणे स्वाभाविकच होते.

प्रथम आमचे विमान पीतवर्ण विद्युद्दीपांच्या मालिकेंतून संथपणें सरपटत उड्डाणाच्या स्थळी जाऊन उभे राहिलें. नंतर त्याचे ते चारहि पंखे वाढत्या वेगाने फिरू लागून आमचे कान बधीर झाले. आणि–आणि हे बघा आता ते धावत सुटले. पहाता पहाता खालच्या असंख्य दिव्यांच्या माळा दूरदूर जाऊ लागल्या व कांही काळ त्या अफाट मुंबापुरीच्या परिसरांत, वर दैवी तारका आणि खाली मानवी विद्युद्दीपाच्या मालिका असे थरारून सोडणारे दृष्य पहात, आम्ही दूरदेशाप्रत आकाशात भ्रमण करू लागलो.

आमचा पहिला मुक्काम सकाळी पाच वाजता इराणच्या आखातातील बहारीनच्या अरबी विमानधक्क्यावर होणार होता. उड्डाणाला सुरुवात होताच बहुतेक सारे प्रवासी डोळे मिटून स्वस्थ पडून राहिले. कांही तर घोरूहि लागले. मला एरव्हीच लवकर झोप लागत नाही, त्यांतून नीट बिछान्याशिवाय त्या अवघडलेल्या परिस्थितीत झोपेने पूर्ण असहकार पुकारल्यास नवल नाही.

बाहेर पाहून पाहून तरी काय पहाणार! अनंत आकाशात बारा हजार फूटांवरून आम्ही संचार करीत होतो. आमची सारी सृष्टी म्हणजे तेवढे विमान! आत पेंगत असलेले सहप्रवासी व बाहेर माझ्या बाजूने दिसणारा दोन इंजीने बसविलेला ४०–५० फुटाचा पंख. इंजीनचे घरघरणारे पंखे तर अदृष्यच झाले होते. मात्र त्या गडद अंधारात असंख्य ताऱ्याच्या लुकलुकण्यावर ताण करणारा तो इंजीनच्या एक्झॉस्टमधला हिरवा निळा प्रकाश माझी करमणूक करीत होता.

पहाता पहाता पांच वाजले. दिवसभराच्या दगदगीनें व जागरणानें अंग ठणकू लागले. इतक्यांत बहारीन आल्याची घोषणा झाली व 'Tighten the belts' आणि 'No smoking' चे हुकूम सुटले. पायलटने विमानतळाभोवती एक दोन घिरटया घालून उताऱ्याची जागा हेरली व पांच तासाच्या सतत घरघराटानंतर विमान स्थिर झाले. सर्वांना खाली उतरणे भागच असते. कारण अर्ध्या तासाच्या त्या मुक्कामात विमानांत पेट्रोल भरून पूर्ण यांत्रिक तपासणी व्हावी लागते. आम्हालाही वेटींग रूममध्ये चहा

काफी मिळाल्यामुळे अम्मळ हुशारी आली. अर्ध्या तासाने विमानानें उड्डाण घेवून इजिप्तच्या मार्गाकडे झेप घेतली.

आता मात्र तारवटलेले डोळे मिटू लागले. मी माझ्या खुर्चीच्या हाताखालचा दाडा दाबून खुर्ची कलती केली व पायावर ब्लँकेट ओढून प्रातःकालची साखरझोप अनुभवूं लागलो. त्या वेळचा माझा निद्रावश चेहरा, जर कुणी निरखून पाहिला असता तर त्यावर दृग्गोचर होणाऱ्या विविध भावावरून त्याला कळून आले असते की, मी स्वप्न सृष्टीत किती रंगलो आहे! शेवटी तर मला कूणीतरी हळूवार धक्का देऊन जाणीव करून दिली की, कुठला स्वर्ग आणि कुठला नर्क घेऊन बसला आहेस! उघड, डोळे उघड! आणि पहा तुझी ही कर्मभूमी! तुझा अवतार अजून संपला नाही. आणि खरेच मी डोळे उघडून पाहतो तों तो सर्वसाक्षी नारायण आपल्या कोमल किरणांनी मला पुलकीत करीत आहे. मी आपल्याशीच खुदकन हसलो आणि भूगोलाच्या कोणत्या भागावरून आपला संचार चालला आहे, त्याचे निरीक्षण करू लागलो.

खाली दिसणारा भूतलाचा प्रदेश वालुकामय होता. आता माझ्या ध्यानांत आले की हे अरबस्तान आहे. मागे मी या कंटकमय रेताड प्रदेशातून प्रवास केला होता. दमास्कस ते बगदाद. आज ज्या प्रदेशावरून, तास दोनतासाचे भ्रमण करून लीलेनें पार निघून चाललो होतो त्या प्रदेशात, एका विवक्षित अजस्त्र मोटारीने तब्बल वीस तास फरफटावे लागले होते. त्या रखरखीत वाळवंटाची झळ न लागतां बाराशे फुटावरून आज अलगत उडताना

## दुरून डोंगर साजरे

या म्हणीची मनोमन प्रचिती मला आली. हजारो मैल अफाट पसरलेले वाळवंट! असे असते तर! अशा या वाळुच्या साम्राज्यांत कधी-काळी अपघाती विमानांतील मृत मानवाचे पाय लागले असतील तेवढेच. जीवांत जीव ठेवून मानवालाच काय पण कोणत्याहि जिवाणुला, या साम्राज्यांत पदस्पर्श करणे अशक्यच आहे.

पण अंजनीपुत्र वायूनें, इतर आप, तेज इत्यादि महाभूतांच्या सहाय्याने या भूभागाच्या पटलावर कोण कारागिरी ओतली आहे ! त्या नाविन्यपूर्ण अचाट सृष्टीसौंदर्याकडे मी डोळे फाडफाडून पाहूं लागलो.

त्या निव्वळ वाळुच्या अफाट साम्राज्यांत असे काय बरे दिसत होते ! आपल्या नित्याच्या परिचयाची निसर्गनिर्मीत दृष्यें म्हणजे डोंगर, नद्या, वनराजी अगर क्षीरसागर. पण या वालुकामय सागरांत या सर्व विविध दृष्यांची अनुभूति निराळ्याच तऱ्हेने चित्रीत केलेली स्पष्ट दिसत होती. लहान लहान वुटक्या बुटक्या टेकड्यांच्या समुहांतून कधीकाळी वाहून गेलेल्या नागमोडी ओघळान वळणावळणाची जणु रांगोळीच घातली होती. त्यातून मरतुकड्या काटेरी झुडपांची फिकट हिरव्या-पिवळ्या रंगाची आपसुक झालेली लागवण. दऱ्याखोऱ्या, नालेपाट सर्वच त्यात चित्रीत झालेले दिसत होते. पण ! लहान मुलाच्या चौपाटीवरील खेळा-सारखे. आणि या सर्व विस्मयजनक दृष्याला उठाव मिळत होता-प्रभात-काळच्या तिरप्या किरणानी !

छे ! हे पाहिलेले भूमातेचे अभिनव स्वरूप, मी जरी आपल्या हृदयपटलावर खोल कोरून ठेवु शकलो असलो तरी माझी लेखणी त्याचें तंतोतंत वर्णन करण्याला असमर्थ आहे, हे प्राजलपणे कबूल करण्यानेच त्या दृष्याचे वैचित्र्य आपल्या ध्यानांत येईल.

सृष्टीच्या त्या अगाध लीलेकडे मी अनिमिष नेत्रांनी वेड्यासारखा पहात होतो पहाता पहाता सुएजचा कालवाहि आम्ही ओलाडला आणि आता मात्र चित्रपट बदलला. ही पहा नाईल नदी ! आपल्या वैभवाने त्या ओसाड प्रदेशात प्राण ओतीत आहे.

नऊ वाजले होते. आम्ही कैरोच्या विमानतळावर स्थिर होऊन खेदीवांच्या त्या ऐतिहासिक साम्राज्यांत पदार्पण करीत होतो. प्रातःकाल असल्यामुळे तेथील सूर्याची प्रखरता दाहक झाली नव्हती. मंद मंद वहात असलेली वाऱ्याची झुळूक विमानातील बंदिस्त प्रवाश्याना सुखवीत होती.

या ठिकाणी आम्हाला न्याहारी देण्यांत आली. येथील नास्त्यांत विशेष म्हणजे ताज्या फळांची विविध व विपूल सरबते. शिवाय पाव लोणी, जाम, चीझ, चहा, कॉफी येवढेच होते.

हे विमानतळ बरेच अवाढव्य असून विश्रांतीगृहहि प्रशस्त व आराम-शीर वाटले.

अशा आंतरराष्ट्रीय विमानतळावर स्थानिक वैशिष्टयांच्या कलात्मक वस्तूंची प्रदर्शनीय दुकाने असतातच. किंमती अर्थातच भरमसाट असतात. मी इजिप्शियन सिगारेटचे एक पाकीट तेवढे खरेदी केले व झुरके मारीत मारीत बाहेर पडलो. आजुबाजूला युद्धकालीन असंख्य विमाने, भाकड जना-वरासारखी इतस्ततः पडलेली होतीं. आसमंतात दृष्टिक्षेप टाकताच मला माझ्या १९३६ साली याच कैरो शहरांत धावता मुक्काम करून पाहिलेल्या सुप्रसिद्ध 'स्फिक्स व पिरॅमिडसची' आठवण झाली. कॉंटेव्हर्डे या इटालियन बोटीने मी नेपल्सहून मुबईला येत होतो. अलेक्झॉड्रियाला आम्ही बोटीतून उतरलो आणि सुएज कालव्यातून कूर्मगतीने बोट पार होईपर्यंत, रातोरात एका टॅक्सीतून कैरोची सफर मारली होती. सोबतीला दोघे तिघे हिंदी व्यापारी होते. बोट चुकली तर आपले कसे होईल, या भीतिने त्याचे चित्त व्दिधा झाले होते.

आम्ही कैरोचा विमानतळ बरोबर १० वाजता सोडला व प्रवासां-तील तिसऱ्या टप्प्याला सुरुवात झाली. पुढचा मुक्काम स्वित्झरलंडमधील जिनेव्हा येथे पांच वाजता होणार होता. गतगोष्टीवर नवनव्या दृष्यांची पुटें चढत होती आणि वैचित्र्यात मन रंगून गेले होते. कैरोहून नाइल नदीच्या साधारण समांतर रेषेनें आमचे विमान भूमध्य समुद्राकडे निघाले होते. मुख्य पात्राच्या दोन्ही अंगांना असंख्य कालव्याचे पाट व त्यांच्या आजु बाजूला लागवडीखाली आलेली पट्टयापट्टयांची हिरवळ जमीन, मोठी विलोभनीय दिसत होती. पर्वत अगर उंच सखल भाग नांवालाहि नाही, अशा त्या विभागांत अधूनमधून लहानमोठीं गांवे व त्या गावांना जोडणारे नागमोडी

रस्ते, कालवे आणि रेल्वेमार्ग, रेखीव दिसत होते. इजिप्शियन सरबतांच्या घुटक्यांनीहि जो आनंद प्राप्त झाला नसेल तो या अनुपम दृष्यानी मला होत असलेला पाहून ढगानाहि चेव आला. ढगांना खाली दाबून आम्ही जसजसे वर चढू लागलों तसतसे त्या स्थिर दृष्याला नवीनच चैतन्य प्राप्त झालें.

रेल्वेतून जशी बाजूची झाडे भराभर पळताना दिसतात तसे हे फुस-फुशित पांढरे शुभ्र ढग आमच्या खालून भराभर पळ काढू लागले. झाडा-सारखे ढग कांही स्थिर नसतात हे जरी खरे असले, तरी शिघ्रातिशिघ्र विमानाच्या मानाने हे पसरलेले पांढरे शुभ्र अजगर स्थिरच असतात. याचे प्रत्यंतर तर फारच बहारीचे येतें. ढग तुरळक असले म्हणजे त्यांच्या सावल्या खाली भूपृष्टावर पडलेल्या दिसतात आणि ढग जरी आपण विमानाखालून धांवताना पाहातो, तरी त्याची सावली मात्र पूर्ण स्थिर असते.

हा नजरबंदीचा खेळ लवकरच समाप्त झाला. कारण मग ढगांनी इतकी भाऊगर्दी केली कीं त्यांच्या त्या शुभ्र वेष्टनानें पृथ्वी पूर्ण झांकून गेली. एखाद्या बुरखा घेतलेल्या बिब्बीसारखी तिची गत झाली. तिचे नखहि आम्हाला दिसेना. त्या सुस्पष्ट दिसणाऱ्या सौंदर्याकडे मी न्याहा-ळून निरखून पहात होतो. याची जाणीव होऊन, माझी दृष्ट लागू नये म्हणूनहि त्या इजिप्शीयन मरूभूमीनें आपलें तोंड ढगांच्या बुरख्याआड झाकले असावे !

त्या ढगांचा मलाहि अतोनात राग आला, म्हणून मी दृष्टी आंत वळविली तो वेटर लचचा ट्रे हातात घेऊन समोर आला. मांडीवर उशी घेतली व त्यावर तो कागदी ट्रे ठेवून मी भोजनास प्रारंभ केला. कागदी ग्लासातून आणलेले गरमागरम टोमॅटो सूप प्याल्याने मानसिक ताण नाहीसा झाला. कागदाचाच ट्रे, कागदाचाच ग्लास, कागदाचीच वाटी व कागदाच्याच तिखटमिठाच्या व साखरेच्या पुड्या आणि कागदाचेच कांटा-चमचा-सुरी. तरी बरें, अन्न कागदाचे नव्हते ! मला खरोखरच

सर्वम् खल्विदम् ब्रम्ह ।

या तत्वाचा साक्षात्कार झाला. जेवण आटोपून एक सिगारेटचा झुरका मारीत थोडी डुलकी घेत होतो, तों विमानातील पायलट महाशयांनी केलेल्या घोषणेने आमची तंद्री भंग पावली.

आम्ही भूमध्यसमुद्र ओलाडून इटालीच्या दक्षिणेस असलेल्या क्रीट बेटावरून चाललो होतो. हे अभूतपूर्व दृष्य पहावे म्हणून त्याने आम्हाला इषारा दिला होता. आणि हे दृष्य अनाहुत ढगाची आडकाठी न होतां निरखून पहाता यावे म्हणून त्याने विमान बरेच खाली आणले होते.

दिवाळसणानिमित्त श्वशुरगृहीचे पचपक्वान्नाचे जेवण आणि वर त्यांचा न मोडवणारा प्रेमाचा आग्रह. अशीच काहीशी, माझी गत झाली आता माझ्या डोळयाना अजीर्ण होण्याची भीति वाटू लागली. ही अभूतपूर्व निसर्गनिर्मित चित्रे रंगविणारा एकतरी चित्रकार निर्माण होईल काय? चित्रकार निर्माण होवो अगर न होवो, पण अशी मौल्यवान स्थळे प्रत्यक्ष पाहून थक्क व्हावे, अशी ही सोय मानवाने आज उपलब्ध करून घेतली आहे खरी !

क्रीट बेटे, सिसिली, इटालीच्या दक्षिण किनाऱ्याचे चिचोळे टोक सर्वच कांही और दिसत होते. स्फटिकासारखा स्वच्छ सूर्यप्रकाश असल्यामुळे बेटा-वरील, वर उंच उच गेलेले भगव्या रंगाचे सुळके व कांचासारख्या स्वच्छ पृष्ठ भागाखाली पसरत पसरत गेलेला किनाऱ्याचा भाग, त्याने धारण केलेला तो नीलवर्ण ताबुस पिवळा रंग 'किती वानूं, वर्णू' असे म्हणत मी आ वासून पहात होतो. त्या बेटांनी आपल्या गळ्याभोंवतीं जणू पांचू, माणीक लाल, अशा रंगीबेरंगी रत्नांचा हार घालून महालक्ष्मीच्या मुखवटयाची सजावट केल्याचा भास होत होता.

पहाता पहाता तेहि दृश्य विराम पावले आणि आतां—आता मात्र निराळेच दृश्य पहाण्याचा आमच्यावर प्रसंग आला. श्रीकृष्णानें अर्जुनाला दाखविलेल्या 'विश्वरूप' दर्शनाची प्रत्यक्ष अनुभूती आज मला होत होती.

स्विटझलंडच्या आल्पस् पर्वतावरून आम्हीं चाललो होतो. काळ्याकुट्ट ढगांनी आकाश व्याप्त झाले होते. वरखाली कांहींहि दिसेना. खिडकीच्या

काचावर दंवबिंदु साचून त्यांची पारदर्शकताहि नाहीशी झाली होती. प्रचंड वादळ उठले असून पाऊसहि जोरात असावा अशी आमची खात्री पटली. विमान गिरक्या खाऊ लागले. जिनेव्हाचा विमानतळ शोधण्यात पायलट आपली करामत पणाला लावीत होता. घटकेत विमान गप्कन खाली येई तर घटकेंत पुन्हा गिरकी घेवून वर जाई. खाली आलो म्हणजे ओल्याचिंब जिनेव्हा शहराचा कांही भाग मधूनच दृष्टीस पडे. अशावेळी रामाचे नाव आपो-आपच तोंडात येते मी रामनामाचा जप सुरू केला. पण तारीफ त्या पायलटची की, कांही वेळानें त्याने आमचें विमान विमानतळावर सुखरूप उतरवून आम्हाला तात्पुर्ते जीवदान दिले.

कंपनीचे कर्मचारी लालछत्र्या घेवून आम्हाला उतरविण्यास सज्ज होते. पाऊस जोरांत पडत होता. थडीहि आता जाणवू लागली. आम्ही विश्रांति-गृहात जाऊन गरम गरम चहाचे डोस चढविले व अर्ध्या तासाने पुढच्या प्रवासाला निघालो. दोन तासानीं जर्मनींतील डसोल्डरोफला असाच ल्हा-नसा मुक्काम झाला व रात्रौ १० वाजता लंडनच्या विमानतळावर, हा दीर्घ प्रवास संपवून मी सुखरूप खाली उतरलों.

मुंबईच्या टाटा इंस्टिटयुटचे श्री. ठोसर व एक काठेवाडी अशिक्षित तरुण—लंडनला एका व्यापारी मित्राकडे नोकरीसाठी आला होता तो—असे तिघे मिळून कस्टमच्या भानगडी आटोपताच, एक टॅक्सी करून शहरात आलों. मी व ठोसर ग्लेनलॉक रोडवरील श्री. कानेटकर याच्या लॉजमध्यें मध्यरात्रीनंतर जाऊन उतरलो.

१९३६ सालीं माझा लंडनला सहा महिने मुक्काम होता. यावेळी फक्त दोनच दिवस मुक्काम करून ता. ७ च्या पॅन अमेरिकन विमानानें न्यूयॉर्ककडे प्रयाण करावयाचे होते.

दुसरे दिवशीं सकाळी कानेटकरांच्या आदरातिथ्यांत सकाळची न्याहारी आटोपून, मी व ठोसर भारतीय वकीलातींत येऊन दाखल झालो. मी, आपले हायकमिश्नर श्री. बाळासाहेब खेर यांना पत्र पाठविलेच होते व त्यांची भेट घेणे मला अवश्य होते. पण तो सुयोग जुळुन आला नाहीं.

कारण त्यांच्या सौभाग्यवतीची प्रकृती नीट नसल्यामुळे, त्याच दिवशीं सकाळी त्यांनी भारतांत जाण्याकरिता प्रयाण केल्याचे समजले. मला चायनीज व इतर व्हिसा त्याच्यामार्फत ताबडतोब मिळाले असते. पण आता तें पुढे ढकलणे भाग होते.

नंतर तेथील एकदोन हिंदी मित्रांसमवेत, एका हिंदी उपहारगृहात भोजन आटोपून, केसरीचे लंडनचे सुप्रसिद्ध वार्ताहर श्री. ताम्हणकर यांच्या शोधार्थ पार्लमेंट हाऊसवर येऊन दाखल झालो. अठरा वर्षापूर्वी पाहिलेले लंडन ते हेच ! मला विशेष असा फरक मुळीच दिसला नाही. पार्लमेंट हॉउसच्या दुरुस्तीचे काम अजुन संपलेले नाही. आमच्या सुदैवानें श्री. ताम्हणकराची गांठ पडण्याला विशेष अडचण पडली नाही. त्यांनी आपुलकीनें आमची चौकशी करून ओळख करून घेतली व आमच्यासाठीं प्रवेशपत्रिका मिळविण्याची खटपटहि केली. पण त्या दिवशी बऱ्याच गाजलेल्या जिनेव्हा कॉन्फरन्ससंबधीची विशेष घोषणा होणार असल्यामुळे, प्रेक्षकांची गर्दी होती; आणि आम्हाला प्रवेश मिळणे शक्य झाले नाही.

त्यांनी सारे पार्लमेंट हॉऊस आम्हाला दाखविलें व सभागृहात संचार करतांना नित्य नियत असलेली स्पीकरची मिरवणूक आम्ही पाहिली. चारदोन पार्लमेंटच्या सभासदांची त्यानी ओळखहि करून दिली. नंतर आम्ही फ्लिटस्ट्रीटवरील ताम्हणकराच्या केसरी कार्यालयांत आलो. सायंकाळी बरोबरच जेवण घेतले व शेजारच्या स्ट्रॅंड थिएटरमध्यें गाजत असलेले "Charlies Aunt" हे नाटक मुद्दाम पाहिले. कारण आपल्याइकडे अत्र्यांनी गाजविलेला 'मोरूची मावशी' हा चित्रपट याच हास्यरसप्रधान प्रहसनावर आधारलेला असावा, असें आम्ही ऐकले होते.

दुसरे दिवशी श्री. ठोसर केंब्रीजला निघून गेले व मी बहुतेक वेळ लंडनच्या निरनिराळ्या भागांतून फेरफटका मारून जुन्या आठवणींना चालना दिली. लंडनचे ते प्रसिद्ध क्लॉक्टॉवर, टेन डाऊनीग स्ट्रीट, पॅलेस आणि शेवटी "चेंजीग गार्डचा" नित्याचा भव्य विधि पहात पाहत परतलो. कां कुणास ठाऊक पण एकंदर, यावेळचे लंडन मला भकास वाटत होते.

रात्रौ आठला माझे विमान निघणार होते. सायंकाळी पाचाला पॅन अमेरिकन एअर टर्मीनलच्या कचेरीत येऊन दाखल झालो. यथाकाली त्यांच्या बसमधून एअर पोर्टवर गेलो. हे 'क्लिपर' जातीचें विमान फार भव्य असून आतील सारीच रचना सुंदर होती. आम्हाला आमच्या सीटचे नंबर मिळाले असल्यामुळे गर्दी करण्याचे कारण नव्हते. मला यावेळी खिडकी-जवळ जागा मिळाली नाही. माझ्या शेजारी एक जर्मन युवती होती.

या युवतीचें नांव लिडीया बृखमन. ती कॅलिफोर्नियातील डॉक्टर बिव्हर्ली या तरुणाशी विवाहबद्ध होण्याचा परवाना मिळवून निघाली होती. रात्रौ आठ वाजता आमचे विमान लंडनहून निघाले ते बाराच्या सुमाराला आयर्लंडच्या शॅनान येथे थांबले. यानंतरचा प्रवास अफाट अटलांटिक महासागरावरून होता. आज मात्र मला चांगली झोप आली. सकाळी नवाच्या सुमाराला कॅनडाच्या दक्षिणेकडे असलेल्या न्युफाउंडलंड या बेटावरील 'गँडर' या विमानतळावर मुक्काम झाला.

आमच्या घड्याळांत नऊ वाजले तरी सूर्योदय झाला नव्हता. कारण यावेळी ग्रिनविचच्या स्टँडर्ड टाईमप्रमाणें सहा व न्युयॉर्कच्या टाईमप्रमाणें सारे साडेचारच झाले होते.

गँडर पूर्ण बर्फाच्छादित होते. इतका बर्फ मी आपल्या आयुष्यांत प्रथमच पाहत होतो. एअरपोर्टच्या कचेऱ्यावर, विश्रांतीगृहांवर, रस्त्यांवर, घरांवर, दारांवर, पांढऱ्या शुभ्र बर्फाचे थरावरथर साचलेले दिसत होते. विश्रांति-गृहात गरम कॉफी घेवून मी तेथील दुहेरी दरवाजांतून मुद्दाम बाहेर पडलो व आजूबाजूला फर्लांगभर बर्फातून भटकून आलो. बाहेर उभ्या असलेल्या मोटारी अर्ध्या अधिक बर्फात रुतल्या होत्या. घरादारांची दारें, खिडक्या, त्यावर साचलेल्या बर्फामुळें उघडणे शक्य दिसत नव्हते. अजून कोणी निजुन उठले नव्हते. जिकडे तिकडे सामसूम असून त्या बर्फाच्या साम्राज्यांत एक चिटपाखरूहि फिरकत नव्हते.

पण विश्रांतीगृहाचा केवढा प्रचंड दिवाणखाना तो! आंतून पूर्ण उबदार असून तीन चार निरनिराळ्या विमानांतून उतरलेल्या प्रवाश्यांनी गजबजून गेला होता.

दोन तासांनी बोस्टनला विमान लागलें व अमेरिकेच्या भूमीवर पाय लागण्यापूर्वीचे प्राथमिक सोपस्कार येथें उरकण्यांत आले. बरोबर बारा वाजता (न्यु. टा.) आम्ही न्युयॉर्कच्या विमानतळावर उतरलो.



# मायानगरी–न्यूयॉर्क

## तृतीय खड

बर्फाच्छादित न्यूफाउंडलंडमधील गँन्डर सोडल्यापासून, बोस्टन ते न्यूयॉर्क हा प्रवास, या नव्या जगांतील भूभागावरून करतांना दृष्टीगोचर होणाऱ्या प्रत्येक दृष्याची, अमेरीकेविषयी मी जें जें ऐकलें होतें त्याच्याशीं, आपल्या मनांत सारखी तुलना करीत होतो.

माझ्या आयुष्यांत तरी हें एक महान आश्चर्यच होते. कुठे मुंबई, कुठे लंडन आणि कुठे हे पाताळांतील न्यूयॉर्क? मानवी बुद्धीनें आधुनिक विज्ञानाचा विकास करीत करीत अनेक क्रांतिकारी घटना घडविल्या. अशाच एका अघटित घटनेचा आस्वाद घेऊन मी या पश्चिम गोलार्धांत अवतरलो होतो. आणि अवघ्या कांहीं तासांचा 'सुखेनैव' प्रवास करून! या आकाशयानाच्या प्रवासांतील विविध अनुभूतींची नवीनता माझी जिज्ञासा तृप्त करण्याऐवजी ती अधिकच क्षुब्ध करण्याला कारणीभूत झाली होती.

व्हर्जीनिया प्रांताचा संस्थापक 'जॉन स्मिथ' म्हणत असे कीं, "मानवाच्या वास्तव्याची ही सुरेख जागा म्हणजे भूतलावर अवतरलेला जणू स्वर्गच!" आणि अशा या स्वर्गरूपी भूमीवर राहाणारा तो भाग्यवान नवा मानव– अमेरिकन, तो तरी कसा आहे ते पहा. एका फ्रेंच, शेतकऱ्याने त्याचें वास्तव वर्णन करतांना म्हटलें आहे कीं, "ही अमेरिकन 'अवलाद' युरोपखंडांतील नानाविध जमातींच्या रक्तांतून मोठ्या विचित्र सरमिसळीनें निर्माण झाली आहे. तेथील आजच्या कोणत्याहि कुटुंबांत आपल्याला असे दिसून येईल कीं, आजोबा इंग्रज तर आजीबाई

डच ! या जोडप्याच्या सुपुत्रानें फ्रेंच बाई गृहिणी म्हणून पत्करली तर त्यांच्या आजच्या पिढीतील चौघा नातवानी, वेगळयाच चार देशांतील ललनाशी विवाहबद्ध होऊन आपले संसार थाटले आहेत.''

अशी ही अमेरिका आणि असा आहे हा आजचा अमेरिकन ! म्हातारा नाग ज्याप्रमाणें जुनी कात टाकून नव्याने जवानीत पदार्पण करतो, तसा आजचा हा अमेरिकन, जीर्ण चालीरिति, जुनी सांस्कृतिक मूल्यें सारी काहीं लाब युरोपात मागे टाकून, नव्या जीवनाला प्रारंभ करतो. त्याने समाजांत नवीन प्रतिष्ठा निर्माण केली आहे. नवीन तऱ्हेची राज्यपद्धति निर्माण करून त्याचे बंधन आपल्यावर लादून घेतलें आहे. अतीव व्यक्तीस्वातंत्र्य हा त्याचा मूलमंत्र आहे. त्याच्या जीवनातील सर्वच चेष्ठा नाविन्याने ओत-प्रोत भरलेल्या असणे स्वाभाविकच आहे. अशा या नव्या मानवी मूल्याची प्रत्यक्ष प्रचीति घेण्याचा अलभ्य लाभ, आज मला प्राप्त झाला होता.

'एवंगुण विशिष्ठ' अशा या अद्‌भुत राज्यात आंमच्यासारख्या जुन्या जमान्यातून येणाऱ्या प्रवाश्यांची कोण कडक तपासणी ! मी विमानातून उतरलो आणि सेविकेनें दर्शविलेल्या चाकोरीतून तपासणीचे धक्के खात खात एका प्रशस्त दिवाणखान्यांत येऊन पोचलों येथून एके-काला, एका विशेष इमिग्रेशन अधिकाऱ्याकडे, त्याच्या खास खोलींत पाचारण केलें जाई

माझी पाळी आली, तसा मी आत गेलों. आंत प्रवेश करतांच त्याची शोधक दृष्टी माझ्या येण्याबसण्यापासून सर्वच हालचालींत चाणाक्षपणे कांहीं तरी शोधीत होती. मी किती दिवस रहाणार, कुठे कुठे फिरणार, माझा येण्याचा उद्देश काय ? वगैरे प्रश्नोत्तरे होऊन त्यानें माझा पासपोर्ट व व्हिसाचे कागद पडताळून पाहिले. नंतर तो उठून आंतल्या खोलीत गेला. आंत, काय त्याचे 'गुफ्तगू' असेल, तें आटोपून तो बाहेर येतांच, त्याच्या सस्मित भावावरून मी त्या विशिष्ट परीक्षेंत उतरलों असावा असें दिसलें. कारण त्याने माझ्या पासपोर्टवर छापा मारून मला त्याच्या या स्वर्लोकांत तीन महिने परिभ्रमण करण्याची अनुज्ञा प्रदान केली

पण मजा ही की, येथला हा सारा प्रकार शक्य तितक्या जलद "बा आदबके साथ" उरकण्यात येत होता. आणि सर्वसाधारण प्रवाशाला, हे काय लचाड असावे, याची शंका क्वचितच येत असावी.

कस्टम्स्‌ची कसोशीची पाहणी आटोपून मी बाहेर पडलो. एका गणवेश-धारी धिप्पाड निग्रो पोर्टरने माझी बॅग उचलली.

बाहेर सज्ज असलेल्या बसकडे त्याने मला आणले व सामान व्यय-स्थित ठेवून आंत बसण्यास सांगितले. २५ सेंट हमालीचे व १२० सेंट बसभाडे, म्हणजे साधारण सात साडेसात रुपये मला चुकवावे लागले.

न्यूयॉर्कच्या त्या आवाढव्य 'ला गार्डिया' विमान तळावरून आमची बस मध्यवस्तीतील एअर टर्मीनलच्या कचेरीकडे निघाली. हा सारा ३० ते ४० मैलाचा प्रवास त्या मायानगरीच्या उपनगरामधून होता. दोन जाण्याचे व दोन येण्याचे असे भिन्नभिन्न स्वतंत्र मार्ग असूनहि, सुसू करीत जाणाऱ्यायेणाऱ्या असंख्य मोटारीचा ताडा, लाल–पिवळ्या–हिरव्या दिव्यांच्या यात्रिक इशाऱ्यावर थोपतथोपत चालला होता.

आणि माझे मन! ते तर 'मनोजवं मारुति तुल्यवेगं', पाहिजे तसे मोकाट सुटलें होते.

आज ज्या आत्यंतिक कुतुहलानें मी या नव्या जगाचा अनुभव घेण्यास उद्युक्त झालों होतो, त्याहिपेक्षा निराळ्याच मनःस्थितीत, मी रशियांत शिरत असल्याचें चित्र माझ्या अंतःचक्षूसमोर उभे राहिलें.

१९३६ सालची गोष्ट ती! युरोपीयन राष्ट्रांतून प्रवास करीत करीत मी रशियांत जाण्याचे धाडस करून प्रवेश मिळविला होता. झारशाही नष्ट करणाऱ्या 'न भूतो न भविष्यति' अशा तेथील क्रांतीनंतर, प्रथमच रशियानें आपले दरवाजे उघडे करून परदेशस्थांना तेथील नवी समाज-व्यवस्था पहाण्याला पाचारण केलें होते. तेथील रक्तलांछित घटनाची दहशत बसलेल्या शेजारी राष्ट्रांना, तेथे जाणारा केव्हां आणि कसा गोळीला बळी पडेल याचा नेमच वाटत नसे! अशा स्थितीत मी तेथें

कशाला मरायला जातो हेच त्याना कळेना! अशा प्रकारच्या त्यांच्या त्या बिनदिक्कत काढलेल्या उद्‌गारामुळे माझ्या धाडसीवृत्तीला अधिकच धार चढत असे. इसाबाच्या "म्हातारा, मुलगा व गाढव' या गोष्टीप्रमाणे त्यांनी तर मला वेड्यातच काढले होते.

तो रशिया आणि ही अमेरिका! जगाच्या पाठीवरील दोन प्रबल व क्रांतिकारी देश. नवीनतेने नटलेले. पण त्याच्या विचारसरणी किती परस्परविरुद्ध! ध्येय धोरण आणि ते अमलात आणण्याचे प्रकार यांत दोन ध्रुवाइतकें अतर!

अमेरिकेवर आक्रमण करणाऱ्या युरोपवासियानी, या नव्या जगांत प्रवेश केला तो, छाटलेल्या सास्कृतिक मूल्याचे छुपे अंकूर घेऊनच. तेथील ताज्या वातावरगांत या अंकुरावर सरमिसळीची कलमे झाली व संपूर्ण व्यक्तिस्वातंत्र्याला पोषक अशी ही नवी आवृत्तो तयार झाली, इतकेच!

आणि रशियात! झारच्या झोटींगशाहीनें कुजलेली ती भूमी. त्यावेळच्या अत्यंतिक जाचाने चिड्न जाऊन तेथील जनतेने आपली सारी संस्कृति पार तुडवून चिरडून टाकली. आणि शेतकरी जसा नांगर फिरवून आपली निशार जमीन कंटकविहीन करूनच नवीन बी रुजवतो, तशी समाजवादाची नवी बीजे तेथें पेरल्या गेली. 'कपाशीच्या रानात धानाची लावग' अशा या धुमश्चक्रीत व्यक्तिस्वातंत्र्याची काय वासलात लागली, हाच आज वादाचा मूळ मुद्दा आहे.

ही व्यक्तिस्वातंत्र्याची विभिन्न विचारसरणी, आज आघाडीवर असलेल्या या दोन प्रबल राष्ट्रांत, किती पराकोटीला पोचली आहे, याचा प्रत्यय आपल्याला पदोपदी येतच आहे.

तास दीडतासाच्या त्या बसच्या प्रवासानंतर आम्ही न्यूयॉर्क शहरांत प्रवेश केला, तो हडसन नदीखालून गेलेल्या एका प्रचंड बोगद्यांतून. आधुनिक विज्ञानाच्या प्रत्यक्ष विकासाचा कळस पहावयाचा असेल तर तो या अमेरिकेंतच. या मैल दोन मैल लांबीच्या निरुंद बोळकंडात आमची

बस शिरली आणि कुणी हात धुवून मागे लागल्यासारखी घूम पळत सुटली. सगळयाच गाड्या येथें आपली वेगशक्ती पणास लावतात. कारण उत्तम प्रकाशमय गुळगळीत सडक व लोहमार्गासारखा बोगद्याच्या दुसऱ्या टोकापर्यंत 'साफ रस्ता' असल्याबद्दलचें हिरव्या दिव्याचें आश्वासन. मी मागे बर्लिनमध्यें असताना नवीनच झालेल्या एका 'ऑटोबान' रस्त्यानें ड्रायव्हींगची शिकस्त करून आत्यतिक वेगाचा अनुभव स्वतः घेतला असल्यामुळे मला, यावेळी विशेषच मौज वाटली.



आम्ही त्या बोगद्यांतून बाहेर पडतो तों डावीकडे हडसनच्या-प्रशांत जलप्रवाहालगत, युनोची ती संपूर्ण तावदानाची ठोकळेवजा-विख्यात, अजस्त्र इमारत दृष्टीस पडली. जवळच कित्येक विमान कपन्याचे सामुदायिक कचेऱ्या असलेले 'एअरटर्मिनल होते. तेथे आम्हाला उतरविण्यांत आलें,

त्या आवाढव्य व सर्व सुख-सोयींनी सुसज्ज अशा हॉलमध्यें एका कोचावर अमळ विश्रांतिसाठीं टेकतों न टेकतो, तों पॉन-अमेरिकन एअरवेजचा एक कर्मचारी आला व नम्रपणें " मी आपली कांहि सेवा करूं शकतो काय ? " असे विचारू लागला. कुठे जावे ! काय करावे! या विवचनेत मी होतोच. त्याला मी वाय. एम. सी. एत केलेल्या रिझर्व्हेशनबद्दल सागितलें.

त्यानें लगेच तेथे फोन केला व माझी खोली रिझर्व्ह असल्याची खात्री करून घेतली. नंतर एका पोर्टरला बोलावून मला. माझे सामान घेऊन

बाजूच्या फुटपाथवर अमक्या नंबरच्या बसमध्यें नीट बसविण्याच्या सूचना दिल्या मलाहि विनाकारण महागरी टॅक्सी न करता बसने जाण्याचा सल्ला देऊन. भाडे कमे व किती द्यावयाचे व कोठे उतरावयाचे हे सारें समजावन दिलें.

आतां मी बसमध्यें स्वार होऊन दुतर्फा असलेल्या गगनचुंबी इमारतींच्या रांगामधून मार्ग आक्रमीत होतो. अनेक पाश्चात्य देशांच्या बसेस्, ट्राम, लोकल गाड्या मी पाहिल्या होत्या. पण ही अमेरिकेतील बस त्यांत प्रगतीचे एक पाऊल पुढे नसले तरच आश्चर्य !

त्यांत पैसे घेऊन तिकिट देणारा कंडक्टर नव्हता. मुंगीलाहि जेथे पैस नाही, अशा त्या चिकार गर्दीच्या धबडग्यातून सारखी चढउतार करीत, शेंपन्नास उतारूंना सुरक्षीत घेऊन जाणारी बस ती ; आणि ती शांतपणे चालविणारी एकच व्यक्ती—ड्रायव्हर. माणूस आणि मशीन यांची अशी काहीं सांगड घातली होती त्या बसमध्ये की, तो कुशल ड्रायव्हर एकट्यानेच आपली सारी जबाबदारी लीलेने पार पाडीत होता

बाहेर भराभर सरकणाऱ्या त्या एकाहुन एक उंचच ऊंच इमारती, दुकानांची ती अभिनव आरास, कीं बसमधील उतारूंची ती विस्मयजनक शिस्त, काय! पाहूं तरी काय ! असे मला होऊन गेले.

रुंद फुटपाथच्या बाजूने ठराविक स्टँडवर बस उभी केली की, ड्रायव्हर त्याच्या हातालगत असलेला दांडा फिरवून, समोरचा चढण्याचा, अगर मागचा उतरण्याचा, अगर दोन्हीहि दरवाजे उघडायचा. त्याच्या दृष्टीसमोर ठराविक कोन करून बसविलेला एक चांगला चार फुटाचा रुंद आरसा असे. त्यांत त्याला विनासायास बसमधील उतारूंची सारी हालचाल स्पष्ट दिसत असे. हे त्याच्या पाठीला डोळेच होते म्हणाना !

उतारूने आत पाय ठेवतांच, तो बिनबोभाट, त्या ड्रायव्हरच्या उजव्या हाताला असलेल्या मशीनच्या पन्हाळयात ठराविक नाणे टाकी व मागे जेथें जागा असेल तेथें जाऊन बसे. जागा रिकामीं नसल्यास वरील पट्यांत आपला हात अडकवून ओळीत उभा राही

त्या मशीनमध्ये टाकलेलें पैसे खालच्या चौकोनी पेटीत जाऊन पडण्यापूर्वी, त्या मशीनला मधोमध एक कांचेची नळी असे; त्यांतून घरंगळत घसरतांना, ते बरोबर असल्याचे ड्रायव्हरला सहज दिसे. याशिवाय सुटे नाणे देऊन बदलीची तिकीटेंहि त्याला द्यावी लागत.

ही झाली गाडी स्थिर असतानाची त्याची अवधानें. हे सारे आटोपले कीं, तो पुन्हा दांडा फिरवून दरवाजे बंद करी. चाकांवर हात ठेवून मार्गक्रमणाची अवधानें सांभाळीत असतांच, त्याला मधून मधून उजवा हात व क्षणिक एक नजर, त्या पेटींत जमत असलेल्या नाण्यांचीं वर्गवारी करून, ती समोर टांगलेल्या ठरावीक आकाराच्या नळकांड्यांत भरून ठेवण्याचें कामी, लावावी लागे. त्या मशीनला असलेला एक लहानसा दांडा तो गोलगोल फिरवी व तोच हात खाली धरून



वर्गवारीने पडत असलेले नाणे गोळा करून समोरच्या त्या त्या आकाराच्या नळकांड्यात भरी. मोड देताना या नळकांड्यांतून हवे ते नाणे सपसप काढून, त्याला चटचट काम उरकता येई. येथील साऱ्या बसेस् एकच मजली आहेत हे मात्र लक्षांत ठेविले पाहिजे.

मौज ही कीं, ही सारी विविध अवधाने सौजन्यपूर्ण कौशल्याने सांभाळून, एखाद्या नवख्या प्रवाशाला मार्गदर्शन करण्याची तत्परता तो दाखवी.

आठव्या ॲव्हेन्यूच्या चवतीसाव्या रस्त्यावरून आम्ही चाललों होतो खिडकीच्या बाहेर डोके काढून, आकाशाकडे पहात तेथील इमारतींची उंची,

मी मोजीत होतो. तीस, चाळीस, पन्नास, साठ सत्तर! अबब! हें काय? ही इमारत तर सरळ आकाशालाच भिडली आहे!

शेजारच्या गृहस्थाने मला इशारा केला की, अशी मान बाहेर काढणे धोक्याचे आहे. तेव्हा मी खजील होऊन भानावर आलों. ते विख्यात 'एम्पायर स्टेट बिल्डिंग' असल्याचें त्याने मला सागताच माझे उतरण्याचे ठिकाण जवळ आल्याचे मी ताडले. पुढच्या 'स्टॉप'वर बॅग घेऊन खाली उतरलो व फुटपाथवर उभा राहिलो.

आकाश अभ्राच्छादित असून मधून मधून झिमझिम पाऊसहि पडत होता. विमानांतून बाराला उतरून येथपर्यंत येण्याला चार वाजले होते. समोरच वाय. एम् सी. एची पाटी दिसली. आधी रिझर्व्हेशन असून सुद्धा त्या हॉटेलात 'क्यु' मधून मार्ग काढीत रजिस्ट्रेशन, पैसे भरणें व खोलीची किल्ली हस्तगत करून घेण्याला आणखी अर्धा तास लागला.

किल्ली हातांत पडताच, लळतलोबत तेथील अव्याहत चालू असलेल्या एका लिफ्टमध्यें, मी आपलें सामान नेलें. येथेहि 'क्यु' होताच. आंत असलेल्या प्रत्येकाने आपापले नंबर सांगण्यास सुरुवात केली. मीहि आपला किल्लीवर असलेला नंबर सांगितला. येथेहि दर मजल्यागणिक चढउतार चालूच होती त्या लिफ्टमनने पंधरा म्हणून, खाडकन दरवाजा उघडला. मी आपल्या सामानासह बाहेर पडलो व त्या आडव्याउभ्या बोळातून आपली खोली शोधून काढली. किल्ली फिरवून दरवाजा उघडताच ती सुजज्ज खोली पाहून मला कोण आनंद झाला!

घोडा दिसला की पाय दुखू लागतात, ते काही खोटें नाहीं. मी किती शिणलो होतो याची मला आतां पूर्ण कल्पना आली. माझ्या हातापायांतली सारी शक्ती आता नाहींशी झाल्यासारखी वाटू लागली. माझी ती जाजूडड बॅग कशीबशी एका कोपऱ्यांत ढकलली व अंगावरचा जामानिमा उतरवून, त्या पांढऱ्याशुभ्र चादरीने वेष्टीलेल्या स्प्रिंगच्या पलंगावर मी अक्षरशः उडी घेतली. साऱ्या सकाळपासून विमानात ब्रेक-

फास्ट घेतला होता तेवढाच. पण माझ्या श्रांत जीवाची तहानभूक पार हारपली होती आणि पहाता पहाता निद्रादेवीनें माझ्यावर पूर्ण पगडा बसविला. पण अशा अवेळी, पोटांत कावळे काव काव करीत असतांना झोप तरी कितीशी येणार !

मला कुणीतरी गरागरा फिरवून धाडदिशी आपटून दिल्याचा भास झाला. बापरे आदळले वाटते आपले विमान ! डोळे उघडून पहातों तो अंधार गुडुप. पण मी त्या मऊमऊ गादीवर लोळत असल्यामुळें मला भानावर येण्याला वेळ लागला नाही. घड्याळांत पहातों तों सायकाळचे सात वाजले होते. बरें वाटत होतें आता मला! आळस आंगमोडे देवून उठून बसलों व दिव्याचे बटन दाबले. आणि समोरच्या खिडकीत जाऊन त्या पंधराव्या मजल्यावरून नजर फिरविली.

ओऽहो! हें काय! आज या न्यूयॉर्कमध्यें दिवाळी का आहे ! जिकडे तिकडे नुसता लखलखाट ! आणि खडखडाटहि पण. पण जाऊ द्या! हें आता पुष्कळच पाहावयाचें आहे. येथें रात्रीच दिवस निघतो म्हणतात. मीहि शौचमुखमार्जनापासून सुरुवात केली व गरमागरम फवाऱ्याखाली सचैल स्नान करून उरलासुरला शीण नाहीसा करून घेतला.

कपडे करून तळमजल्यावरच्या कॅफेटेरीयामध्यें आलों. इच्छा-भोजन घेतले; आणि मग या मायानगरींत थोडा फेरफटका करून येण्या-करिता बाहेर पडलो. अशा नवीन ठिकाणीं रात्रीचा एकट्याने, कांहीच माहीती नसतांना फिरणे किती धोक्याचे असते ! पण मी जगप्रवासी ! माझ्या मनांत असा किंतू येऊन कसे चालेल ? आणि म्हणून माझ्या या साऱ्या प्रवासांत निर्धास्तपणें कुठेहि व केव्हांहि भटकण्यास मी कधींच कचरत नसे.

# अंतरराष्ट्रीय परिषद

## चतुर्थ खंड

आपल्या इकडे 'आक्टोबर हीट' हा जसा एक सुसह्य, छोटासा उन्हाळा असतो, तसा यावेळी 'एप्रिल शॉवर्स'चा चमत्कारीक ऋतू अमेरिकेंत चालू होता. एका दिवसांत किती वेळा हवामान बदलत असेल त्याचा कांहीं नेम नसे. घटकेंत पाऊस, तर घटकेंत ऊन, आणि घटकेत सुं सूं करीत अंगाला झोंबणारा थंडगार वारा! आणि यामुळें इकडे या ऋतुत हलकासा वाटरप्रुफ-ओव्हरकोट वापरण्याची पद्धत आहे. मी एकच ओव्हरकोट बरोबर घेऊं शकलो होतो, आणि तोहि चांगलाच जबरदस्त होता. त्याचे ओझे मला सतत बाळगावे लागे. नाहीतर लहरी हवामानामुळें फजितीची पाळी येऊन, प्रकृतीवर परिणाम होण्याची भिती असते.

मला दोन दिवस न्यूयार्कमध्ये राहून, माझा येथें येण्यामागे जो मुख्य उद्देश होता, त्या कांग्रेसकरिता नार्थहॅम्पटन्ला जावयाचे होते. या दोन दिवसांत प्रथम मी या अवाढव्य शहराची बरीच माहीती मिळविली. तसेंच राहिलेले व्हिसा पदरांत पाडून घेण्याकरीता अमेरिकन एक्सप्रेस कंपनीमार्फत उद्योग सुरू केला. भारतीय कॉंसूलेटच्या कचेरींत असलेले नागपूरचे सुप्रसिद्ध क्रांतीकारक श्री. रामलालजी बाजपेयी यांची गाठ घेतली व दुसरे गुर्जर नावाचे एक हिंदी गृहस्थ, गेली तीस वर्षे अमेरिकेंत स्थाईक झाले आहेत, त्यांचीहि भेट घेऊन ओळख करून घेतली. याशिवाय कांग्रेसहून परत आल्यावर या मायानगरीच्या अंतरंगांत शिरून काय काय पहावयाचे या सर्वांचा खूप हिंडून आपल्या मनाशीं कयास बांधून ठेविला.

अकरा एप्रिलला सकाळी मी न्यूयार्क सेंट्रल स्टेशनवर दाखल झालों. येथून साडेनवाला निघणाऱ्या 'व्हाइट माऊंटन' एक्सप्रेसनें मला निघावयाचे होते.

मोठ्या शहरातील स्टेशनें अवाढव्य असतातच. पण हे न्यूयार्कचे सेंट्रल स्टेशन नुसते अवाढव्यच नव्हते तर भव्यहि होतें. आणि या अवाढव्य भव्यतेत असीम नाविन्याची भर! या अमेरिकन स्टेशनाची तऱ्हाच वेगळी. नवे जग ना, हे ! मग ! प्रत्येक गोष्ट नव्या नवलाईने नटलेली असल्यास नवल कसले ! आपल्या डोळ्यासमोर जी, मुंबई–कलकत्ता अगर लंडन–पॅरीस सारख्या मोठमोठ्या स्टेशनांची चित्रे असतात, त्याचा येथे मागमूसहि लागत नाही.

आता हेच न्युयार्क सेंट्रल पहाना ! बहिरंग अगर अंतरंगावरून, कुठूनहि पहा, येथून आगगाडी जात असेल अशा शंकेला वावहि मिळत नाही. कोठे रूळाचे दर्शन नाही कीं, धूराचे लोट तर राहोच, पण धुरकटल्याचे चिन्हहि सापडणार नाही. जिकडे पहाल तिकडे एखाद्या शोभिवंत राजवाड्याला लाजवील असा अपूर्व थाट! मी आत शिरलो तों, बाहेरच्या आभ्राच्छादित मळमळीत प्रकाशाला लाजवील असा शीतशात पण झगझगीत प्रकाश. सडकेच्या बाजूने आत प्रवेश केला म्हणजे आपण एका प्रशस्त गॅलरीत शिरतो व या गॅलरीच्या कडयाशी उभे राहून खालच्या प्रचंड हॉलचे ते जीवनचित्र पाहून मुग्ध होऊन जातो. प्रवासी कुटुंबांचे थवेच्या थवे सारखे आंत येत असतात व कुणी त्या हॉलच्या मधोमध असलेल्या गोलाकार माहीती पुरविणाऱ्या काउंटरभोवती, तर कुणी एका बाजूला ओळीनें असलेल्या तिकिट खरेदीच्या खिडक्याभोवती 'क्यु'मध्ये उभे रहातात. कांही लोक हातांत बॅग घेवून दुसऱ्या कोपऱ्यांतून खालच्या मजल्यावर उतरत असतात. हॉलच्या चोहीकडे वरच्या उंच टोंकाला, विजेच्या प्रकाशांत मोहीत करून टाकणारी, हालत्या चित्रविचित्र जाहिराती चुरशीच्या आकर्षणाने झळकतांना दिसतात ! या हॉलमध्यें बसण्याची व्यवस्था

नाहीं, कारण हा निव्वळ 'बिझीनेस' हॉल आहे. मधमाशांच्या पोळ्या-भोंवती जशा सारख्या माशा घों घों करीत घिरट्या घालीत फिरत असतात, तसाच कांहींसा हा प्रकार दिसत होता.

तेथून खाली उतरलों कीं, वरच्यापेक्षाहि आणखी विस्तृत असे, आडवे तिडवे दोनतीन हॉल व त्यालगत सर्व तऱ्हेची दुकाने, हॉटेल्स्, बाथरूमस्, वेटींगरुमस् अशा सर्व सोयी असून 'शुशाइन्', गरम कपड्यांना झटपट इस्तरी, केशकर्तन, जुजबी खाद्यपेयांची यांत्रिक व्यवस्था, फोटो काढवून घेण्याची स्व–यंत्रे, सिनेमा, प्रदर्शने, वगैरे प्रवास सुसह्य करून घेण्याला पाहिजे ते सर्व येथे असते.

या तळमजल्याच्या हॉलच्या एका बाजूला ओळीनें बंद दरवाजे असतात. आणि त्यावर 'ट्रॅक' नंबर एक, दोन, दहा, वीस असे नंबर असतात. या दरवाजाच्या बाजूच्या फलकावर कोणती गाडी केव्हां सुटणार, कुठे जाणार, वाटेंत स्टेशने कोणती वगैरे माहीती लिहिलेली असते. मधूनमधून हे दरवाजे कांही मिनिटांकरिता उघडतात व गाडी आली असल्यास बिळांतून भूरभूर बाहेर पडणाऱ्या मुंग्यासारखे थवेच्या थवे बाहेर पडून त्या गर्दीत विलीन होतात. गाडी सुटण्याची वेळ असली कीं जाणाऱ्या गाडीचा दरवाजा उघडतो व ओळीने उतारू आंत शिरतात. या दरवाजाच्या आंत प्लॅटफार्मवर ठरावीक गाडी उभी असते. उतारूबरोबर निरोप देण्याकरिता आलेली मंडळी या दरवाज्यापाशीच शेवटचा निरोप देवून थबकतात आणि उतारू तेवढा पुढे जातो.

या सर्व व्यवस्थेमुळे येणाऱ्या जाणाऱ्या अथांग उतारूंची जा–ये करणाऱ्या गाड्या केव्हां आल्या व केव्हां गेल्या यांचा थांगपत्ताहि लागत नाही. गडबड, गोंधळ, हलकल्लोळ, ओरडाआरडी या घटनांची अभावाने आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं.

यासाठीच मी मुद्दाम दोन तास आधी आलो होतो आणि या चक्रव्यूहांत गोते खाण्याची मौज लुटत होतो. मोठमोठ्या पोलादी आल-

माऱ्या येथे जागजागी ठेविलेल्या आहेत. गैरसोयीची जिथे पूर्ण हकालपट्टी झालेली आहे तिथे कुणाशी बोलण्याची अगर विचारपूस करण्याची तरी गरज काय म्हणून भासावी! ह्या पोलादी आलमाऱ्यात लहानमोठे १० व २५ सेंट भाड्याचे ड्रॉअर बसविलेले असतात. याला येथे 'चेकअप्' म्हणतात. ज्याला किल्ली असेल तो रिकामा समजावा. किल्ली फिरविली की तो उघडून खण बाहेर ओढता येतो. यांत आपली बॅग व इतर सामान ठेवून बद करावा व किल्ली फिरवून तेथील फटीत ठराविक नाणें सरकवून द्यावे, की किल्ली तुमच्या हातांत येते व पुन्हा किल्ली लावून तो 'परत' उघडेपर्यन्त तुम्ही त्याचे मालक होता.

माझ्या गाडीची वेळ झाल्याची घोषणा होताच मी लाइनीतून प्लॅटफार्मवर प्रवेश केला. दर डब्यागणिक कंडक्टर उभा असतो तो तिकीटाचा नंबर पाहून तुमच्या रिझर्व्हं सीटवर बसविण्याची व तुमचे सामान ठेवण्याची व्यवस्था करतो. येथल्या गाड्यांतून वर्ग नाहीत व आधी रिझर्व्हेशन, मग तिकीट, अशी प्रथा असल्यामुळे जागा धरण्याची धडपड करावी लागत नाही.

बरोबर साडेनवाला भोंगापोंग्याचें सोंग न करतांच गाडी हलली. सबंध बोगी मोकळी. मधून जाण्यायेण्याकरिता रस्ता सोडून दोन्ही बाजूला दोनदोन् तीनतीन सुखासीन गाद्यांनी मढविलेल्या विमानातील खुर्च्यांप्रमाणें, प्रत्येकाला स्वतंत्र खुर्च्या असतात. खिडक्यांची बाजू मोठमोठ्या स्वच्छ काचांनी मढविलेली असून, त्यांची उघडझाप करता येत नाही. कारण बाहेरच्या लहरी हवामानापासून संरक्षणाची आंत पूर्ण व्यवस्था असते.

ताशी साठ मैलाच्या वेगाची गाडी ती! कितीवेळ तरी पाताळांतून चालली होती! आपल्या नित्याच्या अनुभवाचे धक्के अगर खडखडाट याचा पूर्ण अभाव असल्यामुळे इतक्या वेगाने गाडी चालली असेल, यावर विश्वास बसत नाही.

वाटेत, तेथील औद्योगिक प्रचंडतेची जाणीव पदोपदी होई. नद्या तलाव, समद्रकांठ, त्यावर बांधलेलें अगडबंब पूल आणि कारखान्यांनी व्यापलेली हॅम्पस्टेड, स्प्रिंगफिल्ड सारखी शहरें, भराभर मागे टाकीत आमची गाडी, हा दोनशें मैलांचा प्रवास आटोपून बरोबर एकाला नार्थ-हॅम्पटनला पोंचली. हे स्टेशन यथातथाच होते. पाऊस सारखा पडत होता. या जागतिक अधिवेशनाकरितां आलेले आणखी कित्येक प्रतिनिधीं त्या गाडींतून उतरले. त्यांच्या समवेत मी टॅक्सी करून निघालो.

---




भारतीय पोशाखांत श्री. गोपाळराव पाठक व मिस् ख्रिस्ती अमेरिकन प्रतिनिधी बरोबर

टॅक्सी सुरू होताच माझे लक्ष आंत घुमत असलेल्या आवाजाकडे गेलें "हॅलो! हॅलो! टॅक्सी नंबर पंधरा ! स्टॅंड बाय." त्या ट्रॅक्सीवाल्याने. चाकावरचा डावा हात काढून तेथे टांगलेला हेडफोन कानावर बसविला व बटन दाबून त्यानें प्रत्युत्तर केले–"माझ्या गाडीत सवाऱ्या आहेत. मी स्मिथ कॉलेजच्या जिमनेशियममध्ये चालली आहे. कसा काय हुकूम आहे आपला ?"

चालत्या गाडींतील हे संभाषण ऐकून मी थक्कच झालो. मग कळले की, त्या टॅक्सीवाल्याच्या कंपनीचा चालक, आपल्या कचेरीतून कुठल्याहि टॅक्सीवाल्याशी त्या रेडिओफोनच्या सहाय्यानें मिनिटामिनिटाला संबंध ठेवून त्यांचे नियंत्रण बसल्याजागेवरून करतो. का,आहे की नाही चमत्काराची मौज?

तेथील स्मिथ कॉलेजच्या व्यायामगृहांत जाऊन उतरताच सुहास्यवदना स्वयंसेविकानी आमचे आदरपूर्वक स्वागत केले. भूगोलाच्या विविध भागांतून प्रगट होणाऱ्या नानाविध प्रतिनिधींची येथे गांठ पडत होती. प्रत्येकाची नांवनिशी घेऊन त्याची नोंद करण्याचे काम चालू होतं. ते आटोपले की, एक मुलगी येऊन कोटावर लेबल अडकववी या बॅजवर, नांव, गांव, देश व बोलता येणारी भाषा, नोंदलेली असे. एकमेकाची ओळख करून घेतांना, त्याच्या छातीवरच्या बिल्ल्यावर आपल्याला येणारी भाषा दिसली की झाली दोघांची ओळख. इतराशी हस्तांदोलन करून नुसत्या स्मित-हास्यावर भागवावे लागे.

त्या हॉलच्या एका कोपऱ्यांत येणाऱ्या प्रतिनिधींची माध्यान्हीची सोय होती. मला भूक लागलीच होती. तेथें आलेल्या चारदोन प्रतिनिधोंची ओळख करून घेऊन त्याच्या समवेत ते चलतेफिरते भोजन उरकले. नवीन नवीन मंडळी येतच होती व तेथील संचालिका माझ्या वतीनें भारताची ओळख करून देण्यांत धन्य मानीत होती. "आपण खूपच लांबून आलांत ! " असे कौतुकास्पद उद्गार ऐकून क्षणाक्षणाला मी मोठा होत असल्याचा माझा स्वाभिमान मला सुखवीत होता.

हे पहा! हे स्वीडनचे विख्यात आल्वर थॉर्सन. ही, जर्मनींतील प्रसिद्ध मिसेस् डीम्! नुकत्याच इस्तंबूलमध्यें झालेल्या जागतिक परिषदेंत ओळख झालेली मंडळी ही. आणि हा! हा तर हाफीज! इजिप्तचा फिजीकल एज्युकेशनचा डायरेक्टर जनरल! जग किती लहान होत चालले आहे पहा! काल मुबईत भेटलेला माणूस आज दिल्लीत भेटावा तसा, कुठे भारताचा मी, कुठे ही युरोपांतील मंडळी आणि कुठें तुर्कस्तान! अल्प ओळखीनंतर आज साऱ्यांची परत अमेरीकेत भेट!

त्याच हॉलच्या एका बाजूला शारीरिक शिक्षणावरील प्रकाशित वाङ्मयाचें प्रदर्शन होते. मीहि भारतीय व्यायाम कलेसंबंधी व विशेषतः योगावरची स्वामी कुवलयानंदानी लिहीलेली बरीच पुस्तकें व आसनाचे चित्रपट आस्थेनें बरोबर नेले होते. त्याचा ताबडतोब समावेश करून घेतला. ही सारी इंग्रजी प्रकाशने होती. पण त्या प्रदर्शनात काही जपानी वाङ्मयहि प्रदर्शित केले होते. पण हे किडेमाकोडे कुणाला उमगणार! स्वीडन, नार्वे, जर्मनी वगैरे देशानीहि आपले वाङमय त्यात ठेवलें होते. पण त्या प्रदर्शनातील बहुतेक भाग अमेरिकेनेंच व्यापला होता.

भारतीय योगासनाचे चित्रपट मी तेथे टांगले आणि त्याच्या भोवतीं प्रेक्षकाचे वेटोळे गोळा झाले. भारतीय व्यायाम प्रणालीची तेथील लोकाना विशेष माहिती जरी नसली तरी भारतात 'योगी' ही काही तरी अजब चीज आहे व ते काही चमत्कारिक आसनें करतांत, ही माहीती सर्वांना दिसली. आणि याचें कारणहि उघडच आहे. गेल्या शतकाच्या शेवटच्या दशकांत स्वामी विवेकानदांनीं तेथें जाऊन जो हिंदुधर्माच्या मूलतत्वांचा प्रचार केला त्याचे विस्मरण अमेरिकेला होणे शक्य नाही. वेदप्रणीत हिंदुधर्म व त्याचा प्रणेता हा भगव्या वस्त्रांत वावरणारा संन्याशी–योगीच तो! या योग्यानें सारी अमेरिका आपल्या गर्जनेनें हादरून सोडली होती. आणि त्याचाच हा प्रभाव आजहि कायम आहे.

सायंकाळी पांच वाजतां या आंतर्राष्ट्रीय परिषदेच्या उद्‌घाटनाचा कार्यक्रम होता. येथील प्रयेक कॉलेजला एक एक उत्तम नाटकगृह असते. अशा त्या 'सेजहॉल' या नाटयगृहांत सारे प्रतिनिधी व इतर पाहुणे मंडळी जमा झाली. स्टेजवर उद्‌घाटक युनायटेड स्टेटचे शारीरिक शिक्षण व आरोग्य खात्याचे कमीशनर, डॉ. स्पॅम्युएल ब्राउनेल, परिषदेचे सयोजक व स्मिथ कॉलेजची डायरेक्टर श्रीमती डोरोथी एन्सवर्थ, अमेरिकन ॲकॅडेमी ऑफ फिजीकल एज्युकेशनचे अध्यक्ष श्री. निल्सन वगैरे बडी बडी मंडळी विराजमान झाली.

सुरुवातीला प्रेक्षकाच्या मागल्या दरवाजानें शुभ्रवेष परिधान केलेल्या सुदढ कॉलेजकन्यका हातात धरलेले सर्व सम्मिलित राष्ट्रांचे ध्वज उंच फडकवित उजव्या व डाव्या अंगाने रांगेनें प्रवेश करित्या झाल्या. स्टेजच्या दोन बाजूला त्या, ते ध्वज दर्शवीत समारंभाच्या अंतापर्यंन्त मुग्ध मनानें उभ्या होत्या. नंतर एकजात काळ्या वेषधारी दुसऱ्या एका कन्यकाच्या जत्थ्याने स्टेजच्या मागे पियानो भोवताली जमा होऊन दोनतीन पदाचे सुश्राव्य गायन केलें.

जागतिक मेळाव्याच्या अशा त्या सभेच्या कामकाजाला सुयोग्य असें गंभीर वातावरण निर्माण होताच उपस्थित प्रतिनिधीची जाहीर ओळख करून देण्यांत आली. भारताचे, माझ्यासकट तेथील कॉलेजांतून शिक्षण घेत असलेलें आणखी तीन प्रतिनिधी हजर होते.

हा नियोजित कार्यक्रम पार पडल्यानंतर सायंकाळी आम्हाला थाटाचा खाना देण्यांत आला आज पावसाने चांगलीच पाठ पुरविली होती. पण तेथें मोटारीना तोटा नसल्यामुळे प्रत्येक एकापाठी एक होणाऱ्या कार्यक्रमाला वेगळ्या वेगळ्या ठिकाणी जाण्याला त्रास पडत नसे. पण मोकळें हिंडण्यांत जी एक निराळीच मौज असते त्याला मात्र मुकावें लागलें.

खाण्यानंतर रात्री परत त्या जिमनेशियममधें आम्ही जमा झालो. येथें मुलींची व्यायामविषयक प्रात्यक्षिके दाखविण्यांत आली. त्यांत 'वाटर बॅले'

हा कार्यक्रम अविस्मरणीय असा झाला. हा पोहण्याचा कार्यक्रम संगीताच्या तालावर बसविला होता. आणि मजा ही की, त्या मुलींनी जे, विविध अप्रतीम 'पिरॅमिडस' करून दाखविले ते त्या, इतक्या सफाईनें व लीलेनें करीत की, जणू हे खेळ जमिनीवरच चालले आहेत.

मी माझ्या या पर्यटनांत अनेक देशाच्या अभिनव क्रीडा पाहिल्या पण ही आज पहात असलेली पोहण्याची संगीत कला काही औरच होती.

या परिषदेचे आणखी एक वैशिष्टय होते. पांच दिवसाचें कार्यक्रम पांच निरनिराळ्या गांवी, तेथील कॉलेजमार्फत योजण्यांत आले होते. आणि सर्व प्रतिनिधीची रहाण्याची व्यवस्था प्रत्येक गांवी निरनिराळ्या कुटूंबांतून करण्यात आली होती. मी 'डीन हॉपकीन' या ॲमहर्स्ट येथील एका कॉलेज अधिकाऱ्याच्या घरचा पाच दिवस पाहुणा होतो. माझ्या सोबतीला एक इजिप्शीयन प्रतिनिधी होता.

पण आम्ही फक्त झोपायला येत असूं. ते सुद्धां रात्री ११-१२ वाजतां. सकाळी नऊला आम्हाला प्रातर्विधी आटोपून, त्या घरमालकाच्या अल्प न्याहारीचा पाहुणचार घेऊन तयार रहावे लागत असे. कुणी तरी बरोबर नवाला आमच्यासाठी दाराशीं मोटार आणीत आणि पोंगा वाजला की मिसेस् हॉपकीन म्हणायच्या, मिस्टर पाठक "देअर यु आर, तुमची गाडी तयार आहे" आणि असे म्हणून थोडा आणखी कपांत चहा ओतून, तेवढा घेण्याचा आग्रह करायच्या. त्यांच्या सहा वर्षाच्या मुलीबरोबर गप्पागोष्टी करीत आम्ही चहाचे घुटके घेत असायचे. मि. हॉपकीनला मात्र रात्री वाचायची संवय असल्यामुळे तो उशीराच उठायचा.

आज आम्ही स्प्रिंगफील्डला चाललो होतो. गाडीत सोबतीला एक क्युबाची महिला व कॅलिफोर्नीयाचा गृहस्थ होता. हो खरंच! आणखी एक गृहस्थ होता त्याचे नाव आतां मला आठवत नाही. त्याला बिचाऱ्याला स्पॅनीशशिवाय दुसरे कांही येत नव्हते. तो जणू मुक्या सारखाच साऱ्या कांग्रेसभर वावरत होता.

रोज सकाळी नऊ ते रात्री ११ पर्यंत भरगच्च कार्यक्रम चालायचा. भाषणे, चर्चा, प्रात्यक्षिकें व त्या त्या कॉलेजमध्ये असलेल्या व्यायामविषयक साधनाचे निरीक्षण. दुपारचे 'लंच' विद्यार्थ्यांच्या कॅफेटेरीयांत आणि रात्री निवडक प्रतिनिधीबरोबर भव्य खान्याचा कार्यक्रम.

आमच्या हिंदी विद्यार्थ्यांमध्यें 'मिस् ख्रिस्ती' नांवाची एक अहमदाबादची मुलगी होती. ती न्यूयॉर्कच्या कोलबीया युनिव्हर्सीटीत शारीरिक शिक्षण या विषयाच्या डॉक्टरेटचा अभ्यास करीत होती.

तिचा तो साडीपोलक्याचा भारतीय पहेराव आणि माझाहि गांधी टोपी, काळी शेरवानी व अचकन असा नेहरूंची आठवण करून देणारा देशी पेहेराव. आमचा जो जोडा जमला की कांही विचारता सोय नाहीं. किती कॅमेरे आमच्यावर रोखले गेले असतील आणि किती फिल्म निघाल्या असतील याचा नेमच नाही. सर्वच कॅमेराधारी! आम्ही इकडून तिकडे जाण्याकरीता बाहेर पडलो की कुणीहि 'A moment Please' जरा थाबता का? असें म्हणून 'स्नॅप' मारायचे. त्या भोगाला टेलीव्हिजनवालेहि एक दिवस तेथे येऊन पोचले, आणि साऱ्या प्रतिनिधीत आमचीच त्यानी निवड केली.

त्याच सायंकाळी आमचे चलच्चित्र आम्ही एका टेलिव्हीजन सेटवर पाहिलेहि. भारतीय पोषाखाचे वैचित्र्य आणि वैशिष्टय सर्वांच्या कुतुहलाचा विषय झाला होता.

आमचे पाहून दुसरे दिवशी जपानी पोरीनीहि हिंमत केली आणि त्याहि आपला तो 'किमानो' घालून मिरविल्या. नक्कल ती नक्कल पण या त्याच्या झकपकीने मला विशेषच उठाव मिळत होता

आज शेवटचा समारोपाचा दिवस होता. अॅमहर्स्ट कॉलेजच्या त्या विशाल नाटयगृहांत, त्या कॉलेजच्या अध्यक्षांनी सर्वांचें स्वागत केलें. आणि प्रथमच मला पाचारण करण्यांत आले. भारतातर्फे भारतीय सरकारने मुद्दाम पाठविलेला संदेश मी बरोबर नेला होता, तो वाचन दाख-

विण्यापूर्वी, माझ्या प्रास्ताविक भाषणांत, भारतीय व्यायामकलेचा दृष्टीकोन त्यांना थोडक्यांत निवेदन केला व 'अखील भारतीय शिक्षण महामंडळाचे' कार्याची रूपरेषा त्याच्या समोर माडली. नतर आमचे अध्यक्ष व मध्यवर्ती सरकारच्या शिक्षणमंत्र्याचे एक सचीव श्री. सयीद्दीन यांनी तयार केलेला समयोचीत संदेश वाचून दाखविला.

एक तर दुसऱ्या कोणत्याहि राष्ट्रानें, प्रासंगिक अवधान ठेवून असा सदेश पाठविला नव्हता. त्यांतून मी आणलेला हा सदेश, नुसताच औपचारिक नसून सारगर्भित असा होता. आणि माझ्या प्रास्ताविक निरूपणानें त्याला असा काही उठाव आला की, अध्यक्षासकट सर्वांनी माझे व्यक्तीश: अभिनंदन केले व समयोचित शब्दांत आभारहि मानले.

या आतर्राष्ट्रीय परिषदेचा हा अतीम दिवस आम्ही भारतीयानी गाजविला असें विधान आत्मस्तुतीचा दोष पत्करूनहि करावेसे वाटते.

कारण लागोपाठ श्री. सदानंद चोपडे यांचे, त्याच बैठकीत, एक भाषण झाले व रात्रीच्या समारोपाच्या बैठकीत, आग्लभाषीय प्रतिनिधीनी त्या सर्व प्रतिनिधीतर्फे आभार प्रदर्शनाचे दुसरे भाषण करण्याकरिता मुद्दाम माझी योजना केली. या सुसंधीचा फायदा घेवून मिस् डोरोथी एन्सवर्थ या अमेरिकन् भगिनीला, मी एक सुदर धारवाडी खण भेट म्हणून दिला.

असो. या परिषदेचे हे धांवते दर्शन आपल्याला घडविले. पण मी या महत्वपूर्ण परिषदेंत भाग घेऊन माझ्या भारतानें काय साध्य केले याचा चिकित्सापूर्ण उहापोह उपसंहाराच्या खंडांत करणारच आहे. ही परिषद अपेक्षेबाहेर यशस्वी झाली खरी. पण ती यशस्वी करण्याकरिता कोण हा खटाटोप! देशोदेशीचे प्रतिनिधी काही आमंत्रणाची चिठ्ठी गळयांत अडकविली की, निघालें अशा यातायातीच्या यात्रेला, असें तर कांही होत नाही. प्रतिनिधी खऱ्या प्रातिनिधीक स्वरूपांत गोळा करणें, त्यांची आपल्या देशाच्या इभ्रतीला शोभेल, अशी खातरजमा करणें आणि तसूभर उणें त्यांच्या नजरेस पडू न देणें, इत्यादि गोष्टी काय आपोआपच घडून येतात?

आमच्यापैकी प्रत्येकाची वास्तपुस्त करण्याकरिता संबंधांत येणारा प्रत्येक अमेरिकन, जणू फार दिवसानी आपला जावईच घरी आला अशी बरदास्त ठेवण्याचा प्रामाणिक प्रयत्न करीत होता. आणि ही त्याची भूमिका रास्त नव्हती असे कोण म्हणेल ?

आणि खरोखरच ज्याला ज्याला म्हणून कोणत्याहि निमित्तानें कां होईना पण परदेशस्थाना आपल्या येथें बोलावून काही दाखवावयाचे असेल, त्यानी कमीतकमी आपले उणें तरी त्याच्या दृष्टोत्पत्तीस येऊ न देण्याची काळजी वाहिली पाहिजे. कारण कोणत्याहि आंतर्राष्ट्रीय मेळव्यांत भाग घेण्याकरिता येणारा दूरदेशस्थ पाहुणा इतका काही खुळा नसतो.

आतां मीच पहाना, नित्याच्या अनुभवानें 'त' म्हणतां लपविलेली तपेली शोधून काढण्याची जणू मला सहज साधलेली कलाच वाटते.

या कनेक्टीकुट व्हॅयाली कॉलेजीस मधलीच गोष्ट. स्मिथ कॉलेज मधील उद्घाटनाचे दिवशी पहिले रात्री माझा नियुक्त केलेला घरधनी कांही कारणानें मला आपले आतिथ्य सादर करू शकला नाही. आणि रात्री मला एका मुलांच्या वसतीगृहात रात्र काढावी लागली. सकाळी मला घेऊन जाणारा गृहस्थ आपली गाडी घेऊन आला. मी त्याच्या गाडींत बसलो तों त्याचा छोटा बाबा आंत होता. मला लहान मुले फार प्रिय आहेत. त्या नव्या मित्राला नांवगाव विचारून तुला हिंदुस्थानविषयी काहीं माहिती आहे काय असे विचारताच तो काय म्हणतो–" I Know you have no houses to live in, you live in tents and how about snakes?"

"तुम्ही हिंदी लोक तंबूतून राहाता व तुमच्या येथे साप खूप आहेत.' या सहा वर्षांच्या चिमुरड्याला हे भ्रामक ज्ञान कुठुन मिळाले? अर्थात त्याच्या घरांतील मातापित्यांकडून अगर शाळेंतून. यावरून हेच सिद्ध होते की, सर्वसाधारण अमेरिकनामध्ये भारताविषयी अती विकृत ज्ञान आहे.

ही झाली सर्वसाधारण अज्ञ जनतेची गोष्ट ! पण वरच्या श्रेणीचे, अध्यापक, प्राध्यापक, विद्वान शास्त्रज्ञ, यांनीच हा जागतिक मेळावा भरविला तो कशाकरिता ? युरोपीयन लोकांनी या क्षेत्रांत आघाडी मारली आहेना ! ही कशी त्यांना सहन होणार ! आम्हीहि अशी परिषद भरवूं शकतो हेच त्यांना दाखवावयाचें होतें. आणि खूप मेहेनत करून परिषद तर पूर्ण यशस्वी झाली ! पण येवढया उद्व्यापाचे फलीत् काय !

आम्ही, इस्तंबुलच्या येथें पुन्हा जमलेल्या लोकांनी, शेवटच्या दिवशी शेवटच्या क्षणाला, इजिप्तच्या हफीजच्या भाषणांतील उल्लेखाचा फायदा घेऊन 'युनेस्को' व हू ( UENESCO & WHO ) या जागतिक संघांना शारीरिक विकासाच्या प्रयत्नाला साहाय्य करण्याची विनंती करणारे दोन ठराव प्रसृत करून घेतले म्हणुन बरें ! हेच या आंतरराष्ट्रीय परिषदेचे एकमेव महान कार्य आणि आश्चर्य हे कीं, यासंबंधीं आधी कुणाच्याच कसे टाळक्यांत काहीं आले नाही! बरोबरच आहे, संयोजकांचा उद्देशच मुळांत विकृत. दुसरें काय !

# सार्जंट कँप

## (पंचम खंड)

विरोधाशिवाय विकास होऊच नये असे जणू काय एक नवीन अलिखीत प्रमेय आज उदयास येऊं पहात आहे. ही आंतरराष्ट्रीय शारीरिक शिक्षण परिषद भरविण्यांत अमेरिकेनें कुणाचा प्रत्यक्ष विरोध जरी केला नसला तरी तसा विकल्प त्यांच्या मनांत जरूर होता. स्विडननें आज कित्येक वर्षे स्थापन करून वाढविलेल्या जागतिक संघटनेला शह देऊन नवीन संस्था स्थापन करण्याचा त्यांचा हा डाव होता. पण हा डाव हुकला. कारण युरोपियन रक्तच किती झालें तरी त्यांच्या नसानसांतून वहात होते.

परिषद सुरू झाल्यापासून, या क्षेत्रांत, युरोपच्या पुढारीपणाला शह देण्याचा हा कट आंतल्या आंत जरी शिजत असला तरी त्याची कुणकुण लागणें अपरिहार्य होते. आणि परिषदेचें दृष्य कार्यक्रम चालू असतांच अदृश्यपणें पडद्याआड त्यांच्या आपसांत बऱ्याच भानगडी चालू होत्या. पण त्या, या जागतिक मेळाव्याच्या चव्हाट्यावर येऊ देणें, दोघांनाहि इष्ट नव्हतें.

अशा त्या नाजुक परिस्थितींत शेवटल्या समारोपाच्या दिवशी, सकाळच्यांच बैठकींत प्रतिनिधींना आपापल्या कर्तव्याची जाणीव करून देणारा, तो भारताचा दिव्य संदेश, संजीवनी ठरला असल्यास नवल नाही. आणि मग, पडद्याआड धुमसत असलेला सारा विरोध आंतल्या आंतच बारगळला व झालें गेले सारे विसरुन प्रगतीचे पाऊल कोणत्या दिशेने टाकावे, यावर सर्वांचें लक्ष केंद्रीत झालें.

असे काय बरें होते त्या संदेशांत ? भारतीय संस्कृतीच्या प्रभावानें तळपणारा तो संदेश खालील चतु:सूत्रीवर आधारलेला होता.

१. प्रत्येक राष्ट्राला त्याच्या स्वातंत्र्य-रक्षणार्थ लागणारा कणखरपणा व्यक्तिव्यक्तीच्या नैतिक व अध्यात्मिक विकासावर अवलंबून असतो. आणि असे हे विकसन तेथील शारीरिक शिक्षणाच्या प्रणालीवरच अवलंबून असते हे मुद्दाम सागण्याची आवश्यकता नसावी.

२. संतत युद्धाचे भय जागृत ठेविणाऱ्या या 'अॅटम'च्या युगांत राजकारणनिरपेक्ष अशा या अंतराष्ट्रीय परिषदाचे विचारपूर्वक घेतलेले शुद्ध निर्णय, जगात खरी शांतता राखण्याचे महान कार्य करू शकतील.

३. दुसऱ्याला घेण्यासारखे, जसे प्रत्येक राष्ट्राजवळ काहीना कांही वैशिष्टच असतेच, तसें शारीरिक शिक्षणाच्या क्षेत्रांत भारतीय लोकनृत्यें, पारंपारिक व्यायाम-क्रीडा आणि योगासनें इत्यादीनी मानवी मनाची घेतलेली पकड आता आपल्याला दृष्टीआड करुन भागणार नाही.

४. म्हणून या जागतिक मेळाव्याच्या मंथनांतून असे प्रभावी व मार्गदर्शक निर्णय बाहेर पडोत की जे निकोप-सुदृढ शरीर, दृढ-विकासशील मन आणि सामूहिक समाधान प्रदान करून अखिल मानव जातीचे जीवन सुसह्य करण्यास मदत करतील.

'अॅटम बॉंब'ची भयावह लटकती तरवार अमेरिकेने धारण करावी आणि भारतानें त्यावर शांततामय तोडगा सुचवावा, अशी ही घटना जशी घडली तशीच ती आपल्यासमोर मांडली आणि आता आपल्याला एक भाकितहि सांगतो.

'भस्मासूर-मोहिनी'ची कथा सर्वांच्या परिचयाची आहेच. ही गोष्ट माझ्या अमेरिकेच्या प्रवासात मी किती जणाना सांगितली असेल ! आणि ती जशी जशी मी रंगवून सांगत असे, तसे तसे ते बिचारे अमेरिकन विचलीत होत असलेले स्पष्ट दिसून येई.

सार्जट कँपमध्यें आम्ही अनेक देशांची मंडळी दुपारचा चहा आटोपून गप्पा ठोकित बसलो होतो. बाहेर खूपच पाऊस पडत असल्यामुळे तेथील बहुतेक कार्यक्रम स्थगित करणे भाग होते. त्या कँपमधल्या उबदार लाकडी गृहांत दोनदोन मजली कॉटच्या तळमजल्यावर आडवे उभे, बसलेले असे एकत्र जमून आम्ही खुशालीनें पाळीपाळीने सर्वच विषय हाताळीत होतो.

त्या दहाबारा जणाच्या घोळक्यात दोन अमेरिकन, एक कॅनेडीयन दोघे युरोपियन, एक द. आफ्रिकेची बाई, एक फिलिपिनो वगैरे मंडळी आळीपाळीने एक एक ठेवणोतली सोडीत होतो.

चकाटयांचें चक्र फिरता फिरता अमेरिकेच्या 'ॲटम बॉब' वर येऊन पोचले; तसे मी त्यांना आम्ही हिंदुस्थानांत त्याला भस्मासूर म्हणून ओळखीत असल्याचे सांगीतले. एकाने कुतुहलाने विचारले 'What is this Bhasmasur?' हे तुमचे भस्मासूर काय प्रकरण आहे?

तशी मी त्यांना भस्मासूर मोहिनीची रसभरीत कथा अशी रंगवून सांगितली की, सर्वांची तब्येत खूष झाली

"आणि जेव्हां त्या भस्मासुरानें शंकराकडून मिळालेल्या वरदानाच्या कृपेने ॲटम बॉम्बसारखे 'हिरोशिमा' करून पाहिले, तेव्हा देव, दानव असूर, तीनहि लोकात हाहाक्कार उडाला. त्या सर्वांचे मिळून 'डेप्युटेशन' देवाधिदेव विष्णुकडे गेले आणि विष्णुनें खुप विचार करुन या भस्मासुराचेच भस्म' करण्याची अशी एक सुदर शक्कल शोधून काढली----"

एकाने अधीरपणे प्रश्न केला, "कोणता उपाय शोधून काढला त्याने"?

"तुम्हा अमेरिकन लोकांना नाचायला खूप आवडते ना? बस त्या नाचापायीच शेवटी तो भस्मासूर स्वतःच्या हातानें भस्म झाला."

सगळे आ वासून माझेकडे पाहूं लागले. "भगवान विष्णूनें मोहीनीचें रूप धारण केले व आले त्या भस्मासुराकडे तो भस्मासूर 'आधीच मर्कट

तशातहि मद्य प्याला' अशी त्याची अवस्था झालेली! मोहिनीचे ते मोहमयी रूप पाहून लागला तिच्याशी लगट करायला. तिच्या करिता तो देहभान विसरून तिच्या सागण्याप्रमाणे नाच करायला लागला. आणि नाचता नाचता मोहिनीनें सहज हावभावांत आपला हात डोक्यावर ठेविला. उल्लू झालेल्या त्या राक्षसाने तिची हुबेहुब नक्कल केली. आणि काय, त्याचा हात स्वतःच्या डोक्यावर गेला मात्र, भडकल्या ज्वाळा! शंकराने दिलेल्या वरदानाने तो ज्याच्या डोक्यावर हात ठेवील, तो भस्म होत होता. त्या मूर्खाने तोच हात स्वतःच्या डोक्यावर ठेविला आणि त्या काळचा तो अॅटम बॉम्ब जो विनाश पावला, तो आज या अमेरिकेत अवतरला

माझी गोष्ट संपली आणि सर्वांचें चेहेरे गभीर झाले. मी सागितले की, भारताजवळ अशा अनेक विद्या आहेत आणि ह्या आधुनिक भस्मासूराचा काटा अशाच कोणत्या तरी उपायाने भारताला काढावा लागणार आहे.

आम्ही परिषद सपवून हा सार्जंट कॅम्प पहाण्याकरिता आलो होतो. दोन दिवस होता आमचा मुक्काम त्या रमणीय स्थळी

डोंगर माथ्यावर असलेले ते ठिकाण, भोवताली गर्द झाडी आणि बाजूला सुदर एक सरोवर. मधोमध खेळण्याची पटांगणे आणि भोंवताली कँपच्या झोपड्या. लाकडी घरेच म्हणाना ! आत सर्व सुखसोयीनी सज्ज. पलंग, गाद्या, चादरी, ब्लँकीटे, इलेक्ट्रिसिटी, थंडे–गरम पाण्याचे नळ, सर्व काही सोयी होत्या त्या निर्जन स्थळी.

डॉ. सर्जन्ट या गृहस्थानें ही कँपची कल्पना काढली आणि आज येथें ठराविक खर्च दिला की, कोणत्याहि शाळा–कॉलेजच्या विद्यार्थ्यांनी सात दिवस येथे कँप करावा व मुलामुलीना विपूल क्रीडा करण्याला वाव द्यावा.

आम्ही बसनें दुपारी एकला तेथे पोहोचलो तों एका शाळेतील लहान मुलामुलींचा सहलींचा कार्यक्रम होता. त्यांच्यावरोबर दुपारचें जेवण

झालें. जेवणानंतर त्या डायनिंग हॉलमध्येच सभा, चर्चा, गाणी, बैठे खेळ इत्यादि कार्यक्रम झाले. कारण बाहेर पाऊस तोंड काढू देईना.

दुपारचा चहा आटोपतांच ते बालगोपाल निघून गेले व सायंकाळी कॉलेजच्या प्रौढ मुलींची दुसरी टोळी आली. पन्नास साठजणी असतील त्या.

सायंकाळचे भोजन आटोपतांच त्या मुलींचें व्यायामादि, नाच क्रीडा गायन, चित्रपट असे विविध कार्यक्रम झाले. आणि शेवटी मध्यरात्रीपर्यंत 'स्क्वेअर डान्स' झाला. या कार्यक्रमांत सर्वांनी भाग घ्यावयाचा असतो. मलाहि त्या पोरींनी खूप नाचविले.

दुसरे दिवशीहि सारखी रिपरिप चालू असल्यामुळें त्याचा फार विरस झाला. तरी आम्ही मोटारीतून सभोवतालच्या परिसरांत हिंडून बोटींग, पहाड चढणें, घोड्यावर बसणे, टेनीस, बॅडमिंटन, हस्तकौशल्य अशा अनेक गोष्टी शिकण्याची केलेली सारी व्यवस्था व उपकरणे पाहून आलो.

मधून मधून खानपान व आंतल्या आंत होऊ शकणारे कार्यक्रम ठराविक वेळी चालूच होते. रात्री त्या मुलींच्या कार्यक्रमाबरोबर आम्ही बाहेरच्या प्रतिनिधींनीं एक मिश्र कार्यक्रम करून दाखविण्याचें ठरविले. दुपारी आमच्या खोलीवर आम्ही कार्यक्रम निश्चित करून त्याची रंगीत तालीम घेतली. ते कार्यक्रम तरी काय दाखविणार! येऊन जाउन आफ्रिका, न्युझिलंड वगैरे देशांतील जंगली लोकांची लोकनृत्यें! अशा नृत्यांचा अभ्यास केलेल्या एकदोघी बाया आमच्यामध्यें होत्या; त्यानीं आम्हाला ते नाच थोडक्यांत शिकवून कसेबसें बसवून घेतले. भारतातर्फे मी कांहीतरी दाखवावे असा मला फार आग्रह झाला. बाकीचें येथेंच शिकत असलेले भारतीय विद्यार्थी प्रतिनिधी कुणी आलेच नव्हते.

माझी परिक्षेचीच वेळ होती ती. पण म्हणतात ना प्रसंग हिम्मत देतो मर्दाला! भारताच्या इभ्रतीचाच प्रश्न होता तो! जनार्दन स्वामींच्या कृपेनें चार दोन आसनें मी शिकलो होतो. तेवढ्या भांडवलावर केली हिम्मत आणि राखले भारताचें नांव.

ठरल्याप्रमाणें रात्री कार्यक्रम झाले. माझी पाळी येतांच आसनावर एक छोटेसें प्रवचन झोडून ठोकले पद्मासन. नतर ओळीनें गोमुखासन, मच्छेंद्रासन, हलासन, सर्वांगासन चक्रासन, धनूरासन, शलभासन वगैरे करून दाखविली. मी वर सांगितलेच आहे की, भारतीय योग व आसनें यासबंधी त्याना बरेंच कुतुहल आहे; शिवाय मी आपल्या जवळचे चित्रपट तेथेहि प्रदर्शीत केल्यामुळे त्यांचें कुतुहल विशेषच जागृत झाले होते.

त्या छोटयाशा कार्यक्रमाने सर्व मंडळी खुष झाली. आणि माझा भाव असा कांहीं वाढला की, साऱ्या मुली माझ्याभोवती जमून नाना-तऱ्हेचे प्रश्न विचारू लागल्या. माझी बडदास्त तर विशेषच होऊ लागली.

हा अत्यंत उत्साहवर्धक व खेळीमेळीचा कार्यक्रम आटोपून तारीख अठरा रोजी मी परत न्यूयार्कला येऊन दाखल झालो.

पाच दिवस निरनिराळया विद्यालयाच्या परिसरांतील कांग्रेसचे व दोन दिवस त्या सार्जंट कॅंपमधले, असा एक पूर्ण आठवडा, मी एका वेगळयाच जगात वावरत असल्यासारखा कुणीकडे निघून गेला कांहीं कळलेंच नाही.

माझ्या आयुष्यांत असें अनेक अविस्मरणीय क्षण आले आणि गेले.

आज मी परत त्या मायानगरीच्या धबडग्यांत सांपडून, हा माझ्या पृथ्वी प्रदक्षिणेचा दुसरा हप्ता कसा जाणार याचा विचार करीत पत्रें खरडीत बसलो होतो.

रविवारचा दिवस होता तो. येथें रविवार म्हणजे गांवांत जणू हरताळच. चर्चमध्यें जमणारे धार्मिक वृत्तीचे कांही लोक तेवढे जागरूक. बाकीचे शनिवारची रात्र ख्यालीखुशालीत घालवून घोरत पडलेले असायचे.

एक प्रवीण शहा नावाचा भारतीय विद्यार्थी सॅनफ्रांसिस्कोहून आज आला त्याची येथें गांठ पडली. वैमानिक हवामान खात्यांत शिक्षण घेऊन नोकरी करीत गेली पाच वर्षे तो येथेच होता. आता इंग्लडला नोकरीच्या शोधांत निघालो असल्याचे त्यानें सांगितले.

तरूणपणात उच्च शिक्षण व भरपूर पैसा मिळविता आल्यामुळे या चॅनी अमेरिकेने त्याचे भारतीयत्व सुप्त करून टाकले होते. तो भारतात परत जाण्याला तयार नव्हता.

आज 'साजरा' दिवस निघालो होता. लख्ख पडलेले ऊन उबदार वाटत होते. आणि त्यांत मातृभूमीविषयी उदासीन झालेल्या भारती-याची सोबत! निघाली आम्ही भटकायला. दुपारचे चार वाजलें होते. जगातील एकमेव अशी एकशेदोन मजली इमारत ती! त्या "एम्पायर स्टेट"च्या तळमजल्यावर असलेल्या अद्यावत प्रशस्त रेस्टॉरेंटमध्ये आम्ही चहा घेत किती तरी वेळ बसलो होतो.

शहा या जीवनक्रमात रुळलेला आणि भाळलेला. आणि मी नित्य नवा जीवनपट पहात हिंडणारा एक अभ्यासू प्रवासी प्रेक्षक. काय त्या हास्यवदना मुलींची सेवातत्परता! म्हाताऱ्या, मध्यमा, तरुणी या साऱ्यांची येथे मुलींतच गणना होते.

'वृक्ष फार लवती फल भारे' या मार्मिक कवी उक्तीला गालबोट लावणाऱ्या या येथील अंगना ताठरपणें कामांत चूर होत्या. गळ्यांत, कंबरेभोंवती अगर हातांत हात घालून येणाऱ्या युगुलात तरूण अगर वयातीत असा भेद नव्हताच मुळी. शहा आपल्या गेल्या पंचवार्षिक जीवन-क्रमाचे अनुभव मला सांगत होता.

अंतर्राष्ट्रीय परिषदेतील माझी साथी, मेरी ख्रिस्तीयन येथील कोलंबिया युनिव्हर्सिटीतील आपल्या वसतीगृहात अगोदर येऊन दाखल झाली होती. मला आज तिने रिव्हरसाईड ड्राईव्ह नजीक असलेल्या 'इंटर नॅशनल हॉऊसमध्ये, साडेसाताला पाचारण केले होते. मी शहालाहि बरोबर घेतले, आणि ही सायंकाळ आम्ही भारतीय त्रिकुटाने मजेत घालविली.

त्या 'इंटरनॅशनल हाऊस'मध्ये आज भारतीय चित्रपटाचाच अनायासें कार्यक्रम होता. न्यूयॉर्क सारख्या मायानगरीत हे एक असे संगमस्थान आहे की, जेथें जगांतील अनेक विद्यार्थी एकत्र येऊन आपआपल्या आचार-विचाराची देवाणघेवाण करतात.

आम्ही येथील कॅफेटेरीयामध्ये भोजन केले. मेरीशी सर्वांची ओळख. आमचीहि ती भेटेल त्याच्याशी ओळख करून देण्यांत धन्य मानीत होती. भव्य दाढीमिशाची आयाळ असलेल्या पंजाब्यापासून तो बुटके जपानी, बटबटीत चेहऱ्याचे हवाईयन, आणि काळेकुट्ट विद्रुप निग्रो अशा साऱ्या विविध मानवजातीच्या स्त्रीपुरूषांची अजब खिचडी तेथे पहावयास मिळत होती. मुबईच्या कै. डॉक्टर भडकमकराचा मुलगा येथील डेटल कॉलेजांत शिक्षण घेत आहे त्याचीहि गाठ पडली.

२६ जानेवारीच्या भारतीय स्वातत्र्यदिनाची दिल्लीची भव्य मिरवणूक आम्ही फिल्मद्वारा पहात होतो त्याबरोबरच राजपुतान्यातील मारवाडी लेहेंग्यातील लोकनृत्ये व भाकरा डॅमचे अवाढव्य बांधकाम दाखविण्यात आले. परत येताना मेरीने आम्हाला आपले वसतिगृह व कोलंबिया युनिव्हर्सिटीच्या भव्य इमारती दाखवीत दाखवीत पाताळांनील एका रे. स्टेशनवर आणून सोडले व निरोप घेतला.

आज सोमवार तारीख एकोणीस. भारत सोडून पधरा दिवस झाले. रात्री उशीरा परतल्यामुळे चागलाच उशीर झाला उठायला. हे बघा साडेसात वाजले. ' वाय ' च्या वसतिगृहातच पूर्वीप्रमाणें मी थांबलों होतो. येथे खूप मोकळे व स्वतत्र वाटत होते. नोकराशी तर सबंधच यायचा नाही. आपण बाहेर गेलो की खोलीची साफसूफ होऊन परीटघडीच्या चादरी, टावेल, दररोज बदलुन तयार असायच्या. टेबलावर सूचनावजा कांहीना कांही पत्रके येऊन पडायची.

मी प्रातर्विधी आटोपून खाली कॅफेटेरीयात आलो. 'ट्रे'च्या ढिगातला एक ट्रे उचलला, काटा सुरी चमचा त्यांत ठेवुन घेतला व सामोरच्या कांचाच्या पेट्यांतून आकर्षक रितीने माडुन ठेविलेल्या खाद्य पेयावर नजर फिरवित रांगेतून सरकत सरकत निघालो. हे अर्धे कापून ठेविलेले नारींग. तळहाता-पेक्षाहि मोठे काल एक गृहस्थ चमचा चमच्यानें त्यांच्या कळया काढुन मटकत मटकत खात होता आज आपणहि त्याची लज्जत घेवूं या. निवडक

# जगांतले आठवें आश्चर्य

## ( षष्ठ खंड )

स्वत: कांचेच्या घरांत राहून दुसऱ्याचे घरांवर दगड मारणारा मूर्ख क्वचिनच् सांपडतो. आणि असा मूर्खपणा चुकूनदेखील आपल्या हातून होऊ नये म्हणून शहाणे लोक आपली घरे मुद्दाम कांचेची बांधतात. आज जगातील चार निवडक शहाण्यांनी असाच एक महान् चमत्कार घडवून आणला आहे. त्याचेच नाव 'युनाटेड नेशन्स बिल्डिग'.

न्यूयॉर्क येथील ईस्ट नदीच्या किनाऱ्यालगत असलेल्या अठरा एकर जमीनीच्या तुकड्यावर राष्ट्रसंघाचें अधिराज्य स्थापन झाले असून तेथें नुकत्याच अस्तित्वांत आलेल्या तीन भव्य इमारतींतून जगांत शांतता राखण्याचें प्रयत्न अविरत चालू असतात. यांतील राष्ट्रसंघाच्या कचेरीची आकाशगामी इमारत एकोणचाळीस मजल्याची आहे आणि ही एवढी प्रचंड इमारत ॲल्युमिनीयमच्या चौकटीमध्ये फसविलेल्या निव्वळ कांचांची आहे.

या उंचचउंच कचेरीच्या पायालगत लाबचलांब पसरलेली सगमरवरी दगडांची पांढरी शुभ्र इमारत तितकीच प्रचंड असून त्यांत या राष्ट्रसंघाची अनेक सभागृहें आहेत. वास्तविक ही सहामजली इमारत असूनसुद्धां एकोणचाळीस मजल्याच्या तुलनेमध्यें भुईकोट किल्यासारखी सपाट असल्याचा भास होतो.

प्रथमदर्शनी साठ सभासद राष्ट्रांच्या ध्वज-मालीका प्रवेशद्वाराच्या दुतर्फा हातांत हात घालून उंच मानेने मौजेनें डोलतांना पाहून पहाणाराचे अंत:करण

हेलावल्याशिवाय राहत नाही. आणि त्यामागे उभे असलेले या दोन अवाढव्य इमारतीचे वैचित्र्य लॉरेल व हार्डीची आठवण करून देतात. प्रवेशद्वारांतून आंत शिरताच आपण जसे जसे आत शिरत जावे व जिकडे जिकडे नजर टाकावी तों एकएक नवाच चमत्कार दिसू लागतो.

महाभारतात मयासुराने बांधलेल्या राजसूययज्ञाची मयसभा आज येथे प्रत्यक्षात अवतरली असल्याचा मला भास होत होता. स्फटिकाच्या तुळतुळीत फरसावरून असंख्य स्त्रिपुरूषाची जा ये सारखी चालू होती एका प्रशस्त दालनातून दुसऱ्या दालनात ! ते प्रचंड खांब. फिरते जिने. अद्यावत् पद्धतीने नटविलेले एक एक सभागृह. शक्यतोवर पारदर्शक काचाच्या भिंती. त्यांतून सतत दृष्टीस पडणाऱ्या त्या मायानगरीच्या प्रचंड आकाशचुंबी गृहराशी. हे जनरल असेंब्लीचे सभागृह. या सभागृहाची उंचीच म्हणे पंचाहत्तर फूट आहे यात ७५० प्रतिनिधी, २७० निरीक्षक, २३४ पत्रप्रतिनिधी, आणि ८०० प्रेक्षक अशा २,०८८ सुखासीन बैठकीची व्यवस्था आहे.

"चला आता आपण 'सिक्युरिटी कौन्सिलच्या' सभागृहात जाऊ'! "असे माझ्या मागून या". "या दालनातल्या या सुन्दर सुन्दर वस्तूवर चालता चालता एक नजर टाका". "हे जांभळी रंगाचे दरवाजावर सोडलेले पडदे पाहिलेत का ? ही डेन्मार्क आणि कॅनडाची भेट आहे." एक ना दोन, ती चुरचुरीत बोलणारी युवती आमची गाईड होती. आम्ही तिच्या मागोमाग चाललो होतो.

या अजबघरात मानवी कौशल्याने निर्माण केलेल्या चमत्कृतीचे जणू प्रदर्शनच आहे. आणि पहाणारांच्या नजरेतून काहिहि सुटू नये म्हणून जगाच्या सांदीकोपऱ्यांतून येणाऱ्या असंख्य यात्रेकरूंच्या गटागटाने अशा मिरवणुकी नित्य निघत असतात. आणि या अंतर्राष्ट्रीय संघटनेच्या कार्याची साद्यंत कथा गोड शब्दांत निवेदन करणारी एक एक महिला अशा संमिश्र मैफलीचे मार्गदर्शन करीत असते.

फिरते जिने व विजेचे पाळणे, चढण्या उतरण्याचे कष्ट जरी पडू देत नसले, तरी ही मयसभा पाहता पाहता पायाचे तुकडे पडण्याची वेळ येते.

आज दोन वाजता सिक्युरिटी कौन्सीलची एक बैठक होती व आम्हा अतर्राष्ट्रीय प्रतिनिधीकरीता प्रेक्षकाच्या गॅलरीच्या तिकीटांची व्यवस्था आगाऊच करण्यात आली होती.

मी एका खुर्चीवर जाऊन बसलो. समोर खोल तळाशी घोड्याच्या नालेच्या आकाराच्या टेबलाभोवती सभासद राष्ट्राचे प्रतिनिधी बसले होते. मधोमध अध्यक्ष व मागच्या रांगेत प्रत्येकाचे सहकारी, चिटणीस वगैरे. हा बघा फ्रान्सचा प्रतिनिधी काही तरी बसल्या बसल्याच बोलत आहे. पण मला याची भाषा कशी कळणार ! हे काय ! सर्व प्रेक्षकानी प्रत्येकाच्या हाताल्गत असलेले हेडफोन आपआपल्या कानावर बसविले. अस्से ! त्याचे पाहून मीहि आपला हेडफोन कानावर बसविला आणि हा बघा खुर्चीच्या हातावर असलेल्या मीटरचा काटा फिरविला. फ्रेंच, इंग्लिश, रशियन, चायनीज, स्पॅनिश यापैकी कोणत्याहि भाषेवर काटा फिरवा व त्या त्या भाषेंत चालू असलेले भाषण ऐकून घ्या.

उंचीचा उच्चांक गाठणारे एम्पायर स्टेट बिल्डिंग जगात सर्वात मोठे इजिप्तचे ऐतिहासिक पिरॅमिड्स अवघे ४८० फूट. इटालीचा झुकलेला पिसा नावाचा मुनारा त्याहून थोडा उंच. वॉशिंग्टनचे मान्युमेन्ट आणखी थोडे उंच. दिल्लीचा कुतुब मिनार साधारण याच उंचीचा. आणि पॅरीसचे 'एफिल् टॉवर' फक्त ९८४ फुट असून आजपर्यंत जगातले उंच टॉवर म्हणून गणल्या जात होते. पण १९३१ साली न्यूयॉर्कच्या या एकशेदोन मजल्याच्या 'एम्पायर स्टेट बिल्डिंगने' १४७२ फुटाची उंची गाठून सर्वांवर मात केली आणि या विमानोड्डाणाच्या उंचीवर एका मिनिटात एक हजार फूट घेवून जाणाऱ्या एकाहत्तर विजेच्या पाळण्यांतून लाखो लोक हा चमत्कार पाहून आले.

आणि म्हणून हे जगातले आठवे आश्चर्य ठरावे हे स्वाभाविकच आहे. पण युनो ! युनोचा उच्चांक फुटात मोजता येण्यासारखा नाही. त्याची उंची मानवाच्या मनांत आणि स्वाभिमानात आहे. प्रत्येक मानवाला आपले हितगुज या राष्ट्रसंघाच्या घटनेत गुंतलेले आहे या भावनेंत त्याची उंची व प्रतिष्ठा अतुलनीय आहे. म्हणून मी हा नववा चमत्कार मानतो.

कॅथालिक पथी ख्रिश्चन धर्मीय सम्राट पोप महाराजाचे इटालीतील रोम येथे असलेल्या अधिराज्याचे काही बाबतीत युनोशी साधर्म्य आहे असे म्हटल्यास वावगे होणार नाही. ही दोनहि संस्थाने संपूर्ण स्वतंत्र असून, जगाच्या पाठीवर त्यांची सत्ता प्रस्थापित झालेली आहे. एक गतानुगतिक चालत आलेली आहे तर दुसरी केवळ आधुनिक. एक काल्पनिक ईश्वरवादावर आधारलेली तर दुसरी प्रत्यक्ष मानवतावादावर.

एक काल्पनिक ईश्वरवादाची कास धरून आहे, तर दुसरी प्रत्यक्ष मानवाची आस पुरविण्याची महत्त्वाकांक्षा बाळगून आहे. ख्रिश्चन तेवढाच मानव आणि तोच तेवढा ईश्वराचा लाडका हे तत्त्व एकीकडे आणि स्वर्ग नर्काच्या काल्पनिक भावना बाजूला सारून केवळ मानवतेवर आधारलेले शांति-सुख-समाधान यांचा पुरस्कार दुसरीकडे 'युनो'ची उची या भावनेवर आधारलेली असल्यामुळे या नव्या आणि नवव्या चमत्काराकडे अलम दुनियेचे लक्ष केंद्रित झाल्याचे आपण पाहतच आहोत.

माझ्या सारख्या भारतीय नागरिकाला आज या ठिकाणी वावरताना एक विशेष साक्षात्कार होत होता. कारण आज या अभिनव संघटनेच्या उच्च स्थानावर भारतीय महिलेचे अधिष्ठान झालेले होते. आमचे बरोबर असलेली इतर देशीय मित्रमंडळी मी जणू विजयालक्ष्मीचा सख्खा भाऊबदच असल्यासारखे तिचा गौरवपूर्ण उल्लेख करून नाना तऱ्हेचे प्रश्न विचारीत होती.

या राष्ट्रसंघाच्या स्वतंत्र राज्यात त्यांचे स्वतंत्र पोस्टखाते असून त्यांची तिकिटेहि स्वतंत्र आहेत चार तास पायपीट करून मी त्या प्रशांत विश्रांतिगृहात जाऊन बसलो तो तेथून उठावेसें वाटेना. एक दोन पत्रे लिहिली व त्याच पोस्टांत टाकून बाहेर पडलो. आता अमेरिकेच्या शा. शि. परिषदेच्या उद्‌घाटनाची वेळ झाली. चला स्टॉटलर हॉटेलात जाऊ या

हेहि हॉटेल अवाढव्यच. मजल्यावर मजले व चवथ्या मजल्यावरचा हा दिवाणखाना. या दिवाणखान्याला जाताना वाटेत असलेल्या रुंद बोळातून (कॉरिडोर) ही पहा दुकानांची 'त[illegible]' गर्दी उडालेली आहे.

शा. शिक्षणावर प्रसिद्ध झालेली असख्य पुस्तके, ग्रथ, चित्रावल्या, निरनिराळ्या प्रकाशकांनी किती आकर्षक पद्धतीनी लावून ठेविली आहेत. खेळाचे प्रकार व त्याला लागणारी सामुग्री स्वास्थ्यसाधनाकरिता स्थापन झालेल्या विविध सस्थांची प्रचारकी प्रदर्शने. व्यायाम, खेळ व नृत्य करिताना वापरावयाची शास्त्रोक्त वेषभूषा. प्रत्येक कार्यक्रमाच्या आधी व नतर हे उपयुक्त प्रदर्शन पहाण्यात किती जरी वेळ घालविला तरी सपूर्ण पाहून होत नसे.

दिवाणखान्यातील पाच हजार जागा भरून मागे लोक शातपणे उभे होते. उद्घाटनाचा कार्यक्रम ठराविक साच्याचा असला तरी त्यात एकदोन गोष्टी विशेष होत्या. स्वागतप्रसगी विद्यार्थ्यांचे प्रकारयुक्त गायन झाले व त्यांत विशेष प्राविण्य दाखविणाराची जागच्या जागीच निवड होऊन त्याचे प्रशस्तीपत्रासह जाहीर अभिनदन करण्यात आले. दुसरे गेल्या वर्षभरात प्रांतोप्रांतीच्या सस्थाधिकाऱ्यानी करून दाखविलेल्या विशेष कार्याचा गौरवपूर्ण उल्लेख. तिसरे विशेष म्हणजे हारतुऱ्याचा नसता अवडबर व त्याची अवहेलना याचा पूर्ण अभाव.

परिषदेचे खरे कार्य उपसमित्यामधून सारखे पाच दिवस चालू होते. शारीरिक शिक्षणाचे इतके विविध पोटविभाग असू शकतात हे मी प्रथमच पहात आहे. अमेरिकेंत बहुतेक युनिव्हर्सिटयामधुन व्यायामविज्ञानशास्त्र उदयास आले असून त्याच्या प्रयोग शाळा आहेत. आपले भारतीय व्यायाम, खेळ,आसने, नृत्य कितीहि चागली असली तरी, आधुनिक काळांत बदललेल्या जीवनमूल्याना अनुसरून, परपरेने चालत आलेल्या विशिष्ट प्रकारात, इष्ट बदल घडवून आणणे अत्यत आवश्यक आहे. आणि हे साध्य करावयाचे झाल्यास त्याचे वयोमानाप्रमाणे चिकित्सक प्रयोग करून त्याच्या परिणामाचे सकलन झाले पाहिजे.

अमेरिकन शारीरिक शिक्षण प्रणालीत जगात उपलब्ध असलेल्या बहुतेक सर्वच प्रणालीना त्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणे स्थान मिळालेले आहे. आणि असे असूनहि भारतीय व्यायाम प्रकाराची उपेक्षाच होत राहिली याची

दोन कारणे सभवतात. पहिले ब्रिटीशाची गजवट व दुसरे शास्त्रीय संशोधनाचा अभाव.

आपल्या व्यायाम प्रकाराचे वैशिष्टय मल्लखांब, कुस्ती, आसने, हुतुतु, खोखो, आटयापाटया येवढयाच गोष्टींत उरलेले आहे असें मला वाटते. बाकीच्या प्रकारात एकतर आपले वैशिष्टय नसावे अगर त्याच्या सुधारलेल्या आवृत्त्या त्यांनी आतमसात तरी केल्या असाव्यात.

'नृत्य' ही आपल्याकडे ललितकला म्हणूनच ओळखली जाते. पण पाश्चिमात्य राष्ट्रांत व विशेषत: अमेरिकेंत हा ललितकलेचा अगभूत पाया, शारीरिक शिक्षणांत फार मोठे मानाचे स्थान प्राप्त करून बसला आहे.

निव्वळ व्यायाम आणि क्रीडायुक्त व्यायाम हे जे शारीरिक शिक्षणाचे प्रमुख विभाग आहेत त्याची सप्रमाण योग्य सागड घातल्याशिवाय शारीरिक शिक्षणाचे कार्यच होऊ शकत नाही. 'निव्वळ व्यायाम' ही कष्टदायक म्हणून अप्रिय अशी एक बाजू आहे. क्रिडायुक्त व्यायाम ही सहजसुलभ आणि म्हणून अतीशय प्रिय अशी दुसरी बाजू.

वरील परिषदेंत अशा तऱ्हेच्या विचाराना चालना देणाऱ्या अनेक विषयावर अनुभवी तज्ञांनी आपआपले विचार माडून उद्बोधक चर्चा केल्या.



# मायानगरीच्या अंतरंगांत

## ( सप्तम खंड )

"गाव तेथें महारवाडा हा असायचाच." ही ग्राम्य म्हण निराळ्या अर्थानें आजच्या यंत्रयुगीन शहरांनाहि लागू आहे. न्यूयार्कसारख्या अवाढव्य शहराचें असें अंतर्बाह्य निरीक्षण करावयाचें झालें तर सहा महिनेंहि पुरणार नाहींत.

पण आजची माझी दैनंदिनी या माया–नगरीतील वैचित्र्यानें कशी भरलेली आहे ते पहा. आज प्रथम मी पोस्टांत जायला निघालों तों वाटेंत तीनचार वयोवृद्ध कामगार मला आडवे आले. एकानें 'गुडमॉर्निंग' करून माझा हात धरला व बाकीच्या मंडळीसमोर उभें करून त्यांच्यासंबंधीं कांहीं अद्वातद्वा तक्रारी करण्यास सुरुवात केली. बाकीचेहि तसेच कांहीं बरळत माझी ओढाताण करूं लागले. हा सर्व प्रकार पाहून माझी चांगलीच करमणूक झाली व या राजेश्रींनीं रात्रीची कसून झोकलेली, अजून उतरली नसावी हे लक्षांत येण्यास वेळ लागला नाहीं.

दारूडे किती नादान असतात याची मला चांगलीच ओळख असल्यामुळें, त्याला एक जोराचा हिसडा देऊन मी आपले हात मोकळे करून घेतले व त्यांची कीव करीत आपल्या मार्गाला लागलों. त्यांनी एकच आरडाओरड करीत फेंगडया चालीनें माझा पाठलाग करण्याचा प्रयत्न केला. कारण दारूडेच ते !

शहाण्याचा चाकर होऊन रहाता येईल पण मूर्खाचा मालक होणें हे केवढे दिव्य असते! अशा एका दिव्यातून मी सहीसलामत पार पडलो असल्यामुळेच वरील दारूडयांना जाणून थोडीशी लगट करू दिली.

पन्हाळगडची गोष्ट. चद्रराव मोरे या चित्रपटाचा मी निर्माता होतो व या निमित्ताने नटनटी व इतर सहाय्यक नोकरवर्ग मिळून दोनशे लोकाचा संच घेऊन तेथे आमचा दोन महिने मुक्काम होता. एका रात्री काही लढाईचे देखावे चित्रित करावयाचे होतें. प्रसिद्ध दिवगत नट दिनकर ढेरे (कामण्णा) व मारोतीराव पहिलवान् या दोन नटाचे त्यात काम असल्यामुळे ही दुक्कल मुद्दाम मुबईहून आणविली होती. दोघेहि जसे कसलेले नट तसेच कसलेले पिणारे!

कोल्हापूर महाराजाच्या कृपेने त्याच्या पन्हाळगडच्या प्रशस्त तीन चौकी वाडयात आमचा मुक्काम होता. दिंडी दरवाजाच्या वर असलेल्या दिवाणखान्यात माझे ऑफीस व वास्तव्य होते.

शेजारच्या खोलीत दोन प्रसिद्ध नटी अमीना व जयश्री याचा मुक्काम होता. मी जेवण आटोपून आपल्या कॉटवर विश्राति घेत दुसऱ्या दिवशीच्या रात्रीच्या अफाट आणि किचकट शुटीगचा विचार करीत होतो. इतक्यात या दोघी नटी असलेल्या खोलीकडून आरडाओरड ऐकूं आली. नोकरानी रिपोर्ट आणला की, दोघेहि खूप मस्त पिऊन नटीच्या खोलीभोवती धिंगाणा घालीत आहेत.

अशा अपरात्री या धटीगणापासून त्या गरीब गाईचे सरक्षण करण्याची जबाबदारी माझेवर होती. केवढा हा प्रसग! मी थोडा वेळ विचार केला व आलीया भोगासी असावे सादर या न्यायाने निश्चयाने प्रसंगाला तोंड दिले. नकली कामण्णा तर एका दरडाविण्यानेच माझे पायाशी लोळण घेऊ लागला; पण दुसरा शक्तीशाली पहेलवान, त्याच्याशी युक्तीनेच पेश यावे लागले.

मी हळूच त्याच्या खाद्यावर हात टाकला व गोजारून म्हटले, "मारोतराव आज तुमची प्रकृति चागली दिसत नाही. सिगरेट ओढा जरा. या असे माझ्या मागून."

गोळी तर बरोबर लागली. तो साहेब, साहेब करीत आला माझ्या मागोमाग. त्याला मी एक सिगारेट शिलगवून दिली व हळूच नोकराला खूण करून पलीकडच्या चौकांतून सारी मंडळी जागवून जमा केली आणि त्यांच्या सहाय्यानें त्या पहेलवानाला रात्रभर बद करून ठेविले.

असो. अमेरीकेनेहि दारूबदीचा प्रयोग एकदा करून पाहिला होता आणि मनुष्यस्वभावापुढे हात टेकून तो हट्ट त्याना सोडून द्यावा लागला, ही गोष्ट प्रसिद्धच आहे. आणि आज न्यूयार्कसारख्या शहरांत विज्ञान–युगांतील प्रचंड एम्पायर बिल्डिंगच्या छायेखाली अशा जंगली जनावरा-सारख्या घटना घडत रहाव्या हेहि एक आश्चर्यच नव्हे काय ?

ही झाली रिकामटेकड्या कामगाराची गोष्ट. कारण त्याना आठ तासाचा दिवस व पांच दिवसांचा हप्ता येवढेच काम आणि बाकीचा वेळ घालविण्याला सुलभ साधन ह्मणजे 'दारू.'

अमेरिकेतील दवाखान्यांतून पन्नास टक्के 'रुग्ण' मेंदूच्या विकाराने पछाडलेले असतात असे स्पष्ट विधान एका विद्वान प्राध्यापकाने आमच्या या अंतर्राष्ट्रीय काँग्रेसमधील भाषणांत केले. आणि याचे कारण सांगताना तो म्हणतो की, हे सारे दुर्दैवी लोक वरच्या थरांतून आलेले असतात. वकील, डॉक्टर, व्यापारी, धर्मोपदेशक इत्यादि वर्गात काम करणाराला वेळच पुरत नाही; तेथे आठ तास आणि पाच दिवस असें बंधन कोण लावून घेणार!

अमेरिकेतील शारीरिक शिक्षणतज्ज्ञांना या दोन्ही थरांतील नाग-रिकांच्या फुरसतीच्या वेळांचा समन्वय कसा घडवून आणावा हा प्रश्न पडला असणें स्वाभाविकच आहे. एकाला रिकाम्या वेळी काय करावें, तर दुसऱ्याला विश्रांतिसाठी वेळ कोठून आणावा, असे परस्पर पेंच पड-लेले असून समाजाची घडी दिवसेंदिवस विसकटत चालली आहे.

माझ्या इंडोनेशियन 'व्हिसा' मिळविण्यांत कांही अडचणी उपस्थित झाल्यामुळे, माझा अर्ज परत आल्याचें अमेरिकन एक्सप्रेसच्या मॅनेजरनें सांगितलें. व त्याच खटपटीत त्यांच्या कॉन्सलची कचेरी असलेल्या त्या

आकाशगामी रॉकफेलर इमारतीच्या चौकात मी येऊन पोचलो. आज येथे वसंतोत्सव चालू होता. रंगीबेरंगी, नानाविध फुलांचे व फुलझाडांचे एक भव्य प्रदर्शन त्या चौकात भरले होते. आणि अशा त्या आकर्षक पुष्पवाटिकेतून समयोचित रंगदार वेषभूषेत मिरविणाऱ्या बालबालिका व युवकयुवती फुलपाखरासारख्या शोभत होत्या. पलिकडे कृत्रीम बर्फ पसरून 'स्केटिंग' चे क्रिडांगण तयार करण्यात आलें असून 'गुळगुळ' फिरणाऱ्या पदचक्रावरून गिरक्याचे प्रेक्षणीय खेळ चालू होते.

हे सारे पाहात पहात मी रॉकफेलरची नंबर सातची हवेली शोधून काढली व लिफ्टमध्ये बसून अठरावा मजला गांठला.

आज इंडोनेशियन कॉन्सल महाशयाची भेट आगाऊच नक्की करून आल्यामुळे मला पांचदहा मिनिटांतच त्याच्या खोलीत प्रवेश मिळाला. हे एक चपट्या तोंडाचे सुविद्य तरुण होते. आमचे हस्तांदोलन होताच मी माझ्या पद्धतीप्रमाणे माझ्याजवळ असलेला अर्ज समोर करून तो नाकारण्याची सरळ सरळ कारणे विचारली.

त्याच्या संभाषणावरून अमेरिकेप्रमाणे इंडोनेशियाहि कम्युनिझमला कसा धाबरतो हे माझ्या ध्यानात आले. मी भारतातर्फे प्रतिनिधी म्हणून येथील आंतरराष्ट्रीय परिषदेचा निमंत्रित पाहुणा असून इतर अनेक देशा-प्रमाणे आपल्या येथील क्रिडाक्षेत्राचा अभ्यास करावा या उद्देशाने तेथे जाऊ इच्छितो वगैरे सर्व त्याला सांगितले. पण त्याला ते कांही पटेना.

मग मी त्याच्याशी भारतीय व्यायामासंबंधी उगीच अघळपघळ गोष्टी सुरू केल्या. चर्चेचा ओघ, योग व आसनावर येताच मी माझ्या जव-ळचा आसनांचा चित्रपट त्याला काढून दाखविला. ते तो व्यग्रतेने पाहू लागला. 'मला या विषयावरचें वाङमय मिळेल का?' असा त्याने नंतर प्रश्न केला. मी त्याला स्वामी कुवलयानंदाच्या योगविद्यालयाचा पत्ता देऊन येथून आपण हे वाङमय मागविल्यास खात्रीनें मिळेल असें सांगितले.

आमच्या या अर्ध्या तासाच्या भारतीय योगासनासंबधी झालेल्या चर्चेमुळे तो जो खुष झाला तो व्हिसाची आर्डर देऊन मोकळा झाला व मला त्याने प्रेमाने निरोप दिला.

हे एक महत्वाचे काम साधल्याच्या खुषीत मी बाहेर पडतो तो पलिकडेच 'रेडिओ सिटीत' प्रवेश मिळविणाराचा लाबच लाब 'क्यू' दृष्टीस पडला.

हे जगप्रसिद्ध 'ललितकलागृह' न्युयार्कमध्ये येऊन कुणी पहाणार नाही असे सहसा होत नाही, आणि याची तिकिटे महिनामहिना आगाऊ रिझर्व्ह करून देणारे अनेक एजंट, या धद्यावर गबर झाले आहेत. चालू खेळाचे तळमजल्याच्या लॉबींत उभे राहून खेळ पाहण्याचे तिकिट साधारण केव्हाहि मिळते. मला असे एक तिकिट मिळाले व मी त्या चमत्कृतीगृहात शिरलो.

बोलक्या चित्रपटाच्या सर्वांगीण वाढीमुळे आपल्या इकडील नाटकाना चागलाच खो बसला आहे. पाश्चीमात्य राष्ट्रे तर चित्रपटांचे जन्मस्थान! पण तेथे आपल्याप्रमाणे नाटकांना खो तर राहोच पण त्या कलेची उन्नती वाखाणण्यासारखी झालेली दिसून येते. आता हाच 'रेडीओ सिटी म्युझीक हॉल' पहाना. याच्या कार्यक्रमात नाटक, सिनेमा, नृत्य, संगीत आणि प्रहसनें या नाटयाच्या सर्व साधनांचा एकसमयावच्छेदेकरून सुंदर सगम झालेला आढळून येतो.

कोण अवाढव्य थिएटर हे! तीन मजली गॅलऱ्या धरून पाच हजार तरी प्रेक्षक तेथे सामावलेले असावेत आणि ते स्टेज! हा इस्टर सणाचा मोसम असल्यामुळे त्याला अनुरूप असा एका भव्य चर्चच्या प्रार्थना मंदी–राचा तो प्रचड देखावा होता. शेकडो पऱ्या गटागटाने नाच करीत व एका विवक्षित पद्धतीने मागच्या बाजूला वेदीकडे जाऊन उभ्या रहात. पहाता पहाता दुसरा ताडा निराळयाच झगझगीत वेषभूषेत वरून खालून बाजूनें चोहोकडून नाचत नाचत गोळा होई व मागे जाऊन निराळया

पद्धतीने स्थीर होत. शेवटी होता होता त्या स्टेजवर चारपांचशे तरी नट—नटद्या एकत्र झाल्या असाव्या. आणि इतक्या साऱ्याचा तो तालबद्ध नेत्रदीपक नाच सप्त रंगाच्या विद्युत झोतात इतक्या सावकाशपणे विलीन झाला कीं, पडदा पडला तरी तें दृष्य अजून आपण पहातच आहोत असा आभास त्याने निर्माण केला.

कोणत्याहि लहानसहान गोष्टीत कलेची परमावधी नाही असे एकहि दृष्य येथें दिसणार नाही आणि करमणूक तर कमालीची.

वसत ऋतूत पक्षांना कोण आनंद होतो! त्यांच्या त्या साध्या किलबिलाटानेहि आपले मन किती रमून जाते. हे असेच एक विलोभनीय दृष्य होते. चिवचिवच्या किलबिलाटांत पडदा वर गेला व एका झाडाच्या ढोलीतून दोन बाजूने दोन कोंबडे टुणटुण उडद्या मारीत समोर आले हे दोन कॉमिक नट होते व त्यानी चोच, पिसारे वगैरे लावून एक कोंबडा व एक कोबडी अशा प्रेमी युगुलाचें हुबेहुब प्रात्यक्षिक करून प्रेक्षकांना थक्क करून सोडले. त्या अर्ध्या तासाच्या कोंबडयाच्या आवाजातील नैसर्गिक रागलोभाच्या संवादात व हावभावात किती किमया भरली होती! आम्ही जणू त्याची भाषा आत्मसात करून संवादातील अक्षरन् अक्षर समजू लागलो. राग, लोभ, द्वेष, मद, मत्सर इत्यादि सारे भाव या नाविन्यपूर्ण कलेने प्रगट होत असताना प्रेक्षकात हास्याचे फवारे उडत होते.

असेच संगीताचे व वाद्यवादनाचे मधून मधून नाविन्यानें ओतप्रत भरलेले असे प्रवेश होत होत शेवटी तासभर एक रगीत चित्रपट दाखविण्यात आला.

रेडिओ सिटीच्या त्या आद्यावत कलाविलासांत मी इतका मग्न होऊन गेलो की बाहेर पडताच सायंकाळचा संधी प्रकाश पाहून, “आं, हे सारे आपण दिवसाच पहात होतो काय?” असा मला प्रश्न पडला! आणि आज, आज तर ही स्वप्नसृष्टीतच जमा झ लेली गोष्ट वाटत आहे.

नानाविध दृष्यें पाहून सायंकाळचें पांच वाजले होते. आज दिवसभर इतकी करमणूक झाली होती कीं त्याचाहि शीण वाटू लागला. हा

शीण घालविण्याकरतां शेजारच्याच एका विचित्र बारमध्यें मी शिरलो. प्रवेशद्वारावर नग्न नटींच्या नाचाचे फोटो पाहून, हा काय प्रकार असावा हे पाहण्याच्या बुद्धीने मी आकर्षिला गेलो. आत बाहेरून आलेल्या माणसाला अधारच वाटावा इतका उजेड होता. माझे एका अर्धनग्न युवतीनें स्वागत केले व एका टेबलाभोवती नेवून बसविले. थोडें सावकाश बसून विस्फारित नेत्रांनी मी पाहूं लागताच अर्धवट शुद्धीवर असलेलें कित्येक लोक, सुरा आणि सुंदरीच्या सहवासात, सुखाच्या साम्राज्यांत वावरत असलेले दिसले. समोर आपण ज्याला अश्लील म्हणू असे नाच चालू होते. आणि फटाफट बाटल्यावर बाटल्या फुटत होत्या.

येथील पेयाची किंमत बाजारापेक्षा चौपट पाचपट मी एक बिअर मागविली व ती सावकाश संपेपर्यन्त या गुहेत चालणारे हे सारे प्रकार पाहून घेतले.

सुधारणेच्या कळसावर पोचलेला झाला तरी तो माणूसच, शेवटी आपल्या जातीवर गेल्या शिवाय कसा राहणार !

खरच आज मला गुर्जराकडे जेवावयास जायचें आहे. त्यांच्या 'जावा इंडिया' कंपनीच्या कचेरीत मागे एकदां मी गेलो होतो. पण आज भूगर्भातील रेल्वेमार्गाने गेल्यामुळें मी जो घोटाळलो तो उलटे सुलटे चक्कर खाऊन अर्धा तास उशीरानेच पोचलो. श्री. रामलाल बाजपेई नुकतेच येऊन बसले होते. श्री. गुर्जरांच्या पत्नी न्युयार्कपासून शेंदोनशे मैलावर असलेल्या एका गावी शिक्षिका असून तिच्या लहरीवर बिचाऱ्याचा संसार चालतो. मुबईच्या प्रसिद्ध बेडेकराचे मसाले व पापड विकण्याचा याचा धंदा येथे उत्तम चाललेला दिसला. मसालेदार भाजी व भात असें अनेक दिवसांत चमचमीत भोजन आणि तेहि हिंदी मित्रासमवेत मिळाल्यामुळे त्या रूचकर अन्नाने ढेकर येईपर्यंत जेवण झाले.

.त्या गोक्त अमरिकन बाईच्या नजरेच्या अिषाऱ्यावर वागणाऱ्या साठ वर्षाच्या गुर्जराकडे पाहून मला त्यांच्या जीवनसौख्याची कीव येत

होती. रामलाल आपल्या 'मिस् इंडिया' म्हणून प्रसिद्ध असलेल्या मुलीचे व जावई रहेमान याचे गुणगान आपल्या प्रेमाने करीत आपल्या गतायुष्यावर तिन्हाइताच्या नजरेने पहात असलेले पाहून मला मौज वाटली.

या माया नगरीच्या वैचित्र्याचा मला आता वीट येऊ लागला होता. न्युयार्कर हॉटेलमधील 'इंटरनॅशनल' लचचा आस्वाद घेवून, परिषदेच्या कार्याची समाप्ती केली व मी मोकळा झालो. पण मला अजून कितीतरी गोष्टी पहावयाच्या उरल्या होत्या.

आता आपण या जगातील सर्वोच्च इमारतीवर चढू या. हा बघा, या एम्पायर स्टेट बिल्डींगच्या ऑब्झरवेटरीचा पहिला टप्पा आणि हे पायाशी लोळण घेत असलेले न्युयार्क शहर, मुंग्यासारखे सूक्ष्म दिसणारे नागरीक आणि असख्य मोटारीची जा ये कशी सुन्दर दिसते आहे. हा फक्त ऱ्याऐंशीवा मजला, चला या कयूमधून! हा बघा लिफ्ट चालला आणखी वर! हा १४७२ फूट उच असलेला शभरावर दोन असलेला मजला. आता तर या आवाढव्य पसरलेल्या या न्युयार्क शहराच्या पलीकडे ऐंशी मैलपर्यंत नजर पोचत आहे. ही बघा हडसन नदी. ही येथे समुद्राला मिळत आहे. आणि तो बघा सुप्रसिद्ध स्वातत्र्य देवीचा प्रचड पुतळा. बारीक सुईसारखा दिसत आहे.

आज सुदर उबदार प्रभात असल्यामुळे हा स्वातत्र्य देवीचा पुतळा पहाण्याला मी निघालो होतो. आमची बस जुन्या भागांतून चालली होती. उचच उच इमारतीमधुन जाणारा हा रूंद रस्ता बोळकंडासारखा निरूद भासत होता.

समुद्रांत दीड मैल आत असलेले हे एक बेडलोई नावाचे बेट आहे. आणि या बेटावर जाण्यायेण्याकरिता तासागणीक बोटी आहेत.

स्वातंत्र्यप्रेमी फ्रेचांनी, अमेरीकनाच्या स्वातंत्र्य प्रियतेवर खुष होऊन हा पुतळा प्रदान केलेला आहे. एकशे बेचाळीस फूट उंचीच्या चबुऱ्यावर ही एकशे एक्कावन फूट ऊंचीची स्वातत्र्यदेवी हातांत दीप-

ज्योत घेऊन उभी आहे. ही आतून पूर्ण पोकळ अशी एक भक्कम इमारतच म्हणाना! तिच्या पायापर्यंत विजेच्या लिफ्टनें जाता येते. आणि वर लोखंडी निरूंद गोल जिने! हे एकांत एक गुंफलेले चढण्या–उतरण्याचें निरनिराळे जिनें व त्यावरून जपून पाऊल टाकणारे नर-नारींचे लोंढे!

हे बघा, हा या पुतळ्याच्या मानेचा भाग. अबब अजून वर पायऱ्या आहेतच. हे बघा आपण आता या मुकुटांत येऊन पोचलो बाहेरून या मुकुटांत जे माणीक, पांचू बसविलेले दिसतात ना त्याला हे झरोके आहेत. आणि या झरोक्यातून दिसणारे ते बघा न्युयार्क.

हा पुतळा पाहून मी खाली उतरलो तो प्रभातकाली पुलकित करणारा सूर्य नारायण ढगानी लपवून ठेविला होता, आणि हवेत इतका बदल झाला कीं पावसाचे तुषार येऊ लागले. वारा अंगाला झोंबू लागला.

मी जो आपल्या निवासस्थानी परतलो तों अंगांत ताप घेऊनच. मला चांगलीच हुडहुडी भरली होती.

# आकाशांतील नाटक

## (अष्टम खंड)

माझीच चूक मला भोवली ! दुसरे काय ! पण होणारे कधी टळत असते काय? मग चूक कसली आणि काय कसलें! बदलत्या हवामानाची तीव्र झळ मला लागली आणि सर्दी, पडसे, खोकला व सडकून ताप अशा चौरंगी हल्याचा सामना मला करावा लागला. स्वातंत्र्य देवीचा तो अलौकिक पुतळा पाहून मी परतलो होतो. आणि ज्या स्वातंत्र्याचे हे एवढें अवाढव्य प्रतीक मानवानें उभारले होतें ते स्वातंत्र्य कुणाचे! आणि कशाचे?

जो जों या स्वातंत्र्याची व्याख्या मी शोधू लागलो तों तों माझा मानसिक ताण वाढू लागला व झोंबणाऱ्या वाऱ्यानें अंग शहारून येऊन शरीरावरहि आपला ताबा नसल्याचे आढळून आले. दूर दूर परदेशात जावे आणि तेथे आजारी पडावे आणि तेहि प्रवासांत कोणी सोबतीला नसतांना !

इस्तंबूलला जातांना अरबी राष्ट्रांच्या प्रवासात आम्ही चवदा जण होतो. आमच्यापैकीं प्रभाकर वैद्य आजारी पडला. आणि हा तर चमूतला प्रमूख खेळाडू. कांग्रेसमधील महत्वाची निदर्शनें जरी पार पडली होती तरी परतीच्या प्रवासात चमूच्या खेळाचे कार्यक्रम रोजचें ठरलेले व तेहि अटीतटीचा लांबलचक प्रवास करून.

प्रभाकराकरतां डॉ. मेहता सारखा माझा उजवा हात मागे ठेऊन त्याच्या औषधपाण्याची व परतीच्या प्रवासाची सारी व्यवस्था मी

केली आणि कार्यक्रमहि बिनचूक पार पाडले. ही सारी माझी जबाबदारी असल्यामुळें ती पार पाडणें माझें कर्तव्यच होते.

पण आज! आज मी या मायानगरीत एकटाच होतो.मला सडकून ताप भरला व मी जो बिछाना गाठला तो तीन दिवस क्वचितच् खोलीच्या बाहेर पडलो. येथे कोण कुणाची वास्तपुस्त करणार ! त्यातून या तीन दिवसांत माझा वाशिंगटनला जाऊन येण्याचा कार्यक्रम निश्चित झाला होता. आपले अमेरिकेतील वकील श्री. गगनबिहारी मेहता यांचेशी भेटहि नक्की करून ठेवली होती आणि नंतरचा न्युयार्कला रामराम ठोकून पुढील प्रवासाचा कार्यक्रमहि निश्चित केला होता. पण आता काय त्याचे ! पडल्या पडल्या मनाचा निश्चय ढळू लागला व भलतीच चलबिचल होऊ लागली. फोनवरून मी परतीच्या विमानाची चौकशीही सुरू केली. असे वाटे की एकदमच पंख लागावे व उडून आपले घर गांठावे.

माझ्या पृथ्वीपर्यटनाचा महत्वाचा भाग पुढेंच होता. पण आज आडवे आलेले हे विघ्न! शरीरावर आपण ताबा ठेवतो म्हणजे काय, ठेवण्याचा प्रयत्न करतो ? कारण हें पंचतत्वाचें बनलेले बाहुले ! त्यावर कांही प्रमाणांत ताबा बसू शकतो. तो कुणाचा ! तर आपल्या मनाचा. आपले 'मन' ही एक अकल्पित वस्तू आहे. तिच्याशी आपण जिवांतजीव असेपर्यन्त शिवाशिवीचा खेळ खेळत असतो. कधी त्याची सरशी होते तर कधी.....त्याची न् याची कसली! मन एकच आणि हे एकच मन सत् आणि असत् अशा द्विधा अवस्थेत माणसाला रंगवून भलतेच विकार उत्पन्न करते.

जो खरा निर्विकार मनाचा माणूस असेल तोच खबीरपणानें अशा पेंचप्रसगातून सहीसलामत बाहेर पडू शकतो. निःस्वार्थबुद्धीने असे अव्यापारेषु व्यापार करीत करीत माझे मन खंबीर असल्याचा निर्वाळा मला नित्य मिळतच होता. आपल्या आप्तस्वकीयापासून असंख्य मैल दूर अशा ह्या मायानगरीत आजारीपणाच्या निमित्तानें ही आणखी एक परीक्षा देण्याचा योग मला प्राप्त झाला इतकेच.

तीन दिवस नुसतेच पडून पूर्ण विश्रांति मिळाल्यामुळें या उपऱ्या व्याधीतून माझी बऱ्याच अंशाने मुक्तता झाली व ठरल्याप्रमाणे उदईक अमेरिकेतून रोचेस्टर, बफेलो, नायगारा, शिकागो, या मार्गाने तीन साडेतीन हजार मैल असलेला पश्चिम किनारा गाठण्याच्या तयारीत मी लागलो.

आजपर्यन्त खऱ्या अर्थाने मी उपवास असा कधीच केला नाही. पण या तीन दिवसात अन्नाचा एकही कण पोटात न गेल्यामुळें, आवश्यक विश्रांति व उपवास अशा या जोडगोळीनें मला खडखडीत बरे केलें. त्या दिवशीं शौचमुखमार्जन आटोपतांच प्रथम चागल्या सकस अन्नाची न्याहरी केली व त्यामुळे बरीच हुशारी वाटू लागली. एकदम बाहेर पडण्याची नित्यासारखी धडपड होवू नये म्हणून एक डॉलर खर्च करून सावकाशीने केस कापून दाढी करून घेतली व गरमागरम फवाऱ्याखाली शेकून चोळून सर्व स्नायू मोकळे करून घेतले. आणि आपली आयुष्याची दोरी चागलीच मजबूत असल्याची खात्री पटून नव्या जोमानें पुढच्या उद्योगाला लागलो.

आज मंगळवार! एप्रिलची सत्तावीस तारीख! आज कार्यक्रम काहीच नव्हता. अशक्तपणा वाटत असल्यामुळें विशेष धावाधावही करावयाची नव्हती गेल्या तीन साडेतीन आठवड्याच्या धामधुमीच्या कार्यक्रमाचे धावते चित्र मी आपल्या मनःचक्षुसमोर उभे केले. त्यात एका गोष्टीचा अजिबात विसर पडल्याचे माझ्या ध्यानात आले.

मी 'रोटेरीयन' ना? मग! ज्याच्या आठ हजारावर शाखा जगातील देशादेशातून पसरलेल्या आहेत, आणि ज्याचे मूळ ह्या अमेरिकेत आहे, त्याची या न्युयार्कसारख्या शहरातली एखादी सभा मला पहायला पाहिजे ना! रोटरीची आठवण येताच त्या 'वाय्' च्या कचेरीत चौकशी केली. चार दोन ठिकाणी फोन केल्यावर 'ब्रॉक्स' विभागांत १२॥ ला एक 'लंच मिटींग' असल्याचा पत्ता मला मिळाला. एकशे एकसष्ट या भूगर्भातील, स्टेशनवर उतरून १५७ रस्त्यावर हे हॉटेल असल्याचा पत्ता घेवून मी निघालो.

भूगर्भातील या १६१ स्टेशनांतून मी बाहेर पडलो तों बाजुलाच एक बेसबॉलचा भव्य स्टेडियम दृष्टीस पडला. याचे नांव यांकी स्टेडियम्. जगप्रसिद्ध खेळाडू याच यांकी स्टेडियममध्यें नांवारूपास येतात.

या १५७ रस्त्यावर जवळच असलेल्या 'प्लाझा' हॉटेलच्या कांहीतरी दहाव्या–अकराव्या मजल्यावर मी जावून पोंचलो. तेथें मी रोटेरीयन पाहुणा म्हणून जाहीर करताच एखाद्या जुन्या मित्रपरिवारांत येवून दाखल झाल्याचा अनुभव मला येवू लागला. भेटेल तो आपली ओळख करून देवून माझी आस्थेनें चौकशी करून स्वागत करूं लागला.

आम्ही जसे नागपुरात आपल्या माऊट हॉटेलमध्ये दर गुरुवारी भेटून एक कुटुंब या नात्यानें मजेत वेळ घालवितो, अगदि तसेच मोकळे वातावरण येथें असलेले पाहून मला या रोटरीच्या अखंड मैत्रीची मौज वाटली.

मी ज्या टेबलावर भोजनाला बसलो होतो तेथे एक वयस्क डॉक्टर माझ्या शेजारी होते. ते 'हु' (WHO) चे एक प्रमुख सभासद असून त्याच 'हु' चे भारतीय सभासद डॉक्टर मुखर्जी याच्याबद्दल ते फार आदरानें बोलत होते.

ही एक तासाची सभा अगदी ठराविक ठशाची. वर्षगाठ असलेल्या सभासदाचे अभिष्टचिंतन, भटक्या सभासदाची ओळख व स्वागत. नंतर पाहुण्याची ओळख व ठराविक वक्त्याचे भाषण, समारोप, विशेष सूचना इत्यादि इत्यादि. पण ह्या क्लबचे एक औरच वैशिष्ठ्य मला दिसून आले. माझी ओळख करून देताच मी त्या दिवशी हजर असणाऱ्या भटक्या सभासदापैकी जास्तीत जास्त लांबून आलेला असल्यामुळे त्या दिवशीची विशेष भेट माझ्या वाटेला आली. मला एक बेसबॉल नजर करण्यात आला. जवळच असलेल्या यांकी स्टेडियममध्यें चालू वर्षातील सामन्यांतून जागतिक प्रसिद्धी पावणाऱ्या खेळाडूच्या त्यावर स्वाक्षऱ्या आहेत. या अमूल्य भेटीबद्दल मी योग्य शब्दांत त्याचे आभार मानले व पुढील प्रवासांत या नव्या नातेसंबंधाची चुकून सुद्धां उपेक्षा न होऊं देण्याचा निश्चय करून तेथून बाहेर पडलो.

आता दुपारचे दोन वाजले होते. सारा दिवस मोकळा होता. पण पायपिटी करून माझी क्षीणता मला वाढवावयाची नव्हती. कारण उद्या सर्व दिवस बसचा प्रवास करावयाचा होता.

मला कसेहि करून 'प्लनेटेरियम' तेवढे पहावयाचे होते. हे न्युयार्कच्या ८१ रस्त्यावर असलेले 'हेडन प्लनिटेरियम' कसे गाठावयाचे याची चौकशी करून मी जवळच असलेल्या भूगर्भातील स्टेशनांत शिरलो.

हें बघा, हे या बागेच्या हिरवळीवर गोल घुमट दिसते तेच तें. मला याची ओळख ताबडतोब पटली. कारण मागें जर्मनीत बर्लीन शहरी हा चमत्कार मी पाहिला होता. आणि तेव्हांपासून पुन्हा जेव्हां जेव्हां हा चमत्कार पाहण्याची संधी मिळेल ती न गमावण्याचेही मी आपल्या मनाशी ठरविलें होते. छत्तीस सालानंतर हा योग आज पुन्हा येत आहे.

पंच्याऐंशी सेंटचे तिकिट काढून मी आंत शिरलो. या अर्धगोल घमटासारख्या सभागृहांत चांदण्या रात्रीचा शीतल संधी प्रकाश दिसत असून वर न्युयार्क शहराच्या नियॉन लाईटच्या विविध रंगांनी लालवटलेलें ढग दिसत होते. चारी बाजूला गोलाकार झुकत्या खुर्च्या मांडून मधोमध काळचाभोर मुंगळयाच्या आकाराचे एक भलें मोठे यंत्र दिसत होते.



तारांगण दाखविणारे यंत्र

हें आकाशस्थ तारांगणाचें एक हुबेहुब नाटक होते. हा आपण नित्य पाहात असलेल्या स्थिर आकाशाचा चलच्चित्रपट होता आणि या गोल घुमटाच्या छतावर विज्ञान युगाचा हा कोणता नवा चमत्कार आपण पहाणार आहोंत या जाणिवेनें सर्व प्रेक्षक मुग्ध होऊन वर पहात होते.

हें बघा भोवतालच्या क्षितीज रेषेवर चालू वसंत ऋतुकालीन फुले उमलत आहेत. आणि हे पहा ढग, तेहि वितळू लागले. संधीप्रकाश जाऊन जणूं अमावस्येची रात्र उजाडली आणि वर आपल्या नित्याच्या ओळखीच्या असंख्य ताऱ्यांनीं सारें आकाश भरून टाकले.

आतां आपण या मानवी बुद्धीनें घडविलेल्या यःकश्चित कृत्रिम घुमटाखाली बसलो आहोत कीं प्रत्यक्ष निसर्गनिर्मित आकाशाखालीं ? छे, हे सांगणें कठीण आहे.

आणि हे बघा. हें शरांकित झोताचे चिन्ह ! या ताऱ्यावरून त्या ताऱ्यावर फिरत आहे व कोपऱ्यांतून तें प्राध्यापक महाशय एकेकाची माहिती सांगत आहेत.

आणि आतां तर, हे बघा आकाशच फिरू लागले. प्राध्यापक महाशय निरनिराळ्या ग्रह, तारका, इत्यादींच्या किती मजेदार गोष्टी सागताहेत! घटकेत पौर्णिमा तर घटकेंत अमावस्या. आपण जसे हाताने गरागर घड्याळाचे काटे फिरवून एका मिनिटात सकाळ, दुपार, सायंकाळ सारे तास वाजवून घ्यावे तसे या आकाशरूपी घड्याळाचे काटेच जणू आपल्या हातांत सापडले असून ते पोरखेळासारखे बसलो गरगरा फिरवीत.

अहो, हे आकाश फिरत नसून आपले डोके तर फिरत नाहींना ? असाहि भ्रम. हा विज्ञानाचा अजब चमत्कार पाहून, क्षणभर झाल्याशिवाय राहात नाही.

हे 'तारागण' (Planetarium) ४८ फूट उच असून त्याचा डायमिटर ७५ फूट आहे. आणि या घुमटाच्या मधोमध रूळावर सरकते हे १२ फूट लांबीचे अजब यत्र आहे. त्याचे पाय आणि आकार अगदी एखाद्या ठसठशीत मुंगळ्यासारखा आहे. या यंत्राला हजारो लेंसेस् असून व्याख्यात्याच्या हाताला‌गत त्याची निरनिराळी शेकडो बटने आहेत. आणि या यत्रसामुग्रीच्या सहाय्याने हे विद्वान प्राध्यापक हवामान, ऋतु, तिथि, नक्षत्र, राशी, ग्रह, ग्रहणें इत्यादि भौगोलिक क्लिष्ट विषयाचे मनोरंजक प्रात्यक्षिक येथें करून दाखवित असतात.

जगांतल्या बहुतेक मोठाल्या शहरांतून अशी 'तारांगणें', खगोल शिक्षण केंद्र म्हणून तेथील सरकारनें उघडली असून ही सारी कर्तबगारी जर्मनीतील 'झाइज' या प्रसिद्ध कंपनीची आहे.

स्वतंत्र भारतानें या शैक्षणिक विषयांत यापुढें मागे राहून चालणार नाही. हिंदुस्थानांत दिल्ली, कलकत्ता, मुंबई अशा कमीतकमी तीन ठिकाणीं ही 'तारांगणें' (Planetarium) ताबडतोब व्हावयाला पाहिजेत.

या गोल घुमटाच्या भोवतालच्या 'लॉबीत' ग्रहमालिकेतील निरनिराळ्या चमत्कारांचे कितीतरी चित्तवेधक नमूने ठेविलें असून हे अजबघर (Museum) पहाण्याकरिता शाळा कॉलेजातील विद्यार्थ्यांचे थवेच्या थवे शिक्षकांच्या देखरेखीखाली नित्य येत असतात.

हा या मायानगरीतील माझा शेवटचा दिवस. परत येतांना एका कॅफेटेरीयांत जाऊन अल्प जेवण घेतले व आपल्या खोलीवर येऊन स्वस्थ पडलों.

# आत्मसमर्पणाचे दोन प्रकार

## (नवम् खंड)

"तुम्ही हा इतका लांबचा प्रवास बसनें करणार!" असें आश्चर्याचे उद्गार त्या अमेरिकन एक्स्प्रेसच्या मॅनेजरानें काढले.

मला प्रथम रॉचेस्टरला जावयाचे होते व तेथून बफेलोमार्गानें नायगाराचा जगप्रसिद्ध धबधबा पाहावयाचा होता. हा सारा तीन ते चारशे मैलांचा प्रवास शक्य तितक्या कमी खर्चात करावयाचा झाल्यास बसनेंच करणें प्राप्त होते.

रॉचेस्टर हे कोडॉकचे मूळ ठिकाण 'कोडॉक'चे नांव कुणाच्या ऐकिवात नाही? फोटो आणि कोडॉक या समानार्थी संज्ञा ज्या जॉर्ज ईस्टम नांवाच्या गृहस्थानें आपल्या अभिनव कर्तबगारीनें प्रचारांत आणल्या त्याचा उगम व प्रचंड स्मारक या रोचेस्टरमध्येच आहे. आम्ही 'पाठक ब्रदर्स' गेली पंचेवीस वर्षे त्यांचे मुंबई व नागपुरांत अधिकृत एजंट म्हणून या आधुनिक कलेची सेवा करीत आहोत.

'कोडॉक' चा संस्थापक 'जार्ज ईस्टमन्' ही एक थोर व्यक्ती होऊन गेली. ज्यानें बॅन्केत चिठ्या पोचविणाऱ्या 'बॉय' पासून आयुष्याला सुरुवात करून दीर्घोद्योगी महत्वाकांक्षेने फोटोची कला सामान्य माणसाची बटीक करून सोडली व पुढे मिळविलेल्या करोडो रुपयांचा गुप्त दानधर्म केला. ज्यानें आपल्या ७२,००० कामगारांच्या सुखी आयुष्याची काळजी वाहून स्वतः कुटुंबाच्या कधीं भानगडीतच पडला नाही. त्यानें आपल्या

वयाच्या ७८ व्या वर्षीं छातींत कांहि व्याधी सुरू झाल्याचें डॉक्टरांनी सांगतांच स्वत:च गोळी घालून निरुपयोगी होत असलेल्या देहाची समाप्ती करून घेतली. अशी ही अजब व्यक्ती होती!

मी अमेरिकेत जाणार हे कळताच कोडॉककडून मला रीतसर आमत्रण येवून थडकले. आणि मलाहि हा सूप्रसिद्ध कारखाना प्रत्यक्ष पहाण्याची संधी दवडावयाची नव्हतीच.

मी सकाळी ८। ला निघणाऱ्या ग्रेहाऊंड कंपनीच्या कोचनें न्युयार्क सोडले. तब्बल बारा तासाचा हा प्रवास होता. पण कुठें मिनिटा सेकंदाला धावणारी ती सुखासीन बस व कुठें आपल्या इकडील रेल्वे अगर मोटारीचा प्रवास.

या बसमध्ये पहिली आणि महत्वाची गोष्ट म्हणजे ड्रायव्हरचे नाव व त्याने कोणताहि अॅक्सीडेंट न करिता कंपनीची केलेली सेवा इत्यादि वर्णनांची समोर लावलेली ठळक पाटी. विमानासारखीच प्रत्येकाला बसण्याला आरामखुर्चीवजा स्वतंत्र जागा, दर दीडदोन तासानें दहा, पंधरा अगर वीस मिनिटे उतारूंना पाय मोकळे करण्याकरिता, अगर वेळेनुसार चहा, फराळ, जेवण उरकण्याकरिता, ठराविक स्टेशनावर मुक्काम. रेल्वे सारखीच या ग्रेहाऊड बस कंपनीची जागोजागी प्रशस्त स्टेशनें असून त्यांत प्रवाशांना आवश्यक त्या सुखसोयी असतात.

वाटेने अमेरिकेतील अद्यावत पद्धतीची रेखीव शेती, खेड्यांचे सुन्दर स्वच्छ स्वरूप आणि औद्योगिक कारखान्याचे चोहीकडे पसरलेल्या जाळ्यांचे अनुपम देखावे पहात पहात मी हा प्रवास संपविला

रात्रीं ८ वाजता मुक्कामाला पोचताच तेथेहि 'वाय्' मध्ये मी आगाऊ रिझर्व्हेशन केल्यामुळें ताबडतोब आपली खोली गांठली व अल्पोपहार करून रात्रभर विश्रांती घेतली.

कोडॉकच्या 'आतर्राष्ट्रीय हितसंबंध' खात्याचे मॅनेजर श्री. रेनॉर यांना मी आज येथें येणार असल्याचे आगाऊच कळविले होते. त्यांचा

नवाला फोन आला व अमक्या अमक्या ठिकाणी ऑफीसमध्ये आपण यावे असा त्यांचा संदेश आला.

रॉचेस्टरच्या मेन स्ट्रीटवरील त्याच्या मध्यवर्ती कचेरींत पोचतांच माझे योग्य स्वागत होऊन निरनिराळ्या खात्यांच्या प्रमुखांशी माझी ओळख करून देण्यांत आली. जगभर पसरलेल्या कोडॉकच्या शाखा उपशाखांचे सुसंघटीत नियंत्रण करण्याचें हे मध्यवर्ती ठिकाण. फोटोग्राफीत जे अनेकविध प्रकार आहेत त्या सर्वांचे तेथें एकएक आवाढव्य खातें असून त्यांत सप्रयोग काम करणारें निवडक तज्ञ आहेत त्या अवाढव्य कचेरींत स्त्रीपुरुष कामगाराची सारखी जा–ये सुरू होती.

तब्बल तीन तास 'मायक्रोफोटो' च्या खात्यातून 'एक्सरेच्या' खात्यात तर 'कलर फोटोग्राफीतून' 'हॅन्ड रायटींगच्या' खात्यात, या लिफ्टमधून वर जा, तर दुसऱ्या लिफ्टमधून खाली यें, असे फिरता फिरता जेवणाची वेळ झाली व त्यांच्या कॅफेटेरीयामध्ये आमचें सहभोजन झाले. मुख्य मॅनेजरापासून तो टेलिफोन गर्लपर्यंत सर्वांना येथे सारखीच वागणूक. भेदाभेद मुळीच नाही.

दुपारी तेथेंच असलेला कॅमेरा व लेन्सचा कारखाना पाहिला व दुसरे दिवशी कोडॉकपार्क नावाचा त्यांचा मुख्य कारखाना पाहण्याचें ठरविले. कामाचें तास संपल्यामुळें सगळी कचेरी रिकामी होऊन सारे स्त्रीपुरुष कामगार बाहेर पडू लागले, तसा मीहि बाहेर पडलो.

'कोडॉक पार्क' हा साडेपाचशे एकर जागेवर वसलेला प्रचंड कारखाना कोडॉकच्या अनेक कारखान्यापैकी एक आहे या कारखान्यांत आतल्याआत नेआण करण्याकरिता त्याची स्वतःची आगगाडी आहे येवढे सांगितले म्हणजे पुरे.

'जॉर्ज' बँकेंत नोकरी करीत असताना पैसे पुरेनात म्हणून 'अमेच्युर' फोटोग्राफर झाला. त्यावेळी फोटोग्राफी करावयाची म्हणजे ती प्रचंड सामुग्री कावडीने खांद्यावर बाळगून फिरवावी लागे. जार्जने हे लचांड कमी करून ते सुटसुटीत करण्याचा ध्यास घेतला व त्याच्या महत्वाकांक्षेचे

फळ म्हणजे आजच्या लहान मुलानी लीलेने फोटो काढण्याचा 'कोडॉक. कॅमेरा. पण महत्वाकाक्षा एकच की 'गुंतागुंत' सोडवून कोणत्याहि कामात सुटसुटीतपणा आणायचा आणि या लहानशा दिसणाऱ्या महत्वाकांक्षेच्या पोटी स्वार्थाची कुठलीच भावना नसल्यामुळे जार्जने शास्त्रीय संशोघनाचे, कामगाराच्या सुखी जीवनाचे आणि एका नाविन्यपूर्ण कलेच्या प्रचंड विकासाचे केवढे मोठे कार्य केले हे दिसून येईल.

जार्ज इस्टमनच्या थोर व्यक्तिमत्वाची छाप या कारखान्यावर इतकी पडली आहे की कॅमेऱ्यामधील एक लहानसा स्क्रु निव्वळ ढिला जरी झाला तरी जशी फोटो घेण्याची क्रिया यथार्थतेने साध्य होऊ शकत नाही तद्वत येथील प्रत्येक कामगार व्यक्ती महत्वाची गणल्या जाते.

जार्जने आपले सारे आयुष्य वेचून फोटोग्राफीच्या कलेला संपूर्णावस्थेला आणून सोडले त्याचप्रमाणे त्याचे आत्मसमर्पण! प्रकृतीमान आपल्या हातात राहिले नाही असे पहाताच आथरूणावर खिळून दिवस काढणे त्याला व्यर्थ वाटले. त्याने आपल्या कायदेपंडिताना बोलावून आपले 'वुईल' तयार करविले. करोडो रुपयाच्या स्वकष्टार्जीत कमाईतील पैनपै त्याने सार्वजनिक कार्याला देवून टाकली व त्यावर शेवटची स्वाक्षरी करून आपल्या खोलीत आला. खोलीचा दरवाजा बंद करून एका कागदावर इतकेच लिहून ठेविले.

"माझे जीवनकार्य संपले, आता मी कशाची वाट पाहू ?"

नंतर आपल्या बिछान्यावर पडून छातीत दुखत असलेल्या विवक्षित स्थळावर पिस्तुल रोखले व चाप ओढला आणि अशा तऱ्हेने आपल्या आयुष्याची समाप्ती करून घेणारा जार्ज ईस्टमन 'कोडॉक'च्या रुपाने अमर झाला.

ज्या कलात्मक व्यवसायाशी माझ्याप्रमाणे असंख्य मानवाचे जीवन निगडित झाले आहे अशा समव्यवसायी उद्योगपतीच्या ज्वलंत कर्मभूमीचे दर्शन घेवून मी पुढे निघालो.

त्याच ग्रेहाउंड बस क. च्या कोचने, बफेलोवरून नायगाराफॉल्स गांठले. नायगारा हा शब्द माझ्या जणू फार जुन्या ओळखीचा कारण आम्ही भुगोलात जगातले हे एक महान आश्चर्य म्हणून या धबधब्याचा पाठ घेतलेला कधीच विसरणार नाही. अमेरिकेविषयी इतर कांहीहि माहिती असो अगर नसो पण नायगाराचा धबधबा ही घटना जगातील सात आश्चर्यांपैकी एक आहे हे सर्वांना माहीत आहे.

आज केवढे माझे भाग्य की ही निसर्गाची अजब कलाकृती प्रत्यक्ष पहाण्याचा योग मला प्राप्त होत आहे.

आपण भारतीय तीर्थयात्रेचें भारी शौकिन व चारीधाम पाहून आलो की जीवनाचे सार्थक झाले असे मानतो. या परपरेला धरून माझ्या या पृथ्वीप्रदक्षिणेच्या महान यात्रेत, एक एक विलक्षण परंधाम पाहून पावन होत होत मी पुढे चाललो होतो.

यापूर्वी चार दोन बारीक सारीक धबधबे मी पाहिले होते जबलपूर येथील भेडाघाटची धुव्वाधार तर आपल्या प्रातात सर्वांच्या परिचयाची आहेच. पण धबधबा म्हटला की ऊच पहाड व त्यावरून वेगाने वहात येणाऱ्या पाण्याच्या धारा.

बफेलोहून नायगारा फॉल्स हे ठिकाण अवघे एक तासाच्या रस्त्यावर आणि हा सारा मार्ग नायगारा नदीच्या काठाकाठाने गेलेला असून धबधब्याच्या थोडे अगोदर एक छोटेसें 'ग्रॅंड आयलड' नावाचे बेट तयार झाले आहे. त्यावरून जाताना केवढाले अवाढव्य पूल जागोजागी ओलाडावे लागतात.

या नायगारा शहरात मी सकाळी १० ला पोचलो. हे छोटेसे शहर फारच सुदर असून अंतर्राष्ट्रीय यात्रेचे याला स्वरूप आलेले आहे.

माझ्याबरोबर एक स्वीडनचा शेतकरी होता. त्याला इग्रजी येत असल्यामुळे व येथील बरीच माहिती त्याला असल्यामुळे मला वेगळा गाईड घेण्याची गरज पडली नाही.

बस क. च्या टरमिनसमधून बाहेर पडून बाजूच्या पार्कमध्ये आम्ही आलों तो नायगारा नदीचा प्रवाह प्रचंड वेगानें वहात असलेला दिसला. धबधब्याच्या 'धोऽधों' चें मधुर संगीत कानांत घुमू लागले पण कोठें पर्वत अगर दऱ्याखोऱ्यांचे नावनिशाणहि दिसेना. मी माझ्या मित्राला विचारलें ' हा धबधबा येथून कितीसा लाब आहे ?" तो म्हणाला, " लांब, लांब कसचा! हा प्रचंड आवाज तुला ऐकू येत नाही का ?" ' आणखी थोडे पुढे जाऊन त्या कठड्याशी आपण गेलो की, दिसेल धबधबा."

तें ऐकून मी सुन्नच झालों माझ्या साऱ्या कल्पनांचा पार धुव्वा उडाला. एक मिनिट असें वाटले की, या अमेरिकन लोकांना राईचा पर्वत करून जाहिरातबाजी करण्याजी कला उत्कृष्ट साधली आहे. हा असा साधा धबधबा वाचलेल्या वर्णनाप्रमाणे जगातल्या सांत आश्चर्यांपैकी एक कसा होऊ शकतो?

आम्ही चालत थोडे पुढे गेलो व नायगारा नदीच्या वहात्या प्रवाहालगत असलेल्या कठड्याशी जाऊन उभे राहिलो नदीचे पात्र या ठिकाणीं एकदम १६७ फूट खोल गेलेले. नदीच्या पलिकडच्या कांठावर कॅनडाची हद्द. या धबधब्याचे दोन भाग पडलेले आहेत आम्ही उभे होतो अमेरिकेच्या बाजूने हा एक हजार फुट रुंदीचा पाण्याचा ओघ त्या खोल दरीत धडपडत होता. पलीकडे घोड्याच्या नालेच्या आकाराचा कॅनेडियन फॉल. याची रूंदी २५०० फुट. या पाण्याचा वेग एका सेकंदाला २३५००० घन फूट इतका आहे.

साधारण एक मैल रुंदीचे हें नदीचें पात्र आहे. पाण्याच्या तळाशीं नजर टाकली की घुसळून निघणाऱ्या शुभ्रफेसांचें ते विचित्र मंथन पाहून काय वाटत असेल बरें ! प्रचंड वेगानें सतत आपटणाऱ्या धारेतून निघणाऱ्या फवाऱ्याचे स्रोत मधून मधून वर उफाळत व त्यांतून निर्माण झालेल्या ढगामुळे मागचा कॅनेडियन हार्सशू फॉल दिसेनासा होई.

या 'प्रास्पेक्ट पॉइंटवरून' थोडें पुढें जाताच 'हेनेपिन' पॉइंट लागतो येथून या दोन्ही फॉल्सचे एकसमयावच्छेदेकरून होणारे दर्शन फारच हृदयस्पर्शी असें दिसतें. फादर लुई हेनेपीन या फ्रेंच पाद्री

बघा एक तळघर आहे. येथून आम्ही विजेच्या लिफ्टमध्ये बसून १६७ फुट खाली गेलों. आतां आम्ही धारेच्या तळाशी आलों असून वर मान करून सारा चमत्कार पाहात होतों. बोगद्यातून बाहेर पडतांच आंगावर फवाऱ्याचे तुषार उडू लागले. कांही लोक फवाऱ्याकडे जाण्याचा प्रयत्न करायचे व दहावीस पाऊले जात नाही तोंच ओलेंचिब होऊन मागल्या पायी धावत येऊन त्या कांचेच्या गृहांत शिरायचें. काय मजा वाटत होती.!

या स्थळाला 'मेड ऑफ दि मिस्ट' असे नामाभिधान प्राप्त झालें आहे. या नांवात एक मोठी हृदयंगम ऐतिहासिक कथा गोविलेली आहे.

रेड इंडियन्सची येथें मूळ वस्ती. निसर्गाचें हें प्रचंड स्वरूप आपल्याला केव्हांहि ग्रासू शकते इतकी त्याची त्यांना भीती वाटत असे. त्या धबधब्याच्या भयानक ध्वनीतून राक्षस डरकाळया फोडीत आहे अशी त्यांची कल्पना. या राक्षसाला शांत राखण्याकरितां वर्षांतून दोन वेळा त्या टोळीतील लावण्यवती तरुणीचें जिवंत बलीदान देण्याचा समारंभ होत असे. अशा निवडक तरुणीला पुष्पमंडित करून एका पांढऱ्या शुभ्र नावेंत मोठया थाटामाटानें बसवावयाचें व ती नांव धारेवरून खाली सोडायची.

या भयानक दृष्यावर अनेक लोकगीते प्रचलित आहेत. अशा एका लोकगीतात 'ईगल आय' नांवाच्या टोळीच्या नायकाच्या प्रेमळ साहसाची मोठी हृदयभेदक कथा सांगितली आहे. 'लेलावाला' हे त्या नायकाच्या मुलीचें नाव. तिच्यावर बलीदानाचा घोर प्रसंग होता. शेवटच्या क्षणाला त्या कोवळया बालेचे चित्त विचलित झालें. तिच्या त्या निरपराधी कारुण्यमय बली मूर्तीची भेदक नजर पित्यावर पडली मात्र! पित्याचें अंतःकरण ते! पिळवटून निघाले. एका क्षणांत त्यानें जवळच्या दुसऱ्या नावेंत उडी घेतली व त्या एकुलत्या एका मुलीला वांचविण्याकरितां झेप टाकून तोहि तिच्या पाठोपाठ विद्युत्वेगाने निघाला.

हा वेळपर्यंत मुलीची नांव धारेवरून खाली घसरली होती. आणि 'एकसे दो भले' या न्यायानें त्या राक्षसी धारेनें दोन्ही अंतःकरणें एकदमच घुसळून एकजीव करून टाकली.

अशा भयानक धाडसाच्या आधुनिक सत्यकथाहि अनेक आहेत त्याचा परामर्ष पुढच्या खंडांत घेऊं.

# उद्योगपति नायगाराची जादूगिरी

## (दशम खंड)

शेकडो मैल लांबरूंद पसरलेली जी पांच प्रचंड सरोवरांची मालिका युनायटेड स्टेटस् व कॅनडा यांच्या मधोमध आहे त्यापैकी 'लेक इरी' व 'लेक ऑंटेरिओ' या दोन सरोवरांची हातमिळविणी करणारी एक लहानशी नदी ती नायगारा. या दोन सरोवरांच्या पातळीतील ३२६ फुटांचे अंतर तीस मैलांच्या छोटयाशा नदीने कापताना कोण चमत्कार घडवून आणले आहेत !

'इरी'तील धावत्या पाण्याच्या लोंढयाने हा जो तीस मैलांचा ऑंटेरीओच्या सखल पातळीत उतरण्याचा मार्ग पत्करला, तो सारा निसर्गाचा चमत्कार निरनिराळया ठिकाणावरून पहाताना पाहाणाराला कसा मंत्रमुग्ध करून भारून टाकतो याची वर्णने अनेकांनी केलेली आहेत.

'डेव्हिड कॉपरफिल्ड' चा प्रसिद्ध लेखक चार्लस डिकन्स याला नायगाऱ्याच्या खडकाळ किनाऱ्याच्या चबुत्र्यावर उभे राहून सभोवार नजर फिरविताच प्रत्यक्ष स्वर्गात उभे असल्याचा भास झाला. त्याला वाटले आपण परमेश्वराच्या प्रत्यक्ष सान्निध्यात आलो असून चिरशांतीचा अनुभव घेत आहोत. त्याला ते प्रचंड, शांत, गंभीर स्वरूप पाहून भीति अगर दुःखाचा लवलेशहि शिवला नाही. उलट त्याचे मन इतके प्रसन्न झाले कीं, त्याच्या उदात्त विचारांना चालना मिळाली.

नायगाराचे ते अभिनव स्वरूप पाहून गेलेल्या अगणीत लोकात रावापासून रंकापर्यंत व कवि, कलावत, महत, साधुसंत, विचारवंत या साऱ्यांनी हे निसर्गाचे भव्योदात्त स्वरूप पाहून तोंडांत बोटेंच घातली आहेत.

चार्लस् किंग्सले सारखा महान इंग्रज कवि निसर्गाचे ते विशाल वैभव अतृप्त नयनाने पहात दिवसचे दिवस घालवित असताना त्याच्या त्या नाजुक रगरूपाच्या छटा आपल्या अतःकरणावर कायमच्या कोरून ठेवण्यांत रंगून गेला होता.

या जलसिंहाच्या भयानक गंभीर गर्जनेची वर्णने स्थानिक रेड इंडीयन्सकडून अनेकानी ऐकली होती. पण त्या अनोळखी निबीड जंगलांतून हिंमतीने पुढे जाऊन या विश्वरूपाचे पहिले दर्शन घेण्याचे भाग्य हेनेपीन नांवाच्या एका धाडसी फ्रेंच पादऱ्याला लाभले आणि आज त्याचे नांव या नायगाराशी कायमचे निगडीत झालेले आपण पहात आहोंत.

हेनेपिनने त्याकाळी रानटी पशूंचा लीलेने घास घेणाऱ्या त्या अक्राळ विक्राळ धाराची भयानक मौज पाहिली. ते बुद्धिहीन प्राणी या निसर्गाच्या अचाट शक्तीचे सामर्थ्य आकलन करण्याला असमर्थ होते. पतंग जसा दिव्याच्या दीप्तीला दिपून न कळत आत्मसमर्पण करून घेतो तद्वत हे पशू, या अजब प्रवाहाने व त्याच्या त्या कर्णमधूर संगीताने आकर्षून धावत्या धारेत उडी घेत व त्या प्रचंड मंथनांत विलीन होत. अडीचशे वर्षांपूर्वी हेनेपिननें पाहिलेलें ते दृष्य आणि आज! आज मानवाच्या बुद्धीनें घडवून आणलेले हे आविष्कार !

आज तेथील घनघोर निबीड जंगल पार अदृष्य होऊन नायगाराच्या दोन्ही अंगाला दोन बलाढ्य राष्ट्रांची निर्मीति झालेली आहे. त्या प्रचंड धाराची शक्ती वेठीस धरून शहरेच्या शहरे प्रकाश झोतांनी उजळून निघाली आणि दोन्हीहि देशातील अनेक औद्योगिक चक्रे विनासायास गरागरा फिरू लागली. कुठे तो बुद्धिहीन पशूंचा फुकट आत्मसर्पणा चा खेळ आणि कुठे ही मानवी बुद्धिची अचाट करामत!

निसर्गाची शक्ती आणि मानवाची युक्ती याच्या युतीने औद्योगीक विकासाच्या क्षेत्रांत अतुलनीय भर पडलेली आहे हे जरी खरे असले तरी नायगाराच्या सान्निध्यांत उभे राहून त्याचे अभिनव सौंदर्य पहात पहात जी प्रसन्नतेची अनुभूति प्राप्त होऊन प्रेरणा मिळते ती, ती का घरबसल्या विजेच्या तारातून अनुभवता येईल ?

आम्ही अमेरीकन विभागाच्या प्रास्पेक्ट व हेनेपीन् पाईंटवरून दिसणारे दृश्य अवलोकन करून 'गोट' बेटाला जोडणाऱ्या पुलावरून 'हार्स शू फॉलच्या' मधोमध नेऊन सोडणाऱ्या दुसऱ्या एका छोट्या पुलावर जाऊन उभे होतो. नायगारा नदीचे 'इरी'कडून वहात येणारे रुद पात्र याठिकाणी 'गोट' बेटाने विभागले जाऊन अमेरिकन फॉलस् व कॅनडीयन फॉलस् असे त्याचे दोन विभाग होतात.

अहाहा ! आत्ता कोठे या नायगाराच्या विशाल स्वरूपाचे थोडे थोडे आकलन होऊ लागले. चोहोकडे पाणीच पाणी. मागून सतप्त वेगाने उसळत येणारा हिरवागार स्वच्छ प्रवाह. उजवी डावीकडे त्या प्रवाहाचा प्रचंड कडेलोट आणि समोर, समोर खाली खोल गर्तेत घुसळून वर उडणारे कुशाग्रवत धवल कणराशी.

असंख्य पैलूपैलूतून परिवर्तीत किरणमालिकाना जन्म देणाऱ्या दुर्मिळ हिऱ्यामाणकाची जणू निसर्गाने माडलेली ही अमाप उधळपट्टीच ! आकाशाचा नीलवर्ण व आजुबाजुच्या भूभागावरील नाजुक हिरवळ यांच्या मिश्रणाने त्या बिंदुबिंदुच्या चलबिचलीतून होणारे परावर्तन 'तानापिहिअनिजा' अशा सप्तरगात प्रदर्शित होणारी रंगसंगती ! जातीवंत कलावंत तर राहोच पण या अनुपम सौन्दर्याच्या सान्निध्यांत उभ्या असणाऱ्या प्रत्येकाला जी एका निराळ्याच अनुभूतीची प्रचीति येते तिलाच आपण कलावताची दृष्टी म्हणून ओळखतो.

अँथनी ट्रोलोप हा प्रसिद्ध इंग्रज लेखक आपले नायगाराचे अनुभव सांगताना म्हणतो की, नायगारा पहिल्याचा दावा त्यानेच

करावा की ज्याला ते विलोभनीय दृष्य पहात तासचे तास उभे असताना आपल्या विचाराची परीसमाप्ती झाल्याचा अनुभव प्रतीत होतो व प्रत्यक्ष सारे विश्वच समोर उभे असल्याचा भास होतो.

माझा स्विडीश मित्र व मी त्या पुलाच्या कठड्याशी किती तरी वेळ जादूने भारल्यासारखे भिरीभिरी पहात उभे होतो. जो जो तेथे येई तो स्तब्धपणे थिजल्यासारखा उभा राही. माझ्या मित्राने पलीकडील ल्युना बेटावर चलण्याच्या एक दोन वेळ सूचना करून पहिल्या. मला त्या ऐकू येत नव्हत्या असे नव्हे. पण त्याचा अर्थ लक्षात येण्यापूर्वीच त्या तेथील स्थानमहात्म्याच्या नादब्रम्हात केव्हाच वीलीन होऊन अर्थहीन असल्याचा भास होई. शेवटी तो बिचारा थोडा पुढे झाला व मी किंचित भानावर येताच त्याच्या मागोमाग निघालो.

हे बघा हे नवपरीणत युगुल आपल्या प्रिय परिवारासह त्या निसर्गाच्या पार्श्वभूमिवर आपले फोटो घेत आहेत. त्याच्या प्रेमी आयुष्यातील 'पहिली रात्र' आज या निसर्गसौन्दर्याच्या सान्निध्यांत साजरी होणार आहे. त्या नववधूचा तो तलम फुलपाखराच्या रंगाचा झगा वाऱ्यावर सारखा उडत आहे. आणि तिची ती सावरण्याची तारांबळ! साऱ्या बघ्याची दृष्टी विचलित झाल्यासारखी दिसते आहे. कुठे मानवाच्या क्षणिक सौख्याचा हा खेळ आणि कुठे मती कुठीत करणारे निसर्गाचे ते नित्य स्वरूप!

तब्बल चारपाच तास आम्ही भटकत होतो. क्षणकाल तहान भूकहि विसरलो होतो. पण पायाची शक्ती राखण्याकरीता इंजीनात कोळसा भरणे आवश्यक होते ना! एका प्रशस्त व स्वच्छ उपहारगृहात विश्रांति घेत दुपारचे भोजन आटोपले. पण फार वेळ तेथे बसवेना. आम्हाला अजून कितीतरी पहावयाचे होते

आता आम्ही थोडी शहराची मजा पहात पहात कॅनडाला जोडणाऱ्या जंगी पुलाकडे आलो. पुलावरून पलीकडे जाऊन कॅनडातून दिसणारे दृश्य मी पाहू शकलो असतो. कारण माझेजवळ कॅनडाचा पासपोर्ट

होताच. पण त्या मित्राजवळ तसा व्हिसा नव्हता. तो पडला स्विडीश. हिंदुस्थान हे कॉमनवेल्थचा घटक असल्यामुळे कॉमनवेल्थच्या इतर घटक देशामध्ये प्रवेश करण्याला निराळा व्हिसा लागत नाही. असो. पण मी एकटा जाण्याचा विचार सोडला व बाजूला वीजउत्पादनाचें असलेले केंद्र पाहून परत प्रास्पेक्ट पाईंटवर आलो व त्या विश्वरूपाच्या सान्निध्यात उरलेला सारा वेळ घालविला

सायकालीन तिरीप कोवळी होत होत क्षितीजाला जाऊन भिडली आणि शेवटी सधिप्रकाशात ते दृष्य विलीन होत दिसेनासें होऊ लागले. आता तर अंधाराच्या साम्राज्यांतून कर्णरंध्रावर येऊन आदळ-णाऱ्या गभीर गर्जना अतृप्त नयनाला हिणवीत असल्याचा भास झाला. पण हे बघा ! ही मानवी बुद्धीने प्रदान केलेली दिव्य दृष्टी ! पली-कडील कॅनेडियन हद्दीतून एकाएकी विद्युत प्रकाशाचे झोतावर झोत उजळू लागले. तें क्षणकाल विलीन झालेले दृष्य पुन्हा प्रकाशित होत आहे. जणू हा मध्यरात्रीचा मानवनिर्मीत सूर्य क्षितीजावर उदय पावू लागला. त्या नायगाराच्या प्रचंड शक्तीलाच वेठीस धरून मानवाने वद्युल्लतेचे आवाहन केले व हा चमत्कार घडवून आणला.

काळयाकुट्ट पार्श्वभूमीवर दृग्गोचर होणारे ते मायावी धोधोस्वरूप विशाल मानवी बुद्धीची साक्ष प्रत्यक्षात पटवीत असून सुद्धा ते निसर्गाचे भव्योदात्त स्वरूप पहात समोर उभा असलेला मानव मी मनोमय शरण आल्याची कबुली देऊन केव्हाच मोकळा झालो होतो.

या नायगाराचे सारेच पैलू पहाण्याचे भाग्य प्रत्येकाला लाभणें शक्य नाही. ऋतुमानाप्रमाणें या निसर्गचित्रांत घडून येणारे विविध बदल अगणित आहेत. अमेरिकेचा हा उत्तरेकडील भाग हिवाळयात बर्फमय होतो आणि असे शून्याच्या कितीतरी खाली उतरणारे कडाक्याचे थंड हवामान नायगाऱ्याच्या वहात खाली पडणाऱ्या धारांना एक नवीनच स्वरूप प्राप्त करून देते. पाण्याच्या धावत्या धारा गोठून निरनिराळया आकारात जागच्याजागीच स्थिर होतात. चेटक केल्यासारखे हे जादू भरलेले दृश्य पाहून मानवाच्या धाडसाला नवीनच चेतना मिळते.

आपल्या धाडसाची प्रचीति दाखवून प्रसिद्धी मिळविण्याच्या खटाटोपांत अनेक जीवानीं या ठिकाणी उघड्या डोळ्यांनी जलसमाधी घेतलेल्या आहेत.

धबधब्याच्या धारेवर ऊंचचऊंच शिड्या उभारून त्यावरून उड्या घेणें, इकडून तिकडे दोर ताणून त्यावरून चालत जाणे, लोखंडाच्या पिंपात स्वतःला बंद करून तो पिंप प्रवाहात सोडून धारेबरोबर घुसळून वहात जाणें आणि शेवटी बर्फमय धारेवरून चालत जाणें अशा एक ना अनेक मूर्खपणाचे धाडशी प्रकार येथें नेहमीच चालू असतात.

१९२८ मध्यें रबराचा एक भलामोठा चेंडू मुद्दाम तयार करवून जीन लॉशरने त्यात बसून या धावत्या धारेतून प्रवास करण्याचा यशस्वी चमत्कार करून जगाला थक्क करून सोडल्याचें पुष्कळांच्या वाचण्यांत असेल.

क्रीडासौख्याच्या मर्यादा उल्लंघून घातपातात जीवाला मुकल्याची भयानक करुण कहाणी १९१२ साली घडली व ती "बर्फाच्या पुलाची विदारक घटना" म्हणून प्रसिद्ध आहे.

नायगारा नदीच्या पात्रावर एका पॉईंटपासून दुसऱ्या पॉईंटवर जाण्याकरिता एक लोखंडी पूल आहे. बर्फाचे मोठाले तुकडे वहात वहात येऊन या पुलाला अडकले व त्याच्या रांगेतून बाजूच्या काठाने त्या पुलावर चढण्याचा एक नवीनच अभिनव पूल तयार झाला. पन्नास प्रेक्षकाची एक टोळी या बर्फाच्या पूलावरून चढून जाण्याची मौज करायला निघाली. अर्ध्या वाटेवर हे लोक पोचताच पायाखालचे बर्फ कडाकड आवाज करून एकाएकी दुभगू लागले. आणि मग त्याची ती जीव वाचविण्याची धावपळ! बहुनेकानी धडपड करून किनारा तर गाठला पण मागे राहिलेल्या तिघावर मृत्यूची झडप पडली, ती चित्त थरारून सोडणारी अद्भुत कहाणी करुणास्पद आहे.

एल्ड्रीज स्टॅन्टन आपल्या नाजूक प्रिय पत्नीचा हात धरून किनारा गाठण्याच्या धांवपळींत असतानाच त्याच्या समोरच्या बर्फाला चीर पडू लागली, तसा तो भयानक किंकाळी फोडुन 'वाचवा वाचवा' म्हणून ओरडू लागला.

त्यांच्याचपुढे धांवत असलेला एक युवक बरेल हिकॉक ही करूण किंकाळी ऐकून गहिवरून मागे परतला. त्याचे धैर्य अवर्णनीय असले तरी त्याला हे काळाचेच निमंत्रण होते. आणि त्याचवेळी दुर्दैवाने त्या बर्फाच्या पुलाचें तुकडे झाले. स्टँटन जोडप एका तुकड्यावर व हिकॉक दुसऱ्या तुकड्यावर प्रवाहाबरोबर धारेच्या रोखाने वाहात निघाले. किनाऱ्यावरून पाहणाऱ्याचे अंतःकरण हे प्रत्यक्ष मृत्यूच्या दाढेत ओढल्या जाणाऱ्या जीवाचे दृष्य पाहून थरारून गेले. एकच आरडाओरड मचली. फायर ब्रिगेडचे लोक मदतीस धांवून आले. हिकॉक ज्या बर्फराशीवरून चालला होता तो पुढे होता. मागून त्या जोडप्याला मृत्यूकडे खेचणारी हिमराशी वाहत होती.

फायरब्रिगेडच्या कामगारानी शिकस्त करून पलीकडच्या एका लहान पुलावरून १८० फूट खाली दोर सोडला. तो महत् प्रयासानें हिकॉकच्या हाताला लागला व त्यानें तो गच्च धरताच दोर वर ओढला जाऊ लागला. पण दैवदुर्विलास ! हिकॉकची थंडीनें गारठलेली बोटे दोरावरची पकड फारवेळ टिकवू शकले नाहीत व अगदी शेवटच्या क्षणाला त्याची पकड ढिली पडली व बिचारा धाडकन खाली पडला व त्या वेगवती धारेवरून खाली घसरून क्षणार्धात त्या कराल मृत्यूच्या दाढेत विलीन झाला.

मागून येत असलेलें दुर्दैवी प्रेमी युगुल हा सारा प्रकार पहात होते मृत्यू त्याच्या समोर आ वासून उभा होता. त्यानीं गुढगे टेकून त्या करूणाधनाची प्रार्थना सुरू केली. किनाऱ्यावरील लोकानी विफल अंतःकरणानें त्याच्याबरोबर करुणा भाकण्यास सुरवात केली.स्टॅन्टननें आपल्या ओव्हरकोटात पत्नीला लपेटून घेतले व उघड्या डोळ्यांनी मृत्यूला कवटाळले.त्या धावत्या धारेवरून झालेला कडेलोट प्रत्यक्ष पहात असलेल्या प्रेक्षकाच्या अंगावर शाहारे उठले.

रात्री दहापर्यंत हे अशा अनेक अद्भुत घटनांना जन्म देणाऱ्या नायगाराचे दृष्य मी पहात उभा होतो. आता वाराहि सोसाट्याचा सुटला व थंडीहि असह्य वाटू लागली. शेवटची बस गांठून मला बफेलोला परतणें भाग होते. 'नाना रत्ना वसुधरा' असें म्हणत मी जड अंतःकरणाने मागे परतलों.

---

# शिकागात काय दिसले !

## ( एकादश खंड )

### चकवा ड्रायव्हर–घडीची लाट–रोटरीचे केंद्रस्थान

### नगर पालिकांची महनीय कामगिरी

नायगारा ते बफेलो हा सारा तीस मैलांचा रस्ता. दुतर्फा निव्वळ कारखान्यांनी व्यापलेला असून विजेच्या तारांचे व आगगाड्यांचे एकसारखे जाळें विणल्यासारखे दिसत होते. त्यांतून हे बहुतेक औषधी कारखाने असावेत; कारण वाटेने निरनिराळ्या गंधांचा घमघमाट सुटलेला होता.

बफेलोहून आमची बस दुपारी बाराला सुटली व मुक्काम दरमुक्काम करीत साऱ्या रात्रभर प्रवास करून दुसरे दिवशी सकाळी सूर्योदयी आम्ही शिकॅगो गाठलें. इकडे बसचा प्रवास आगगाडीपेक्षा स्वस्त असून बराच सुखाचा आहे.

वाटेत हजारो एकर व्यापलेले विशेषत: द्राक्षांचें व इतर फळांचे मळे दिसत होते. एवढी मोठाली ही शेते, पण यंत्रांच्या सहाय्यानें प्रत्येक वेल सारख्या अंतरावर व त्याची योग्य वाढ होण्याकरितां प्रत्येक वेलीला दिलेले लाकडी आधार रेखीव चित्रासारखें भासत होतें. बर्फमय हिमऋतूतून बचावलेली ही द्राक्षांची खोडें काळीं ठिक्कर व पर्णहीन होती.

सकाळी पांचाला मी जागा झालों, तों आम्ही एका कारखान्याचे बाजूनें चाललो होतो. हा शिकॅगो शहरालगत असलेला एक प्रचंड लोखंडाचा कार-

भाडे पडेल असे त्याने सांगितले होते. पण मीटरमध्यें खरोखरच त्याने ४-५० चा आकडा दाखविला. मला शंका होती ती खरी ठरली. हा ठकवा ड्रायव्हर माझ्या जवळून दसपट पैसे उकळू पाहत होता.

त्याला चक्क सांगितले की मी नवखा आहे. माझ्या बरोबर आंत ये. मी हॉटेलच्या मॅनेजरला विचारून तुला भाडे देईन. तो म्हणाला, मला आत येण्याचे काय प्रयोजन ! माझे पैसे येथे मोजा. मी म्हटले ठीक. तुझे योग्य भाडे ५० सेंट आहे. वाटल्यास पाच जास्त. ५५ घे पाहिजे तर. तुझे मीटर मला कळत नाही. नाहीतर मी सरळ पोलीसालाच बोलवितो पोलीसचे नांव घेतल्याबरोबर तो चपापला आणि मी मीटरचेच पैसे मागतो वगैरे थोडी व्यर्थ बडबड करून शेवटी मुकाट्याने ५५ सेंट घेवून चालता झाला. त्याने ओळखले की हा नवखा असला तरी गुरूचा गुरू आहे.

शिकॉगो शहराची ऐकलेली कीर्ति अशा तऱ्हेने या शहरात प्रवेश करिताच अनुभवास आली. आणि त्यामुळे मला येथील माझ्या सहा दिवसाच्या मुक्कामात किती काळजीने वागावे याचे पुरेपुरे ज्ञान झाले.

रात्रभराच्या बसच्या प्रवासाने झोपेचे खोबरे झाले होतें. खोलीमध्ये आल्याबरोबर कपडे काढले व त्या सुखशय्येवर हातपाय ताणून आडवा झालो. शिकागो शहरात मी आलो खरा ! पण आगाऊ कार्यक्रम असा कांहीच आखला नव्हता. वाटेवर असलेले हे एवढे मोठे जगप्रसिद्ध शहर पहावे म्हटले. तेव्हा कसलीहि काळजी मागे नसल्यामुळे थकवा जाईपर्यंत सुंदर झोप काढली. मी जागा झालो तेव्हा अकरा वाजलें होते. नंतर सावकाशपणें प्रातर्विधी आटोपून व खालच्या कॅफेटेरियामध्ये अल्पाहार करून बाहेर पडलो.

शिकागो शहर सोसाट्याच्या वाऱ्याकरिता (windy city) प्रसिद्ध आहे. येथील एकूण एक प्रचंड इमारत आतून उबदार असते. मी ओव्हरकोट घालून बाहेर आलो मात्र, त्या विचित्र वाऱ्याच्या झोताने मागल्यापायीच परत फिरलो. थंडीचा अनुभव यापूर्वी मला अनेक वेळेला आलेला

असला तरी या गारीगार सन्नाटयाचा अनुभव नवीनच होता. मी आंत येऊन तेथील प्रशस्त व आरामशीर लाउंजमध्यें शिकागो शहराचे गाईडबुक व नकाशे घेवून कितीतरी वेळ कार्यक्रम आखण्यांत वेळ घालविला. बाहेर तोंड काढण्याची इच्छाच होईना.

जगांतील मोठाल्या शहरांत शिकागोचा तिसरा नंबर लागतो. याच शहरांत स्वामी विवेकानंद जवळच्या पैशाअडक्यानें लुटलें जाऊन रात्रभर पडत असलेल्या बर्फात एका कारखान्याच्या बोळीच्या मोडक्या पेटीखाली कुडकुडत पडले होते. आणि पुढे याच शहरांत भरलेल्या सर्वधर्म परिषदेंत वैदिक हिंदु धर्माचा ध्वज आपल्या अस्खलित वाणीने फडकवून त्यांनी भारताचे नाव गाजविले.

सायंकाळी मोठी हिंमत करून मी बाहेर भटकायला निघालो. या शहराचा मध्यवर्ती भाग मधून मधून आकाशगामी इमारतीनी व्यापलेला असून अत्यत जुनाट असा वाटतो. पुलावरून जाणाऱ्या रेल्वेचे जाळे शहरभर पसरल्यामुळें तर या शहराचा शोभिवंतपणा नष्ट झालेला आहे. फिरता फिरता हे बघा मी या लासेली रस्त्यावर आलो. हा येथील स्ट्रॉबेरीचा सीझन. या हॉटेलवर स्ट्रॉबेरी फेस्टीवलचा बोर्ड दिसतो आहे. मी आत शिरलो. येथे स्ट्रॉबेरीचें जणू प्रदर्शनच होते. गुलाबी पोषाखांतील गुलाबी गालांच्या एका पोरीने ताज्या लालसुरंग फळांवर क्रीम टाकून एक प्लेट माझे समोर ठेवली. मी आणखी एक प्लेट मागवून त्या मधूर फळावर यथेच्छ ताव मारला व बाहेर पडलो. आतां ही बघा सायंकाळ झाली असून विजेच्या असंख्य दिव्यांची हरतऱ्हेची रोषणाई चमचम चमकते आहे. ही सिनेमा-गृहांची ओळ दिसते आहे. सिनेरामा! सिनेस्कोप!!

सिनेस्कोपची थ्रीडायमेन्शनची फिल्म मी न्यूयॉर्कमध्ये पाहिलीच होती. पण हे 'सिनेरामा' नवीनच तंत्र दिसते. चला हेहि पाहून घेऊ या! अस्सं. ही कांही निराळीच मौज दिसते आहे! नाटकायेवढया संपूर्ण स्टेजभर अर्ध गोलाकार पडदा आणि त्यावर दिसणारे हे रंगीत बोलके चलच्चित्र

हे चित्र कसले! हा तर आपण वास्तव्य करतो तो पृथ्वीचा गोल! आरारा! हा गरगरा फिरून त्यावरचे सात समुद्र उसळूनधुसळून निघत आहेत. हे अजब दृष्य पहाता पहाता आपल्या पायाखालची जमीन हादरल्याचा भास होतो आणि हा जणू काल्पनिक प्रळयकाळ प्रत्यक्षांत उतरला असून आपणहि त्यात सापडलो आहोत, असा भास होतो मग आता आपले काय होणार! प्रेक्षकातून बायकाचे चित्कार उठले. काहीनी तर आपले डोळेच गच्च मिटून घेतले. तरीच मलाना येथे प्रवेश नाही व कोमल हृदयाच्या स्त्रियानी व हळव्या अत.करणाच्या पुचाट पुरूषानी विचार करूनच हा 'सिनेमाचा रामा' पाहावा असे बाहेरच स्पष्ट शद्वात लिहून ठेविले होते.

आज शिकागोतील माझा दुसरा दिवस. शिकागो रोटरी इंटरनॅशनलचे केंद्रस्थान! शेरमन हॉटेलच्या पाचव्या मजल्यावरच्या या हॉलमध्ये लंचमीटीगला मी हजर झालो या मातृक्लबाचे साडेसहाशे सभासद आहेत हिंदुस्थानातील क्लबातून शभराचेवर क्वचित सभासद आढळतात. या हॉलची शोभा काही औरच होती. झगझगीत प्रकाश असलेल्या त्या भव्य दिवाणखान्यात सभा सुरू होताच मद शीतलपणा येऊन आजूबाजूच्या साऱ्या उंच भितीवर शिकागो शहराच्या निरनिराळ्या भागाची दृश्ये सिनेमा तत्राच्या सहाय्याने चित्रित झाली. एका कोपऱ्यात देशोदेशीच्या राष्ट्रध्वजासह मधोमध अमेरीकेचा एका पंख्याच्या झाताने फडफडणारा राष्ट्रध्वज विशेष प्रकाशाने झळकू लागला व एका रोटेरीयनने उच मधुर स्वरांत राष्ट्रगीत गाईले.

आतरराष्ट्रीय पाहुण्याकरिता एक खास टेबल राखून ठेविला असून त्याची खातरजमा विशेष तऱ्हेने राखल्या जात होती. माझ्या सोबतीला इतर राष्ट्राबरोबर एक मडल नावाचे बंगाली स्त्रिस्ती रोटेरीयन आज उपस्थित होते. हे हैद्राबाद क्लबाचे सभासद असून मिशनच्या कार्यात येथे दौऱ्यावर होते. आमचे ठगविक पद्धतीने स्वागत व प्रत्येकाला माइकवर बोलावून प्रत्युत्तराला सधी देण्यात आली. शेवटी या शहरात आपले वास्तव्य असेपर्यंत जी मदत लागेल ती घेण्यास अनमान करू नये म्हणून विनंती करण्यांत आली.

या हॉटेलच्या बाहेर पडून एका चौरस्त्यावर येतांच हे बघा काउंटी कौंसील व सिटी हॉलची इमारत. जाणाऱ्या येणाऱ्यांच्या गर्दीत मीहि आन शिरलो. मधल्या भव्य दालनांतून लिफ्टने वरखाली सारखी जा–ये सुरू होती

आणि हे काय! येथे हे 'एक्स्रे' चे फोटो घेणे चालले आहे. ही टुबर्क्युलोसीस असोसिएशन मार्फत प्रत्येक नागरिकाला फुकट 'एक्स्रे' घेण्याची सोय असल्याचे कळले.

तेथें असलेल्या एका नर्सला मी विचारले " मी आपल्या शहराचा व राष्ट्राचाहि नागरिक नाही.मग माझा "एक्स्रे' आपण घेऊ शकता काय ? '

तिने हसून उत्तर दिले, " मग काय हरकत आहे ! या असे इकड' या कार्डावर आपलें नाव, गाव, पत्ता लिहा व कोट काढून येथे उभे रहा " बोलता बोलता मला तिने मशीन समोर उभे केले व फोटोहि घेतला व माझे आभार मानून याचा निर्णय आपल्या पत्त्यावर कळविल्या जाईल असे आश्वासन दिले.

आणि काय आश्चर्य मी हिंदुस्थानात परत आल्याबरोबर त्याचे कार्ड येऊन पडलेले मला दिसले. त्यात कळविले होते की, आपल्या फुप्फुसांत कसलीहि व्याधी नाही. आपण दरवर्षी असा 'एक्सरे' घेऊन तपासणी करून घेणे हितावह आहे ...

मी आतां एका लिफ्टमधून वर आलो व मेयरच्या आफिसची चौकशी केली. मेयरसाहेब आजारी असल्याचे कळले. पण त्यांच्या सेक्रेटरीनी मला इतमामाने आपल्या खोलीत नेऊन बसविलें व माझ्या भेटीचे कारण विचारले. मी त्यांना माझ्या अमेरिकेतील वास्तव्याचे कारण सांगून भारतातील एका शहरातील म्युनिसिपालिटीचा माजी अध्यक्ष या नात्याने मी आपल्या येथील कारभार कसा चालतो याची माहिती मिळविण्याच्या इच्छेनें आलो असल्याचें निवेदन केलें.

येवढे सांगण्याचा अवकाश, त्याने वेगवेगळ्या खात्यांत फोन करून मला पाहिजे ते सारे दाखविण्याची व्यवस्था केली. एक कर्मचारी अधि

कारी माझ्या बरोबर दिला. आणि आरोग्य व शिक्षण खाते पाहून त्या खात्यांच्या प्रमुखांशीं मी अनेक प्रश्नावर चर्चाहि केली.

या नगरपालिकेंत एक नवीनच खाते मला आढळून आले. ते पार्क व रिक्रीएशनचे खातें. या नव्या खात्याचा मला विशेष अभ्यास करावासा वाटला. म्हणून त्या खातेप्रमुखाशी दुसऱ्या दिवसाची वेळ ठरवून त्या सेक्रेटरीला त्याच्या अमूल्य सहकार्याबद्दल धन्यवाद देत बाहेर पडलों !

---

# पहावें तें नवलच !

## ( द्वादश खंड )

### युनियन स्टॉक यार्ड–मर्कडाईज मार्ट–याचें नांव नगरपालिका–बाबा उल्लाचें बहाई स्मारक

शिकागो नगरपालिकेच्या 'रिक्रीएशय' बोर्डाचे डायरेक्टर श्री ॉल्टर रॉय यांच्या कचेरीच्या शोधांत मी निघालो. सकाळी साडेनवाला मी त्यांचेकडे येणार असल्याचे मेयरच्या सेक्रेटरीने त्यांना आगावूच कळवून ठेविले होते.

हेच ते 'सोल्जर्स फील्ड!' हा स्टेडिअम आहे नगरपालिकेच्या मालकीचा. केवढा मोठा असेल अशी आपली कल्पना आहे? या स्टेडियममध्ये एक लक्ष दहा हजार प्रेक्षकांना बसण्याची व्यवस्था असून क्रिडांगणाची आंतील खुली जागा एक लक्ष साठ हजार वर्गफूट आहे. जाते का आपल्या कल्पनेची धाव !

वॉल्टर रॉय माझीच वाट पाहात होते. मी मॅसाचुसेटस् येथील आंतर्राष्ट्रीय शा. शि परिषदेहून आलो असें त्यांना कळविण्यांत आले असल्यामुळे त्यांच्यातर्फे या परिषदेला हजर असलेली श्रीमती डोरी यांना त्यांनीं बोलावून, यांना ओळखतां कां? असा प्रश्न केला. जणू त्या बाईने मला ओळखले नसते तर मी कुणी तोतयाच ठरलो असतो ! पण डोरीबाईनी मला पहातांच मी आगाऊ कळविले नाहीं म्हणून उलट त्या माझेवर रागावल्याच. आणि वर म्हणू लागल्या, "बर पण तुम्ही रहाणारना चारसहा दिवस? तुम्ही येवढ्या लांबच्या हिंदुस्थान देशांतून आलांत, तुम्हाला पुष्कळच गोष्टी आम्हाला दाखवावयाच्या आहेत!"

मी त्याना सांगितले की, "मला जास्त दिवस रहाता येणार नाही. मी निघालो आहे पृथ्विप्रदक्षिणेला तेव्हां आज आणि उद्यां या दोन दिवसात जे पाहता येईल तेवढेच पाहुं."

मग तिनें वॉल्टर स्कॉटला परिषदेतील माझे भाषण कसे झाले, मला किती सुंदर इग्रजी येते वगैरे थोडे रंगवूनच माझी विशेष ओळख करून दिली. नंतर त्यांनी त्याचे ते व्यापक कार्य कसें चालते हे समजावून सांगत साऱ्या ऑफिसला भेटी देऊन अनेक खातेप्रमुखाच्या ओळखी करून दिल्या.

शेवटी आम्ही चेअरमन, रिक्रिएशन बोर्ड, याच्या खोलीत प्रवेश केला. हे गृहस्थ ऐंशी वर्षांचे पिकले पान होते. मला पहातांच ते म्हणाले हिंदुस्थानची माझी झालेली ओळख मी कधीच विसरणार नाही. बोलता बोलता त्यानी आपली एका हिंदी चमूच्या कॅप्टनशी गाठ पडली असताना त्याने दिलेल्या मार्मिक उत्तराची गमतीदार हकीकत सांगितली.

तो म्हणाला, "बर्लीनच्या ऑलिंपीकमध्ये हिंदी टिमने जिंकलेली हॉकी मॅच मी पाहिली आहे. तो अप्रतीम खेळ पाहून मी मुद्दाम त्या टीमच्या कॅप्टनची गांठ घेतली व त्याचे अभिनंदन करून त्याला प्रश्न केला की, तुमच्या खेळांतली चपल चतुराई पाहून मी थक्क झालो; ही येवढी चतुराई तुम्हीं कोठें शिकलांत? ( How is it that your game was so subtle ? ) आणि तो हिंदी चमूचा नेता उद्गारला होता' शिकण्याचा प्रश्नच येत नाहीं. हिंदी लोक मुळातच चतुर असतात.' ( Because Indians are subtle )

क्रिडा खात्याचेच लोक ते! त्यांच्या समवेत अशीच खुमासदार चर्चा करीत दुपारचे जेवण झाले व मी श्री. वॉल्टर रॉय यांच्या खोलीत येऊन त्यांच्या या नाविन्यपूर्ण खात्यांची माहिती करून घेतली.

नगरपालिका आपल्या सभासदापैकी एकाची निवड करून त्याला 'पार्क व रिक्रीएशन' या खात्याचा चेअरमन नियुक्त करते. या चेअरम-

नला ठराविक सभासद संख्येची एक समिती नियूक्त करण्याचा अधिकार प्राप्त होतो व त्याला वार्षिक बजेटमधून एक मोठी रक्कम तोडून दिली जाते. शिवाय या खात्याला क्रीडासहोत्सव व क्रीडा संम्मेलनामधून स्वतंत्र उत्पन्न काढता येते. शहरातली सारी क्रीडांगणे बागबगीचे व खुल्या जागा या खात्याच्या ताब्यात असून त्याच्या सरक्षणार्थ एक स्वतत्र पोलीस खातेंहि असते.

श्री. रॉय सागत होते की, आम्ही प्रथम सगळ्या शहराची सगत-वार माहिती जमा करून एक पंचवार्षीक योजना आखतो गेल्या पाच वर्षात आमच्या शहरात ९५ क्रिडागणे व पार्क होते ते आता १५० च्या वर झालेले आहेत. आणि त्यातील काही काही पार्क तर शेकडो एक-राचे आहेत. ते पुढे म्हणाले, 'आम्ही प्रथम निरनिराळ्या भागाचे विमा-नाने फोटो घेतो व मोहोल्लावार नागरिकाच्या संख्येच्या मानाने किती खुल्या जागा आंहेत त्याचे सशोधन करतो. नतर प्रत्येक वार्डात नेमलेल्या कर्मचाऱ्यामार्फत तेथे रहाणाऱ्या नागरिकाची सास्कृतीक पार्श्वभूमी कशी आहे, ते कोणत्या धर्माचे आहेत, कोणकोणत्या भाषा बोलतात, त्याची आवडनिवड काय आहे वगैरे अनेक गोष्टी विचारात घेतो. त्याचे क्रीडा-सौख्य कसेकसे विभागले आहे याचा सांगोपाग विचार करून तशा अनेक तऱ्हेच्या सोई त्याना प्राप्त करून देण्याला मदत करतो. पार्क व खुल्या जागा आवश्यक त्या ठिकाणी निर्माण करण्याकरिता घरे विकत घेऊन (Aquire) तेथे मैदान करण्याचा या बोर्डाला अधिकार आहे.

अमेरिका हा जरी आपल्याला एकसंधी देश दिसत असला तरी तेथे युरोपांतील अनेक देशांतील भिन्नभिन्न भाषा बोलणारे व विभिन्न आचार विचाराच्या लोकांचे गट अजूनहि कायम आहेत. त्यांतून निग्रोची एक मोठी मागासलेली जमात तेथे आहेच. अशा वस्तीवस्तीतील गटांना त्यांना रुचेल व पचेल अशी व्यायाम व क्रीडास्थाने निर्माण करण्याचे गोड काम हे खाते करीत असते.

दुसरे दिवशी श्री. रॉय यांनी हे सारे कार्य प्रत्यक्ष दाखविण्याची व्यवस्था केली होती. त्याचे दोन सहकारी श्री. रोज व हॉलंड या दोघांना दोन विभागात मला फिरविण्याचे कार्य सोपविले होते. अशा तऱ्हेने शिकागो शहरांत चाललेलें नागरिक जीवनाचे हे महत्वाचे कार्य मला अभ्यासता आले.

रोजने सकाळी अर्धा भाग व हॉलंडनें दुपारी राहिलेला अर्धा भाग दाखविण्याचे वाटून घेतले होतें.

हा बघा हा एक मोठ्यातला मोठा पार्क. किती एकर आहे म्हणा-लात? एकशेपसतीस आणि शहराच्या ऐन मध्यवस्तीत ? शाबास! आणि ही एवढी मोठी इमारत कशाकरिता या पार्कमध्ये ? अस्सं, ही जिमनेशियम!

या जिमनेशियममध्ये कोणीहि यावे व त्याच्या आवडीप्रमाणें आपला रिकामा वेळ घालवावा. व्यायाम, क्रिडा, खेळ यांच्या सोबतीला येथे हस्तव्यवसायाचीहि व्यवस्था आहे

हे बघा, ही लहान लहान मुले कागदावर ब्रशाने रग सांडत आहेत. हो, साडत नाहीं तर काय ? साडता साडता व वेडेवाकडे पट्टे फाडता-फाडता ही मुले चित्रकलेची आवड असल्यास चित्रे काढायला शिकतात. या मुली मातीच चिवडत बसल्या. काही सुइदोरा घेवून त्याचाच खेळ करीत आपल्या मनाची करमणूक करून घेतात.

हा सुतारविभाग. या मुलाने ही एक फोटोफरेम स्वतः तयार केली. आपले लाकूड आणावे व शिक्षकाच्या सहाय्याने शास्त्रोक्त पद्धतीनें पाहिजे ती वस्तु तयार करून घेऊन जावी.

याशिवाय डान्सिंगचें क्लासेस. गाण्याचे वर्ग. व्यायामाच्या उपकर-णांना तर येथें तोटाच नाहीं. टेनीस, कॅरम, स्वीमिंग, इतकेच काय पण पत्ते कुटत बसणाराला सुद्धा येथे सोय आहे. आणि बुद्धीबळाचे तर येथून चँपीयन्स तयार होतात.

आतां आम्ही हे बघा दुसऱ्या एका भागात आलो. हे एक छोटे क्रीडांगणच आहे. आजुबाजूच्या भागातील शाळा-कॉलेजांना आपले नित्याचे व वार्षिक सामने भरविण्याकरिता येथें साऱ्या सोयी आहेत. आणि हें बघा हे तिसरे ठिकाण. हे यांचे मध्यवर्ती स्टोअर्स आहे. एखाद्या मोठ्या सिनेमा कंपनीचे 'प्रापर्टी' खाते असते तसे याचे स्वरूप आहे. या बघा दहा बारा बाया मशीनवर बसून रंगीबेरंगी झगे शिवत आहेत. हे इतके एकसारखे झगे कशाकरिता असे विचारतांच श्री. रोज म्हणाले, पुढच्या हप्त्यात अमक्या अमक्या कॉलेजचे एक ऐतिहासिक नाटक आहे त्यांना लागणाऱ्या सिनसिनरीपासून सर्व सामुग्री आम्ही येथूनच पुरवितो.

शिकागो, नागरीकांना रिकामा वेळ योग्य रीतीनें कसा घालवावा हे शिकविणारे आदर्श शहर गणले जाते.

कामाचे तास कमी करण्याच्या आजच्या आधुनिक जीवनात, फुरसतीच्या वेळेचा विनियोग स्वयंविकासाकडे योग्य रितीनें करण्याची साधनें उपलब्ध नसल्यास समाजांत कोणती परिस्थिती ओढवेल याचा विचार समाजधुरीणांनी न केल्यास "रिकामा न्हावी आणि भिंतीला तुम्बड्या लावी" असा प्रकार झाल्याशिवाय रहात नाही.

शंभर वर्षांपूर्वी फक्त एक लाख वस्ती असलेले हे शहर आज छत्तीस लाखाचे झाले असून त्यानें दोनशेच्यावर वर्गमैल जागा व्यापलेली आहे. मिचिगॉन तलावाचें बाजूनें या शहराचें दृश्य फारच विलोभनीय आहे. आदर्श नागरीक जीवनाचें एकमेव ठिकाण म्हणून या शिकागो शहराकडे बोट दाखविण्यांत येते.

हा बघा आर्ट म्युझीयम. म्युझीयम जागोजागी असतातच. पण या भल्या मोठ्या म्युझीयममध्ये हे बघा विविध कलांचे नमूने आणि या साऱ्या कला आत्मसात करण्याचे हे वर्ग. कलाप्रदर्शन व कलाशिक्षण यांची ही येथें घातलेली सांगड पाहून पहाणाराला कलेचे उत्तमोत्तम नमूने पाहिल्याचें समाधान तर होतेच पण कलावस्तूंची प्रत्यक्ष निर्मिती पाहून पहाणारांची स्फूर्ती जागृत होते. हे या म्युझीयमचें वैशिष्ट्य पाहून मला विशेष आनंद झाला.

उंचच उंच इमारतीचे दृश्य पहात मी निघालो तो शिकागो नदीच्या कांठाने असलेल्या एका प्रचंड इमारतीवर माझे लक्ष खिळलें. अठराव्या मजल्याच्या खिडकीवर पाळण्यासारखे दोर लटकवून हा कामगार काच साफ करीत आहे. केवढे धोक्याचे काम! या अजस्त्र हवेल्यांचें रंगरंगोटी व साफसफाइचें काम या कामगारांना किती धोका पत्करून करावे लागते! हा तर 'मर्कडाईज मार्ट'! ही जगप्रसिद्ध व्यापाराची बाजारपेठ! येथे म्हणे अनेक कारखान्यातून तयार झालेल्या बारा लक्ष वस्तू नमुन्यादाखल ठेविलेल्या असून व्यापाऱ्याला बसल्या जागी सवदे करण्याची सोय आहे. अठरा मजल्याची ही लांबचलांब पसरलेली इमारत. वीस हजार लोक येथे कामावर असून त्याच्या खाद्यपेयांची व्यवस्था राखण्याकरिता एकूण अकरा प्रशस्त हॉटेलांची आत सोय आहे. बारा पोस्टमेन् या एकाच इमारतींत येणारी अडतीस हजार पत्रांची डाक नित्य वाटत असतात.

नायगाराला भेटलेल्या माझ्या स्विडीश शेतकरी मित्रानें मुद्दाम सांगितले होते की तुम्ही शिकागोला जाणार आहांत तेव्हा तेथील प्रसिद्ध 'युनियन डॉकयार्ड' पहायला विसरू नका.

आणि हे बघा ते 'डॉकयार्ड'! जिकडे दृष्टी जाईल तिकडे लाकडी मजबूत कटघरे व त्यांत कोंडलेली ही असंख्य जनावरें. अमेरीकन लोकाचे अत्यंत आवडीचे खाद्य म्हणजे 'बीफ'. आणि त्या बिफकरीता जेवढे म्हणून खोंड जन्माला येतील तेवढ्यांचे शास्त्रोक्त पोषण करून पुष्ट झालेली जनावरे खास आगगाड्यानी या बाजारांत येतात. गाईची हत्या मात्र क्वचितच केली जाते. कारण बीफ इतकेच गोमातेचे दूधहि त्यांना प्रीय आहे.

या जनावराचे विशेष हे की याना खांदाच नाही. कारण इकडे औताची सारी कामे यंत्रानी होत असल्यामुळे या जनावराचा शेतीला मुळीच उपयोग नाही.

गाय ही खऱ्या अर्थानें गोमाता असल्याचे येथें दिसून येतें. गायीकडून मातेचेंच काम घेतल्या जातें. कालवड अगर खोंड यांना जन्म देवून काल-

वडीनें अखिल मानवजातीला दुधाचा पुरवठा करावयाचा व खोंडानें आपले मांस देवून त्यांना पुष्ट करावयाचें.

हे येथे आलेले कोवळे खोंड विशिष्ठ तऱ्हेने पोसले असल्यामुळे पुष्ट व मांसल असतात. आणि त्याचे काकडीसारखे कोवळे तुकडे (Slices) उत्कृष्ट रितीनें डब्यांत भरून तुमच्या टेबलावर कसे येतात ते पहा!

ही स्विफ्ट आणि कंपनी. आणि या कं चा हा किळसवाणा यात्रीक कत्तलखाना पहाण्याकरिता रोज सारखी मडळी येत असतात. ही बघा त्या मुक्या जीवाची रांग. एका पुलावरून कारखान्याच्या पाचव्या मजल्यावर हाकीत हाकीत नेली जात आहे. प्रेक्षकाकरिता ही आत गॅलरी असून समोर सबंध कांचेच्या खिडक्या आहेत. एक एक जनावर [illegible] केलेल्या या सापळचांत आणून उभे केले जाते आणि त्या सापळचाच्या बाजूच्या भिंतीवरून तो बघा एक 'यमदूत' हातात एक लांब दाड्याची हातोडी घेवून त्याच्या गंडस्थळावर एक नाजूक पण बिनचुक फटका मारून त्याला भोवळ आणीत आहे. भोवळ येऊन ते जनावर तडफडत आडवे पडले की या बाजूचे दार उघडून ते धूड गडगडत बाहेर येऊन पडते. दुसऱ्याक्षणी इकडे सज्ज असलेले कसाई त्याच्या मागच्या दोन्ही पायांत साखळचा अडकवून त्या वर ओढतात की जनावर मागच्या पायावर उंच टागले जाते. नंतर त्याच्या मानेची एक नस कापून खाली बादलीत नळासारखे भळाभळा वहात आलेले रक्त साठविले जाते.

ती बघा त्या जनावराची तडफड आता पूर्ण बंद झाली व वरच्या फिरत्या रूळावर ते पुढे ओढल्या गेले. आता त्याची मान वेगळी झाली व पोट चिरून पहाता पहाता सारे चामडे सोलल्या जाऊन तो लाल बुद मासाचा गोळा पलीकडच्या खोलीत सरकला.

तो असाच सरकत सरकत या खोलीतून त्या खोलीत फिरत त्याचे तुकडे काय होतात आणि निवडक भागाच्या चकत्या होऊन त्यांचें सीलबंद डबे काय भरण्यांत येतात. सारेच अजब!

या खाटकांच्या साम्राज्यांतून किळस येवून मी जो निघालो तो शिकागोच्या एका दुसऱ्याच भागात सायंकाळचा फेरफटका करायला आलो

मध्यवस्तीपासून सरासरी तीस मैलावर हा इलीनॉइस नांवाचा भाग मिचिगॉन सरोवराच्या काठानीच आहे. ज्या बहाई पंथाबद्दल मी बरेंच ऐकले होते तेच हे बहाईचें देऊळ. हिरवळीच्या विस्तीर्ण पटांगणावर उभारलेला हा प्रशस्त चबुतरा व त्यावर हे नऊ कोनाचे कलात्मक मंदीर पाहून मला ताजमहालच्या नेपथ्य रचनेची आठवण झाली.

किती शांत वाटत होते या ठिकाणी! पंचेवीस लक्ष डॉलर खर्च करून बांधलेले हे देवालय तेहेतीस वर्षानि पूर्ण झाले. या देवालयाचे विशेष म्हणजे यांत कुठल्याहि देवाला स्थान नाही. मानवजात तेवढी एक. कुठलाहि भेदाभेद हा पंथ मानायला तयार नाही.

महंमदी राष्ट्रांतील दुफळीतून दिव्यदृष्टी पावलेला एक परशीयन तरुण 'बॉब' १८४४ साली पुढे आला व 'एकात्मतेचें' तत्व प्रतीपादन करू लागला. पण अवघ्या सहा वर्षांतच त्याचा खात्मा करण्यात आला. बहादुल्ला व अबदुल्ला बाहा यानी 'बॉब' चे कार्य नेटाने पुढे चालविले. पण त्यांचेहि चागलेच हाल करण्यांत आले.

अबदुल्ला बाहाला चाळीस वर्षे तुरुंगवासात ठेऊन १९०८ मध्ये तुर्कांनी मुक्त केला. त्याने स्थापन केलेला हा 'एकमेवाद्वितीय' असा बहाई पंथ जगातल्या अनेक सुपथामध्यें स्थान पटकून आहे.

या भव्य, शात व गंभीर अशा ऊंचचऊंच नवकोनी गाभाऱ्यात फक्त गोलाकार खुर्च्या मांडून ठेविल्या आहेत. व येथे सर्व धर्मांच्या पवित्र ग्रंथांचे वाचनाचें कार्य चालू असते

अशा तऱ्हेनें सतत सहा दिवस भटकून या सुप्रसिद्ध नगराची यात्रा मला आता आटोपती घेणें प्राप्त आहे. यापुढें आता माझा प्रवास मध्य-अमेरिकेतून होणार आहे.

---

# मध्य अमेरिकेंतून

## ( त्रयोदश खंड )

### सरोवरापासून समुद्रापर्यंत–दुमजली रेल्वे–रॉकी कॅनियन्स–बोगद्यांची मालिका–तांब्याच्या खाणी–डोळ्यांत भरणारी स्वच्छता–रेड इंडियन्सची शाळा.

'कॅलिफोर्नीया झायफर' या अद्यावत आधुनिक गाडीने केलेला एकतीस तासांचा प्रवास डोळ्यासमोर उभा राहिला कीं आजही अंगांत चैतन्य सळसळू लागते. शिकागो ते सॉल्टलेकसिटी हे सोळाशे मैलाचे अंतर निसर्गावर कुरघोडी करणाऱ्या या नाविन्यपूर्ण रेल्वेनें करणाराला येथील लोक मोठा भाग्यवान समजतात.

भारताचे एक वर्षभर भ्रमण करणारे प्रसिद्ध प्राध्यापक डॉ. नॅश, ही पृथ्वी पर्यटनाला निघण्यापूर्वी मला नागपुरांतच भेटले होते. न्यूयॉर्क-मधील आपल्या घरी जेवल्याशिवाय आपण पुढे जाऊं नये असे आग्रहाचे आमंत्रण त्यांनी येथेच देवून तसे आपल्या पत्नीला पत्राने आगाऊ कळ-वूनहि ठेविले होते.

न्यूयार्कला असतांना श्रीमती नॅश व त्यांचे बारा वर्षांचे चिरंजीव यांचेबरोबर भोजन करताना त्यांनी माझ्या पुढील प्रवासाच्या कार्यक्रमाची ही सुंदर योजना आंखून दिली होती.

मॅास, न्यूजर्सी, पेनसिल्व्हानिया, न्यूयार्क, ओहिओ, इंडियाना व इलीनॉईस इतक्या प्रांतातून फिरतफिरत मी आता मध्य अमेरिकेंत शिरत होतो. शिकागो ते सॉल्टलेकसिटी हा प्रवास आयओवा, नेब्रास्का, कोलो-राडो व युटा या प्रांतातून करावयाचा असून प्रसिद्ध नदी मिसिसिपी व रॉकी पर्वत यांना पार करून मला जावयाचे होते.

मुंबई ते कलकत्ता हा भारताचा पूर्वपश्चिम, अवघा बारातेराशें मैलांचा प्रवास जलद अशा मेलने करतांना चाळीस तास घालवावे लाग-तात. आणि ही 'कॅलिफोर्नीया झायफर' शिकागो ते सानफ्रान्सिस्को (Great lake to Golden Gate) हे त्याच्या दुप्पट असलेले अंतर अवघ्या सत्तेचाळीस तासात आटोपते घेते.

ताशीं साठ मैल सुळसुळ चालणाऱ्या या गाडीचा सुखासीन प्रवास नयनमनोहर दृष्यांनी ओतप्रोत भरलेला असल्यामुळे आयुष्यातील अत्यंत उन्मादक काल अनुभवींत असल्याचा आनंद झाल्यास नवल नाही.

या गाडीचे विशेष म्हणजे प्रत्येक बोगीच्या मधोमध एक दुसरा मजला असून त्याचेवरील छप्पर, बाहेरचे अलोट सृष्टिसौंदर्य विनासायास पाहता यावे म्हणून पूर्ण पारदर्शक असे कांचेचे बनविलेलें असते

शिकागोच्या युनियन स्टेशनवरून आमची गाडी दुपारी साडेतीनला निघाली. ती कारखान्यांच्या धबडग्यांतून तास दोन तासाने सपाट शेतीच्या रानांत शिरली. साडेसहाच्या सुमारास मॉनमाउथजवळ मिसिसिपी पार करून नेब्रास्का विभागांत आम्ही शिरलो. रात्र अंधारी असल्यामुळे रात्री विजेच्या प्रकाशांत झोपलेली लहान लहान खेडी व मोटारीची जा ये याशिवाय कांहीच पहाण्यासारखे नव्हते.

पहाट झाली तसे आम्ही कोलोराडो प्रातात शिरून रात्रीतून एक हजार मैलाचा प्रवास संपवून डेनव्हरला पोचलो होतो. पांच हजार फूट उंचावर रॉकीच्या पायथ्याशी असलेले हे चार लाख वस्तीचे शहर. १८५८ साली सोन्याच्या शोधांत जी पहिली मानवी टोळधाड

यथे लोटली त्यांची ही वस्ती या समृद्ध वस्तीच्या नगरपालिकेने शेजारच्या पर्वतराजीच्या उतरणीवर अनेक रम्य उद्यानांची योजना केल्यामुळे येथे क्रिडासौख्य उपभोगू इच्छीणाऱ्या शौकीनाची टोळधाड आजहि निसर्गसौंदर्य लुटण्याकरिता अव्याहत चालू असते.

आता हे बघा! आम्ही या विशाल पर्वतराजीत शिरत आहोत. एका तासात एकापाठो एक अशा अठ्ठावीस बोगद्यातून सापासारखी एका बिळातून निघून दुसऱ्या बिळात सारखी वळवळ करीत गाडी चालली आहे. सकाळची न्याहारी आटोपून एकूण एक प्रवासी आपआपले बायनॉक्युलर व कॅमेरे सरसावून वरच्या मजल्यावर जागा पटकावून बसले आहेत

गाडीचे चालक लाउडस्पिकरने नजरेखालून जाणाऱ्या प्रत्येक बारीक सारीक दृष्यांची संगतवार माहिती सागून पहाणाराचे कुतूहल क्षणाक्षणाला जागृत करीत आहेत बाहेरच्या थंडी वाऱ्याची झळ लागू न देतां आम्हाला प्रत्यक्ष निसर्गाच्या साम्राज्यातून सुखाची सहल घडविल्या जात होती. हा प्रत्यक्षांतील चालता बोलता पट मौजेने पाहत असताच आमची गाडी एकाएकी जी एका बोगद्यात गडप झाली ती किती वेळ झाला तरी बाहेर निघेचना! 'जेमस्पिक' नांवाच्या नऊ हजार फूट उंच असलेल्या या सुळक्या खालून हा सव्वासहा मैल बोगदा काढलेला आहे. पर्वताच्या राशीतून मार्ग काढता काढता गाडीचा वेग बराच कमी झाला होता. पंधरा मिनिटानतर आम्ही बाहेर आलो तो समोर दिसणाऱ्या पहाडाच्या रागा बर्फाच्छादीत असून जिकडे तिकडे दहीचदही सांडल्याचा भास होत होता.

आता माध्यान्हाची वेळ झाली असून अधूनमधून सूर्य डोकावित लपणाछिपणीचा खेळ खेळत होता. एखाद्या उत्तम चित्रावर एखाद्या वेडप्यानें पोतेरें फिरवून त्याचे सौन्दर्य विनाकारण नष्ट करावे तसे लोंबकाळलेल्या ढगानी गर्दी करून, मधूनच चित्रपटाची फिल्म तुटल्याने जी प्रेक्षकांची केविलवाणी गती होते, त्याचा प्रत्यय येई.

आणि आता हे रम्य रमणीय चित्र पहा. हे कॅनियन्स! हे बाजूला दिसतात हे रेड कॅनियन्स. आणि आता या अठरा मैल लांबीच्या ग्लेन–वुड कॅनियनमधून ही बघा गाडी कशी वळणे घेत आहे. इथे ही इगल नदी या कोलोराडो नदीला मिळत आहे. रेल्वेचा काही मार्ग दोन्ही नद्यांच्या मधून व त्याच्या पलीकडे दोहीकडे ऊचच ऊंच कडे. या लाल रंगाच्या उंचच ऊच भिंती आणि त्यावर कोरलेली ही नक्षी!

बुद्ध मंदिराचे टोप जसे समांतर आडव्या रेषांच्या भरगच्च नक्षीने उभारलेले असतात. बस तसेच. या निसर्गनिर्मित अजब कारागीरीलाच 'कॅनियनस्' ह्मणून ओळखलें जाते. मैलचे मैल पसरलेल्या या ओबड–धोबड नैसर्गिक 'पॅगोडा'च्या रांगांतून प्रवास करताना दिसायला सुस्त, शांत पण अती चंचल अशा या पंच महाभुतांच्या हजारो वर्षे चिकाटीनें रावून घडविलेल्या या विराट कृतीने मन सुन्न व प्रसन्न होते.

आकाशांत सावकाशीने सरपटणाऱ्या ढगाच्या आकारांत जशा आपण अनेक काल्पनिक आकृती चितारतो तसेच या कॅनियन्समध्ये अनेक कला-कृतींचा प्रत्यय येतो. मुम्बईकडून घाटातून प्रवास करताना एका पर्वत राशीला 'ड्युक्स नोज' चें स्वरूप प्राप्त झालेले पुष्कळानी पाहिले असेल. तसे या कॉनियन्समध्ये एका भल्या मोठ्या त्रयमूर्तीचे कोरीव चित्र दाखविण्यात येते.

रात्री साडेदहाला हा अदभुतरम्य प्रवास सपवून आमची गाडी सॉल्टलेकसिटी या युटा प्रांताच्या राजधानीच्या शहरीं पोहचली डेनव्हर पासून एका भारद्वाज नावाच्या हिंदी डॉक्टराची गाठ पडून ओळख झाली होती व त्यानीच या स्टेशनच्या शेजारी असलेल्या एका लहानशा हॉटेलमध्ये माझी तात्पुरती सोय लावून दिली.

सकाळी प्रातर्विधी आटोपून श्री. निल्सन यांना मी आल्याचे फोनने कळविले. कारण त्याचेच या शहरी भेट देण्याबद्दल मला आग्रहाचे आमंत्रण होते. हे निल्सन व त्यांची पत्नी ज्या कांग्रेसकरीता मी इतक्या

लांबचा प्रवास करून आलो होतो त्या आंतर्राष्ट्रीय मेळाव्याचे एक प्रमुख संयोजक होते व तेथेच माझी त्यांच्याशी ओळख झाली होती. युटा युनिव्ह्सिटीतील शारीरिक शिक्षण विभागाचें हे प्रमुख असून अमेरिकेच्या ' ॲकेडेमी ऑफ फिजिकल कल्चर ' या संस्थेचे ते अध्यक्ष आहेत.

मी आल्याचे त्यांना कळताच ते मला आग्रहाने आपले घरी घेवून गेले, व आपल्या कुटुबांत दोन दिवस पाहूणा म्हणुन ठेवून घेवून कल्पनेच्या बाहेर त्यांनी माझे आदरातिथ्य केले.

' सॉल्टलेक सिटी ' हे अमेरिकेतील एक सुदर शहर, तेथील रुंद रस्ते व डोळघांत भरण्यासारख्या स्वच्छतेकरिता प्रसिद्ध आहे. येथील लोकसंख्या फक्त पावणे दोन लाख आहे.

श्री. निल्सन यानी प्रथम मला आपल्या मोटारमधून युटा प्रांताची स्टेट बिल्डिग दाखवून तेथील शारीरिक शिक्षण प्रमुखाशी ओळख करून दिली. हे संपूर्ण संगमरवरी दगडाचे बिल्डिग खूपच भव्य असून विशेष म्हणजे तळमजल्यावर त्या प्रांतातील उद्योग, कला व उपजनिपजाची ओळख करून देणारे एक भव्य प्रदर्शन कायमचें थाटलेले आहे.

श्री. निल्सन हे मार्मोनपथी आहेत. युटा प्रांतांत या मार्मोन जातीची संख्या फार मोठ्या प्रमाणांत आहे. सॉल्टलेकसिटी हे त्याचे केंद्रस्थान असून त्याचे मुख्य देऊळ (Temple) याच शहरीं आहे.

अमेरिकेंतील या नव्या उपखंडाची श्री. निल्सन यांनीं करून दिलेली ओळख मार्मिक व नाविन्यपूर्ण अशी आहे.

प्राध्यापक निलसन यांचे ते स्वत:चेच घर असून नवीनच बांधलेले होते. त्यांच्या पत्नी व्दितीय संबंधाच्या असून त्याना अधल्या घरची तीन पुत्ररत्नें होती. त्याची वये साधारण ११, ९ व ७ असावी. आणि एक दोन वर्षं वयाचे कन्यारत्न निल्सनच्या पितृत्वाचे फळ होते.

निल्सनची पहिली पत्नी काडीमोड घेऊन निघून गेली व वयांत आलेले एकुलते एक चिरंजीव सुबुद्ध होऊन आपल्या पत्नीसमवेत परगांवी

पोटासाठी भटकले. बिचारा निल्सन! शरीरशास्त्रज्ञ! त्याला विधुरावस्थेत जीवन कठणे कठीण जाऊ लागले. घरदार, शेतीवाडी आणि भरपूर पगाराची नोकरी अशा अवस्थेत पन्नाशी उलटलेल्या गृहस्थाला उत्तम रीतीने श्रृंगारलेले ते घर खायला उठू लागलें. तिकडे ती तीन मुलाची माता,तीस वर्षांची तरुणी, पतीनिधनानंतर काबाडकष्ट करून पोट भरू लागली. दोघांनी एकमेकाची सोय पाहिली आणि आपसांत लग्नाची गाठ बांधून घेतली. निल्सन नव्या संसारांत रंगून गेलेला दिसत होता.

मी त्यांच्या घरीं जाताच, नव्या सुदर घरी आलेल्या त्या पोरक्या पोरांनी पाठककाका, पाठककाका म्हणून मलाहि लळा लाविला व माझे बोट धरून आपल्या तळघरातील मजल्याच्या खोलीत नेऊन आपल्या खेळाच्या गमती व आवडीनिवडी मोठ्या प्रेमानें दाखविल्या. निल्सनहि त्या मुलाची बरीच तारीफ करू लागला.

अमेरिकेंतील कुटुबजीवनाबद्दल माझे मित्र मोठ्या कुतूहलाने विचारीत असतात. म्हणून हा गृहसौख्याचा विचित्र पण सुदर नमूना सादर करीत आहे.

या कुटुबाची खरी मौज तर पुढेंच आहे. निल्सन यांची या साल्ट–लेक सिटी शहरापासून नव्वद मैलावर 'मिलव्हीला' या खेड्यावर शेती असल्याचे त्यांनी सांगितले. त्याच्या एका अर्धवट बधुची पोटाची सोय व्हावी म्हणून ही बत्तीस एकर शेती त्यांनी त्याला वहावयाला दिली असून त्याची देखरेख निल्सन मधून मधून स्वतः जाऊन करीत होते. मला तेथील खड्यांचे स्वरूप व शेती प्रत्यक्ष पाहण्याला ही संधी नामी होती. तशी इच्छा मी प्रगट करतांच त्यानी मला तेथें नेण्याचे आनंदाने कबूल केले.

आज प्रथम तेथें असलेल्या रोटरीच्या मिटिंगला मला जावयाचे असल्यामुळे निल्सन याना माझा पाहुणा म्हणून बरोबर घेऊन मी युटा हॉटेलांत आलो. वास्तविक निल्सनचा व युटा रोटरी क्लबाचा पाहुणा मी. निल्सनला पाहुण्याचा पाहुणा म्हणून तेथील ओळखीच्या प्रतिष्ठीत मंडळीत मिरविणे कसेसेच वाटू लागले. त्याच्या एका रोटरी मित्राला

माझी ओळख करून देतांना त्याने आपली ही लाचारी बोलून दाखवितांच त्या मित्राने आमचे दोघांचेहि लंचचे पैसे भरून दोघांचाहि पाहुणेपणा आपल्याकडे घेतला.

या क्लबाला हिंदी रोटेरीयनने क्वचितच भेट दिली असावी. म्हणून माझी मध्यवर्ती टेबलावर प्रतिष्ठापना करून विशेष गौरव करण्यांत आला. सभा संपतांच कित्येक मंडळींनी माझी खास ओळख करून घेऊन माझ्यावर प्रश्नांचा भडीमार केला. आणि आश्चर्य की, सर्वांचा सूर एकच! तुमच्या देशात 'कम्युनिझम' कसा काय आहे?

अमेरिकेतील साऱ्याच दौऱ्यांत या सुखेनैव जीवन कंठणाऱ्या अमेरिकनांना कम्युनिझमने' कती भेडसाविले आहे याचा प्रत्यय पदोपदी येत होता. आणि मी जेव्हा विनोबांच्या 'सबभूमी गोपालकी' या क्रांतिकारी घोषणेची हकीकत सांगून कम्युनिझमला भारतात थारा कधीहि मिळणार नाही म्हणून ग्वाही देत असे तेव्हा तर ते थक्क होऊन जात. मला राहुन राहून आश्चर्य वाटे की, या आपल्या देशांतील चालू अभिनव घटनेची तिकडे मुळी देखील कल्पना नाही. नाही म्हणावयास याच क्लबात एक वृद्ध पितामह विनोबाचे नांव ऐकताच पुढे आले व आपण अमक्या अमक्या मासिकांत या अजब गृहस्थाचा फोटो पाहिल्याचे सागून माझ्या म्हणण्याला दुजोरा देऊ लागले. या घटनेने मला जागच्या जागीच चारदोन मंडळीनी आपल्या घरी रात्री जेवणाची आमंत्रणे दिली. उद्देश हा की माझ्याशी आणखी चर्चा करण्याला संधी मिळावी. पण मला ती साभार नाकारावी लागली कारण निल्सनने माझ्या दोन्ही दिवसाच्या कार्यक्रमाची आगाऊच आंखणी करून ठेविली होती.

आता निल्सन मला आपल्या युटा कॉलेजातील शा.शि.च्या निरनिराळ्या क्षेत्रांतील व्यवस्था दाखवीत होता. ही एका ओळीने असलेली १०-१२ टेनिस कोर्टे, हा आमका स्टेडियम, ही व्यायाम शाळा, हे शरीरतपासणी व शुश्रुषागृह इत्यादि भव्य व अद्यावत सोई दाखवीत त्याने मला पोहण्याच्या टाक्याकडे आणले. दोही बाजूला पायरीच्या गॅलऱ्या काढलेल्या असून

कांचेसारख्या झळकणाऱ्या सुसह्य अशा शीतोष्ण पाण्याचे ते सुंदर आखणी केलेले टाके मधोमध पसरलेले होते. शिक्षक पोहण्याचा वर्ग घेत होते, कांही तरुण संपूर्ण नागडे एका ओळीत उभे होते. ही नग्नावस्थेतील शिक्षणप्रणाली पाहून मी क्षणभर गोंधळून गेलों, पण त्याना त्याचे काहीच वाटत नव्हते. ही पद्धत मला एका दृष्टीने फारच चागली वाटली. कारण सर्वांग खुले करून संवगड्यासमवेत शिक्षकासमोर अशा तऱ्हेनें वावरणारे तरुण, गुप्त रोगांना बळी पडणें अशक्य होते. आमच्याकडील तरुणांना तारूण्यांतील दुर्धर रोगांना बळी पडून त्याचा परिस्फोट होऊ न देतां समाजांत वावरतां येते व लागट रोगांचा विनाकारण प्रसार होऊ देण्याचें दुर्भाग्य पदरी घ्यावे लागते.

नंतर श्री. निल्सन यांच्या हातांखालील शारीरिक शिक्षणाच्या पंचेवीसएक शिक्षकशिक्षकिणींना त्यांनी एकत्र बोलावून माझ्याशी अनौपचारीकरीत्यां चर्चा केली. भारतांतील व्यायाम पद्धतीबद्दल मी जरी त्याना अनेक गोष्टी सांगितल्या तरी त्यांना शास्त्रीय पुराव्याच्या अभावी व प्रगत अमेरिकेच्या ज्वलंत स्वाभिमानामुळे त्याचे महत्त्व पटणे शक्य नव्हतें

येथून आम्ही निघालो तों तेथून तीस मैलावर असलेल्या सुप्रसिद्ध तांब्याच्या खाणी पहाण्यास गेलो. प्रथम आम्ही पहाडी रस्त्याने एका वस्तीत शिरलो. ही वस्ती पाहून मी आपल्या ओळखीच्या एखाद्या हिंदी खेड्यांत असल्याचा मला भास झाला. या गांवात एकच रस्ता असून तो उंचसखल, नागमोडी व अरुंद असून कामगारांची लहान मुलें सडकासडकांनी खेळतांना दिसली. विरुद्ध दिशेनें मोटार आली कीं सारे दळणवळण अडल्या जाई. असे करीत करीत आमची मोटार एका पहाडी बोगद्याजवळ येऊन थडकली. या लांबचलांब बोगद्यांतून एकच मोटार जाण्याला मार्ग असल्यामुळे तिकडल्या येणाऱ्या गाड्यांची रीघ संपेपर्यंत तिष्ठत उभे रहाणे भागच होते. बोगद्याच्या दुसऱ्या टोकाला बाहेर निघतांच दुसरी तशीच एक खेड्याची वस्ती. आणि हे बघा आम्ही आतां खाणीसमोर उभे आहोंत.

आपल्या मध्यप्रांतांत मॅंगनीजच्या खाणी पुष्कळानी पाहिल्या असतील. पण ही खाण काही औरच दिसली. प्रेक्षकाना पाहण्याकरिता या केलेल्या जागेतून दूरवर खोल, खाली, गोल कापत कापत, सर्कशीच्या तंबूसारख्या त्या प्रचंड गॅलऱ्या. आणि या गॅलरीच्या प्रत्येक पायरी सारख्या रुंद गोलगोल रस्त्याने आगगाडीचे जाळे. या पहाडाची माती यंत्राच्या साहाय्याने व धडमधम स्फोट करून काढली जात होती, व मालगाड्यांचें डबे भरभरून एका कोपऱ्यांतील बोगद्यातून ही मालगाडी गडप होत होती. हजारो मजूर तेथे काम करीत होते व मधून मधून स्फोटाचे आवाज धडधडत होते

या खाणीची ती मैलभर पसरलेली गोलाकार रचना पहात आम्ही किती तरी वेळ उभे होतो. या लालसर मातीत शेकडा फक्त २ ते ३ तांबे असते. येथून आम्ही आल्या वाटेने परतलो व तेथून १०–१२ मैलावर असलेल्या खाऱ्या पाण्याच्या सरोवराकडे आलो. याच सरोवराच्या बाजूने त्या मातीतून तांबे काढण्याचे कारखाने आहेत. (Smelting)

हे प्रचंड साल्टलेक एकेकाळी समुद्राचाच भाग असावा व निसर्गाच्या लहरीने आजुबाजूची जमीन उंचावली व समुद्राचे सरोवर झाले. यातून मीठ काढण्याचा सपाटा चालू असल्यामुळे आता हा क्षारसागर आकुंचन पावू लागला असल्याचे सांगण्यात आले.

येता येता एका पेट्रोल पंपावर निल्सनने पेट्रोल घेण्याकरीता गाडी थांबविली. दहा गॅलनला फक्त एक डॉलर नव्वद सेंट पडले. या ठिकाणी अठ्ठेचाळीस पंप असून प्रत्येक पंपावर गाड्या भराभरा पेट्रोल पिऊन निमिषार्धात निघून जात होत्या. वेळेला केवढी किमत आहे या देशांत !

'साल्टलेक' व 'कॉपरमाइन्स' पाहून आम्ही सायंकाळी घरीं परतलो तों डॉ. भारद्वाज यांचा फोन आल्याचे कळले. कारण मला त्यांच्याकडे जेवायला जावयाचें होते.

या युटा युनिव्हर्सीटीच्या मेडीकल कॉलेजमधे आपले ६–७ हिंदी डॉक्टर उच्च शिक्षण घेत आहेत. ते आज सारे एकत्रित येऊन डॉ. सोहनलाल अग्रवाल व त्यांच्या पत्नि डॉ. सुशीला यांचेकडे जमून मला त्या साऱ्याच्या सहभोजनाचा लाभ देणार होते.

आम्ही सर्वांनी मिळून भात, भाजी वगैरे तयार करून घेतली व आपल्या देशी पद्धतीने खाली चादर पसरून त्यावर गप्पा ठोकीत मजेत जेवण केले. डॉ. भारद्वाज हे रेडीओलॉजीचे उच्च शिक्षण घेऊन त्याच कॉलेजात तात्पुर्ते प्रोफेसरचे काम करीत होते. त्यांनी बोलता बोलता भारतात परत गेल्यानंतर आमचें सरकार आमच्या येथील योग्यतेप्रमाणें आम्हाला पगार देऊन आमच्या मौलिक गुणाचें कसे काय चीज करणार! अशी शका प्रदर्शित केली.

त्याचे हे विचार ऐकून मला त्यांची कीव आली व मी स्पष्टच सांगितलें कीं,"आपण अमेरीकेशी आपल्या गरीब भारताची काय म्हणून तुलना करिता? वास्तविक डॉक्टरी पेशा हा मूलभूत समाजसेवकांचा आहे. व ती वृत्ती ठेवूनच तुम्ही भारतांत परत यावे व आपल्या उच्च गुणाचा समाजाला फायदा करून द्यावा. वेतन, स्थानिक आर्थिक मानाने मिळणारच आहे. निव्वळ पैशाकडेच आपली दृष्टी असेल तर आपण भारतांत न आलेले बरे ! आपल्या नवोदीत देशाला तुमच्यासारख्याकडून त्यागाची अपेक्षा आहे ! उठलासुटला भारताच्या तिजोरीतून पैसे उचलतो व परदेशांतून परत येताच आपली सुवर्णतुला करू पहातो. आणि ते जमले नाहीं म्हणजे भारत सरकारला शिव्या मोजतो. त्यापेक्षा असें शिक्षण न मिळाले तर काय बिघडणार आहे ? "

माझे असे सडेतोड विचार ऐकून ते सारे गप्पच झाले.

रात्रौ नऊ वाजता मी परतलो तो निल्सन माझी वाटच पहात होतें. त्यांनी रात्रीचा 'ड्राइव्ह–इन–थिएटरमध्यें' सिनेमाचा कार्यक्रम आंखला होता. मी, निल्सनची तीन मुलें व स्वत: निल्सन असे गांवच्या वेशीवर

एका उघड्या मैदानावर आलो. प्रवेशद्वारांतून शिरताशिरता एक मिनिट गाडी उभी करून त्यानें बाहेर हात घालून तिकिटे घेतली व मोटार पुढे काढली. आत मोकळ्या पटागणांत आपआपल्या ठराविक सीटवर मोटा-रींच्या रांगा लागल्या होत्या. समोर मधोमध सर्वांना मोटारमधील सीटवर सुखानें बसून सहज पाहतां येईल असाच सिनेमाचा पडदा होता.

निलसनची मुले म्हणू लागली, " पाठककाका तुमच्या बाजूचा कांच खाली करा व बाजुच्या खाबावरचा स्पिकर आंत घेऊन कांचेवर बसवा व काच बद करा". बाहेर थंडी, पाऊस, वारा, कांहीहि असो गाडीच्या खिडक्या बद करून बसल्या बसल्या बोलपट पाहण्याची ही सोय या देशात सर्वत्र दिसून येते. खेड्यापाड्यांतील शेतकरी पांचपंचेवोस मैल मोटारनें जाऊन गाडीतूनच असे बोलपट पाहून आपली करमणूक करून घेतात.

आज माझा या साल्टलेक सिटीमधला तिसरा व शेवटचा दिवस सकाळी शौचमुखमार्जन आटोपतांच श्रीमती निल्सन यांनी आपल्याला सकाळच्या न्याहारीला काय चालेल म्हणून विचारले. प्रत्येक जेवणांत ताज्या फळांच्या रसपानाची इकडे फार पद्धत आहे. मी आज द्राक्षाचा मधूर रस ग्लासभर प्यालो व इतर फराळ करून निलसन बरोबर आपले सामान घेऊनच बाहेर पडलों. रात्रीच्या बसने मला पुढे जावयाचे होते.

प्रथम आम्ही येथील सुप्रसिद्ध मार्मोनपंथी देवालय पहाण्यास गेलो. हा मार्मोन पंथ ख्रिस्त धर्मपैकी एक तिसराच पंथ आहे. साल्टलेक सिटी ही यांची काशी असून या युटा प्रांतातील अर्ध्याच्यावर लोकसंख्या मार्मोन-पथी आहे. येथील मुख्य देवालयांत फक्त मार्मोनलाच प्रवेश आहे. तेथे दुसरे एक प्रार्थनामंदीर आहे. त्याच्या ऐतीहासीक रचनेसंबंधी व या पंथाचा जो प्रेषीत आहे, त्यासंबंधी अनेक रसभरीत कथा येथें सांगण्यांत येतात. दर्शनार्थी लोकांचे थवेच्या थवे या प्रार्थनामदीरांत व आजुबाजूच्या हिरव्यागार पटांगणांत मोठ्या औत्सुक्याने तेथील कुशल प्रचारकांच्या कथा श्रवण करीत असतात.

ही या तृतीयपंथी धर्माची यात्रा संपवून आम्ही थोडा फराळ केला व निल्सन यांच्या खेड्यावर जाण्यास निघालो. वाटेत एक ब्रिगहॅम शहर लागले. या ग्रामी 'नवाजो इन्डीयन्' या आदिवासी अमेरिकनांची एक शाळा आहे. वास्तविक रेड इंडियन्स हेच खरे अमेरिकन्. पण त्याच्यावर आज एका मागासलेल्या जमातीचा शिक्का बसलेला आहे. आणि यूरोपातील सारे गोरे तेथे अमेरीकन म्हणून मिरवीत आहेत.

रेड इन्डीअन्सची शिकार करीत करीत त्याना मध्य व दक्षिण अमेरिकेत एकत्र करून त्याचे कित्येक रिझर्व्हेशन तयार झालेले आहेत. या लोकाना ना शिक्षण ना सस्कार! आणि वर संपन्न अशा या खंडात खाण्याची मारामार! आता मात्र अमेरिकन सरकारने एक 'ब्युरो ऑफ इंडियन अफेअर्स' ने स्वतंत्र खाते निर्माण करून त्याना आत्मसात करून घेण्याच्या कित्येक योजना आखलेल्या आहेत. या योजनेपैकीच ही एक सर्वात मोठी वसतिगृहवजा शाळा आहे. या वसतिगृहात दोन हजाराचेवर मुलामुलींची सहशिक्षणाची व्यवस्था आहे.

निल्सनचे खेडे जसे जवळ आले तसे तो आजूबाजूच्या शेतकऱ्याची माहिती सागू लागला. "हे बघा हे लहानसे झोपडे, यात माझे आजोबा व आजीबाई रहातात."

त्या लहानशा झोपडीत आम्ही शिरलो तो एक जख्ख जोडपे तेथे दिसले. म्हातारा कापऱ्या हाताने चमचा धरून 'सूप' पीत होता. त्याच्याच्याने उठवेना. म्हातारीने निल्सन आल्याचे सागताच त्यानें चमचा टेबलावर ठेवून हात पुढे केला. माझी ओळख करून देताच, मी एक लांबचा हिंदुस्थानी त्याच्या झोपडीत आल्याचे पाहून त्याना अत्यानंद झाला." परसात काय काय लावले आहे, माझी मोटार माझ्यासारखीच म्हातारी झाली असली तरी अजून काम देते, पलीकडचा मोठा कोठा भाड्यानें कसा दिला" वगैरे गोष्टी निघून, निल्सन आमची आठवण ठेवून आधून मधून चौकशी करीत असल्याचे त्यांनी मोठ्या अभिमानाने सांगितले. त्याची ही झोपडी आधुनिक

सुखसोयींनी संपूर्ण होती. विजेचे दिवे, वाशबेसीन, नळ, खुर्च्या, टेबले वगैरे सर्व होते. पण नातवापंतवामध्ये मन रिझवून त्याच्या सुखदुःखात उरलेले जीवन कठण्याचे आपल्यासारखे भाग्य मात्र त्याना नव्हते.

आता हे बघा आम्ही ' मिलव्हिला ' येथें येऊन पोचलो.

हे तीनचारशे घराचे खेडे. सायकाळची वेळ होती. निल्सनने फाटकाशी मोटार उभी करताच त्याच्या ओळखीचा 'टिप्या' भोकत धावतच आला त्याच्या आवाजानें त्याची भावजय व मुले बाहेर आली भाऊ शेतावर कामात होता. त्या दिवशी त्याच्या भावाच्या लग्नाचा वाढदिवस होता म्हणून गावातल्या चार बाया घरी जमल्या होत्या.

अमेरिकन, लोकात जन्म दिवसापेक्षा लग्नगाठीचा प्रतीवर्षदिन साजरा करणे विशेष महत्वाचे आहे. निल्सनने आपल्या भावजयीचे अभिनंदन करून सांगितले की, "हे माझे मित्र कुठून आले ठाऊक आहे काय ?. हिंदुस्थान! आज तुझ्या या शुभदिनी तू भाग्यवान आहेस. याना दुध-भाकरीचे जेवण दे". सर्वांची ओळखी करून झाल्यावर शेजारीच निल्सनची विधवा म्हातारी बहीण राहत होती तिच्या घरी आम्ही गेलो. हे निल्सनचेच घर होते. त्या घरात निल्सनचे बालपण गेले होते हा बापाचा आवडता पियानो, ही ग्यासची चूल. किती वर्षे झालीं तरी अजून काम देते. खाली तळघरात गाजरे तोडून भरली होती. मागचा गोठा अगदी मोडकळीस आला होता, तो दाखवित निल्सन म्हणाला, " बघा माझा भाऊ किती आळशी आहे, या कोठ्याची दुरुस्ती सुद्धा त्याच्याच्याने होत नाही." शेणकुड जिकडे तिकडे पसरलें असून घाणहि येत होती तो आपल्या बंधुराजाची नालस्ती करून कीवहि करीत होता.

हे लहानसे खेडे पण चोहिकडे चौरस सडका, विजेचे खांब व पाण्याकरिता नळ, मुलाच्या शिक्षणाकरिता एक उत्तम शाळा व ग्रामपंचायत अशा सर्व सोयींनी सुसज्ज असेच होते.

आतां आम्ही त्या खेड्यांतल्या घरांत बसून भाकरी खात होतों. ही ब्रेड त्या भावजयीनें घरीच भाजली असून त्याबरोबर उत्कृष्ट गायीचे दूध, जाम, फळे, बिस्कीटे इत्यादी टेबलावर ठेवीली होतीं. आम्ही जेवण करीत असतांनाच निल्सनचा भाऊ त्याला निरोप गेल्यामुळें शेतीवरून भरल्या कपड्यानेच भावाच्या भेटीला आला व पांचसांत मिनिटे गोष्टी करून, त्याचा बांध्यांत आज रात्रीं पाणी सोडणें चालू असल्यामुळें आमची क्षमा मागून निघून गेला. इतक्यांत निल्सनचे दोघे पुतणें आले. मोटा शेजारच्या गांवी शेतकी विद्यालयांत शिक्षण घेत होता व लहान शाळेत शिकत होता. हे दोघेहि सायकलनें दहा मैल आपल्या शाळा कॉलेजला जात येत असत.

या शेतकरी कुटुंबांत मला वावरतांना फारच मौज वाटली. देशपरत्वे तऱ्हा बदलत असल्या तरी मानवी जीवनाचें ध्येय एकच असल्याची मला जाणीव झाली. सुखाचा संसार करण्याकरितां प्रेमाची आवश्यकता सगळीकडे सारखीच दिसून येते.

रात्री आठला आम्ही हें गांव सोडले व दहाच्या सुमारास परत शहरांत येऊन ग्रेहांउंडचें बस स्टेशन गाठलें. मला १०॥ ची बस पकडावयाची होती. आज निल्सननें साऱ्या दिवसभर तिनशेच्यावर मैलांचा मोटारनें फेरफटका करून अमेरिकन जीवनाचें बरेंच नवनवे कप्पे मला दाखविले होते.

त्याचें मनःपूर्वक आभार मानून या साल्टलेकसिटीला मी रामराम ठोकला व रात्रीच्या बसने कॅलिफोर्नियाकडे प्रयाण केलें



# वाळवंटातील विमानतळ

## (चतुर्दश खंड)

### जगांतील मोठे विमानतळ–लॉसअँजेलीस–हॉलीवूड ग्रँडबीच–पार्कस--फ्रेस्नोचा शेतकरी--गोदोहन

आज माझ्या या पृथ्वीप्रदक्षिणेचा ४० वा दिवस. गुरुवार ता. १३ मे. अमेरिकेच्या पश्चिम किनाऱ्यावर असलेल्या सुप्रसिद्ध कॅलिफोर्निया प्रांतातून आमची बस चालली होती.

मी रात्री १०॥ ला सॉल्टलेकसिटी सोडली. तों सकाळीं पाचाला सेंट जार्ज या ठिकाणीं आमची बस कांही वेळ थांबली. येथून अमेरिकेंतील सुप्रसिद्ध ग्रंड कनियनला जाण्याचा मार्ग आहे. पण निव्वळ क्रीडा करण्याचा माझा उद्देश नसल्यामुळें व एक कॅनियन्स उत्तम तऱ्हेनें पाहिल्यानंतर आतां आणखी जास्त वेळ घालविणें मला योग्य वाटलें नाहीं. म्हणून मी येथें उतरलो नाही.

आतां आम्ही अमेरिकेतील एकूण अठ्ठेचाळीस स्टेटपैकी सर्वात अतिशय समृद्ध अशा कॅलिफोर्नियांत प्रवेश करीत होतो. नेव्हाडा व अरीझोना,उजवीडावीकडे सोडून सकाळी दहाच्या सुमाराला प्रथम एका अतिशय रुक्ष भागांत आम्ही शिरलो.कॅलिफोर्निया तर धनधान्यानें विपूल म्हणून ख्याती आणि हे तर केवढे तरी भयाण वाळवंट! या वाळवंटाचे नांव डेथ्व्हाली. नांवच तर भयंकर वाटते! हा भाग समुद्रसपाटीपासून तीनशे फुट खाली आहे.

हा वाळवंटाचा प्रवास सतत पांच तास चालू होता. पण उद्योगप्रिय अमेरिकनांनी या वाळवटाचाहि कसा कौशल्यानें उपयोग केला ते पहाण्या-सारखे आहे. मला प्रथम कळेना की हा इतका लांबचा रस्ता या लोकानी वाळवटातूनच का काढला! पण आम्ही जसजसे आत शिरू लागलो तस-तसे 'जगल मे मगल' झालेले माझ्या दृष्टोत्पतीस येऊ लागले. अरब-स्तान सारखी आमची बस वाळूतून मार्ग काढीत नसून या वाळवंटातून काढलेल्या उत्तम डांमरी रस्त्याने चालली होती. आणि बाहेरचे दृष्यहि वेगळेच दिसत होते.

आपल्या इकडचा पानापानाचा काटेरी निवडूग आपण पाहिलेला असेलच आणि हा मृत्यूच्या खाईतील (Death valley) अमेरिकन निवडूग बघा. मळकट हिरव्या रंगाचे, काडयाला कांडे वाढून, पर्णपुष्पहीन उभ्या समातर रेषाची मंडीत, असे हे रोपटे ही रोपटे तर काही काही ठिकाणी वृक्षालाहि लाजवितील अशी उभाट वाढून उभी असलेली पाहीली म्हणजे निसर्गीय कौशल्याचे कौतुक केल्याविना रहावत नाही आणि म्हणूनच कित्येक अमेरिकन कॅलेंडरवर आपण या रुक्ष निवडूगाची सुंदर चित्रे काढलेली पहातो.

आणि अशा या वाळवटात हा बघा केवढा मोठा विमानतळ पसर-लेला आहे. मी साऱ्या जगाचा प्रवास विमानानेच केल्यामुळें पृथ्वीवरील बहुतेक तळ माझ्या पाहण्यात आले. पण हा अवाढव्य विमानतळ पहातांच माझ्या ध्यानात आले की, हे वैमानिकाचें लष्करी केद्र असावे. कारण तेथे युद्धकालात नित्य दृष्टीस पडणारे सामुहिक उड्डाण व त्याची कर्णकटू घरघर सारखी चालू होती. आणि आजुबाजूचा फापटपसारा तरी किती पसरलेला! आणि हजारो कामगारांची ती रहाण्याची व्यवस्था!

पक्की घरे बाधणें कदाचित येथे या रेताड जमीनीत शक्य नसावे. आणि कदाचीत युद्धांतील एखाद्या आणीबाणीच्या प्रसगी अविलब पलायन् करता यावे म्हणून येथें हे बघा चाकावरच (mobile) शहर वसलेंले दिसत आहे.

हे ट्रेलर–टाऊन पाहुन मला मोठी गम्मत वाटली. अमेरिकेत आजकाल मोटारीना निरनिराळया उपयोगाकरीता ट्रेलर जोडण्याची क्लुप्ती निघालेली आहे. या शहरातील ही सारी घरे या ट्रेलरचीच बनलेली आहेत. चार चाकावरचे घरच ते! नीट ओळीओळीने उभे करून आत राहण्याच्या सर्व सोयी.

कॅलिफोर्नियाच्या हद्दीतील पहिल्या मुक्कामावर बस थाबताच कस्टम अधिकारी गाडीत शिरले व आमच्या सामानाची तपासणी करू लागले. त्यापूर्वी प्रत्येकाला एक फॉर्म भरून द्यावा लागला.त्यात कॅलीफोर्निया सरकारच्या शेतकी खात्याच्या नियमाप्रमाणे प्रवाशाने कोणतेही फळ, फुल अगर झाडझुडुप बरोबर आणले नाही अशी हमी द्यावी लागते.

एका प्रवाशाजवळ दोन सुंदर लालभडक सफरचद निघाले. ते त्यांनी जप्त केले ही काय बला आहे म्हणून चौकशी करीता असे कळले की, फळे, फुले अगर कसलीहि रोपे या प्रदेशात बाहेरून आणण्याला कडक बंदी आहे. कारण अशा वस्तुंतून एखादी कीड येऊन त्याची बाधा कॅलिफोर्नियातील शास्त्रोक्त व सुंदर बागाना होऊ नये, म्हणून ही काळजी घेण्यात येते.

अस्से! आहे खरी मौज. आणि आमच्याकडे प्रवाशाची खेचाखेच असलेल्या गाड्यांतून दुर्धर रोग घेऊन मिरविणारे भिकारी खुशाल धक्के मारीत ससर्गीय रोगाची पेरणी सरास करीत असताना, ईश्वरच आमचा पाठीराखा आहे म्हणून स्वस्थ बसावे लागते.

ही वाळवटातील अजब मौज पहात साडेचारच्या सुमाराला आम्हीं सॅनबरन्यरडीनो या दक्षिण कॅलिफोर्नीयातील एका शहरी येऊन पोहोचलो. मी चहा घेण्याकरिता येथील बाजारात जरा भटकून तेथील मौज पाहिली.

या भागातील लोक उचीने धिप्पाड असून त्याची एकंदर रहाणी व ठेवण काहीं निराळीच वाटली. आणि हे काय? ही कसली दुकानें! गॅम्बलींग दिसतें आहे. एकसारखी कितीतरी यंत्रे येथे लाविलेली असून

खुळखुळ, खडकट्ट असे आवाज येत आहेत. तेथील गिऱ्हाईक एकेका यंत्रा-वर जागा पटकावून वर मूडी न करता सारखा पैशाचा खेळ खेळत आहेत.

हा सतत वीस तासांचा बसमधील प्रवास संपवून सायंकाळी सहा वाजता आम्ही एकदाचे लॉसअँजेलीस गाठले. हे तीस लाख वस्तीचे कॅलि-फोर्नियातील सर्वात मोठे व अमेरीकेतील तिसऱ्या नंबरचे शहर, पश्चिम किनाऱ्यावर आहे. येथे माझी कुणाचीच ओळख नव्हती व तशी आगाऊ कांही व्यवस्थाहि केलेली नव्हती. पण 'वाय्' मध्ये पत्ता काढीत काढीत गलो व सुदैवाने तेथे खोलीहि उत्तम मिळाली. नाही म्हणावयास शिकॅगो येथील पार्क डिस्ट्रिक्टचें प्रमुख श्री. वाल्टर रॉय यानी लॉस अँजेलीस कौंटी कौंसिलच्या डायरेक्टर ऑफ रिक्रीएशन श्री. जार्ज गेल्डीझ यांना एक ओळखपत्र दिले होते व रॉचेस्टरच्या कोडयाॅकमधून त्यांच्या येथील हॉलीवुडच्या कचेरीलाहि एक पत्र मी बरोबर आणले होते. या दोन ओळखपत्रांनी व रोटेरीयन् म्हणून झालेल्या कांही ओळखींच्या भरव-शावर हे येवढे आवाढव्य शहर पण अवघ्या सहा दिवसाच्या मुक्कामांत सारे कसे पायाखाली घालून मी अनेक अनुभव घेतले.

आजच्या सिनेमा सृष्टीच्या जगांत हॉलीवुड हे नांव लहानथोराच्या परिचयाचे झाले आहे. आणि मी तर आता थेट हॉलीवुडमध्येच येऊन पोहोचलो होतो! मुम्बईत जसे दादरच्या भागात बहुतेक सिनेमा कंपन्यांचें स्टुडिओ एकत्रित झाले आहेत. तसाच हा लॉस अँजेलीस शहरामधील हॉलीवुडचा विभाग आहे

पहिलेच दिवशी कोडॉकमधील मॅनेजरच्या सहाय्याने मी सारे प्रसिद्ध स्टुडीओ फिरून आलो. पण मला मुम्बईच्या स्टुडिओंत व येथील स्टुडीओंत विशेष असा फरक मुळीच दिसला नाही. मी जर्मनीतील 'ऊफा' पारीसचा 'पाथे' व लंडनचेहि स्टुडिओ पाहिले आहेत. शिवाय रशियन स्टुडिओ तर विशेष चिकित्सेने पाहिला होता. ही विश्वामि-त्राची सृष्टी येथून तेथून सारी सारखीच. चित्रपट निर्माण करण्याचे

कौशल्य, अभ्यासू व विशाल दृष्टीच्या कलावंतात साठविलेले असतें व अशा कल्पनारम्य निर्मितीला भरपूर पैशाचे पाठबळ लागतें. ते मात्र अमेरीकेंत भरपूर असून या अभीनव कलेच्या शास्त्रोक्त अभ्यासाची येथील युनिव्हर्सीटीनें उत्तम सोय केलेली आहे. सदर्न कॅलीफोर्निया युनिव्हर्सीटिला मी मुद्दाम भेट देऊन तेथील चित्रपट विभागाची बारकाईने पाहणी केली. या कलेची उच्च पातळीवरून अभ्यास करण्याची सोय फक्त याच युनिव्हर्सिटींत असल्याचे मी पाहिलें. हिंदी विद्यार्थ्यांनी मात्र या क्षेत्रांत अजून पदार्पण केलेलें दिसत नाहीं.

जार्ज गेल्डीझ याना फोन करिता असे कळलें कीं, ते बाहेरगावी गेले असून दोन दिवसानी परत येणार आहेत. पण त्यांच्या कचेंरींत वॉल्टर रॉय यानी मला दिलेल्या पत्राची प्रत अगोदरच येऊन पोचली असल्यामुळें जार्जनें आपल्या हाताखालील अधिकाऱ्याला मी येंतांच मला लागेल ती मदत करण्याच्या सूचना देवून ठेविल्या होत्या. त्या गृहस्थानें दोन दिवस आपल्या मोटारने त्यांच्या करमणुक खात्यानें चालविलेल्या अनेक गोष्टी मला दाखविल्या. शहरात राहून काबाडकष्ट करणाऱ्या नागरिकांचे जीवन कटाळवाणे होऊ नये म्हणून किती काळजी घेतल्या जाते याचे मला येथे पूर्ण प्रत्यंतर आलें.

या दृष्टीने लॉस अँजेलीस हें फारच स दर शहर आहे. एका बाजूला समुद्र व दुसऱ्या बाजूला मनोहर उंचसखल टेकडया. हे बघा कॅंपिंग ग्राऊंड शहरापासून फार लांब नाही. पण नियमीत बसेसनी जाण्या–येण्याची सोय केलेली आहे. येथें ही बघा फनीक्युलर रेल्वे शूटींग, स्वीमींग, हायकींग, रायडींग काय वाटेल त्या सर्व उच्च क्रीडासौख्याची साधनें उपलब्ध करून ठेविली आहेत.

आणि ही बघा येथें ही जुनी इंजिने, जुन्या मोटारी, जुनी विमानें आणि इतर पुराणवस्तू यंत्रे इतस्ततः पडलेली दिसत आहेत. ही येथें कशाकरिता असें विचारतांच तो मित्र सांगु लागला कीं, रिकाम्या वेळी

अशा जुन्या वस्तूचे प्रस्तुत अकल्पीत शोधांची तुलना करता करता पहाणाराला "नर ऐसी करणी करे तो नरका नारायण हो जाय" अशी स्फुर्ती आपोआपच यावी.

हा बघा, हा एक मध्यवस्तीत एक छोटा तलाव आहे. आणि ही लहान लहान मुले मासे पकडण्यात गुग आहेत. या तलावावर फक्त दहा वर्षाच्या आतील मुलांना मासे पकडण्याची कला यावी म्हणून स्पर्धा ठेविलेल्या असतात.

आज मी सहज फिरता फिरता नॉर्थस्टेट स्ट्रीटकडे आलो. एका टेकडीवर एक ऊचच ऊच हवेली डौलाने उभी असलेली दिसली. काय असावे म्हणून मी तिकडे वळलो तो ते तेथील कौंटी जनरल हॉस्पीटल.

आपल्या नागपुरात, आशिया खडात जोड नाही असा दवाखाना नुकताच झालेला आहे. म्हटले पाहु या, हा दवाखाना कसा आणि केवढा आहे तो !

मुद्दाम परवानगी काढून प्रवेश केला व पाय दुखेपर्यन्त भटकून आलो हा दवाखाना जगांतील मोठ्या दवाखान्यातील एक असून येथे तीन हजार रूग्णांची व्यवस्था आहे. या एकोणीस मजल्याच्या इमारतीत एकतीस एकर बाधलेली जागा (Floor space) आहे. तळमजल्यात तीन फर्लांगाच्या बोगद्यांतून विजेने चालणारी ट्राम असून तिच्या सहाय्याने या दवाखान्याला नित्य लागणारे अन्न व इतर वस्तु पुरविल्या जातात

या दवाखान्यातील मासिक मानवी पैदास नऊशे बालकाची असून या दवाखान्याच्या 'अॅम्बुलन्स' मोटारी दर दिवशी एक हजारावर मैलांची धावपळ करतात. धोब्याला सतरा टन वजनाचे कपडे रोजचे रोज धुवून आणावे लागतात. त्यात दहा हजार चादरी व सहा हजार नुसते टॉवेल्स असतात. रोजचीं पाचशे गॅलन दुधाची येथे चंदी असून साठ हजार डॉलर किमतीची औषधे एका महिन्यांत फस्त होतात.

हा सारा व्याप चालविण्याकरितां साडेसातशे नर्सेस व अडीचशे डॉक्टर्स असून शिवाय बाराशे खाजगी डॉक्टर आपला काही वेळ येथें नियमीत हजेरी देऊन सदुपयोगी लावतात.

आज संध्याकाळी मी एकटाच फिरावयास निघालो. वारा चागलाच अगाला झोबू लागला. शेजारी एक प्रोव्हीजनचे लहानसे दुकान दिसले, शिरलो आत व काहीतरी चौकशी करू लागलो दुकानदार मोठा गमतीदार मनुष्य दिसला थडीच्या आसऱ्याला आलेला मी माझी फुकट चौकशी त्याने ओळखली. स्त्री गिऱ्हाईकाच्या देण्याघेण्याच्या गर्दीत त्याने मला आग्रहाने सिगारेट देऊन "आपण हिंदुस्थानी दिसता, बसाना जरा", असे म्हणून लायटर माझ्यासमोर केला.

मुलाला बिस्कीट दे, बाईला एखादी नवीन वस्तु दाखवून एक नमुन्यादाखल तूर्त अशीच घेवून जा, असें विनोदी व गोड बोलून त्यान अर्ध्या तासात दुकानदारी संपविली व कवाड लावून घेतले. एका नमुनेदार व्यक्तीची गाठ पडली म्हणून मला मनांतून आनद झाला

तो सागू लागला. "मी एकटाच असून सकाळपासून जेवलो नाही. तुम्ही आल्यामुळें मला सोबत झाली, मी आतां जेवण करतो."

हा, ड्यूक नावाचा फ्रेंच गृहस्थ होता. लढाईतून परतला तों त्याच्या अमेरिकन गृहीणीनें त्याला कोर्टांत खेचले. याने तिला कोपरापासून हात जोडले व खुशीने काडीमोड देवून त्यानें आपली सुटका करून घेतली. त्या बाईचे कजाग, हिडींबा, वगैरे शेलक्या शब्दांत वर्णन करून साऱ्या अमेरिकनांना तो अशाच शिव्या मोजीत होता.

बिचारा 'ड्युक'! मी त्याला सोबत दिल्यामुळे त्याला केवढा विरंगुळा वाटू लागला. त्याची एक काळी माजर होती ती म्याव्म्याव् व फुसफुस करीत त्याच्याजवळ आली. त्याची आता प्रेमाची अशी हीं एकच वस्तू होती. आणि दुसरी बाटली !

आतल्या बाजूनें एक खोली होती. तेथेंच ड्यूक आपले जेवण करी. आम्ही टेबलाजवळ बसलो. ड्युकने पिण्याचा आग्रह केला. मी त्याला सोबत करण्याकरिता बीअर घेण्याचे कबूल केलें आणि मग आमच्या गोष्टीना रंग चढू लागला. ड्युकने जेवणाचाहि आग्रह केला. पण त्याचे तें जेवण मला पसंत न पडल्यामुळे मी त्याची क्षमा मागितली. त्यानें आपल्या दुकानांतला एक टीन फोडला व आतून एक स्वच्छ सोललेली सबंध कोबडी काढली व ती कादे मीठ वगैरे लावून शिजविली व पावाबरोबर गट्ट करून टाकली.

असो. रात्री अकरा पर्यन्त या व्यक्तीचा विनोदी सहवास लाभल्यामुळे अमेरिकन जीवनाचे अद्‌भुत अतरग मला अभ्यासावयास मिळाले त्यालाहि माझ्या सहवासामुळे इतका आनंद आला की, मला निरोप देतांना त्याने आपल्याकडे गहाण असलेल्या पुरचुंडीतून काही बेमुदत झालेले नकली दागिने देणगीदाखल मला दिले.

जार्ज गेल्डीझ याच्या भेटीकरिता आज मी कौन्टी कौन्सीलच्या कचेरीत आलो. न्युयार्क, शिकॅगो, इत्यादि ठिकाणच्या अवाढव्य कचेऱ्या मी पहात आलो होतो. पण ही श्रीमंत कॅलीफोर्नियाची कौंटीची इमारत अवाढव्य तर होतीच; पण विशेष नवीनतेची झळक त्यात होती. मी गेलो त्यावेळी गेल्डीझ एका मिटींगमध्ये बसले होते. मी तेथेच माझे कार्ड पोचविण्याचा आग्रह धरला.

आणि मौज ही की, चालू सभेत माझे कार्ड जाताच मला तेथेंच पाचारण करावे असे त्या सभेने ठरविलें. ही सभा त्या कौन्टीच्या क्रिडा व पार्क विभागाच्या कमेटीची होती. सात सभासद हजर होते. त्यानीं माझी ओळख करून घेता, मी जेव्हां त्यांना नगरपालिकेचा माजी अध्यक्ष आहे असें सांगितलें तों ते माझेकडे विशेष गौरवानें पाहूं लागले.

# नव्या जगाचा निरोप

## ( पंचदश खंड )

### लॅरी नॉरमन व कार्ल लेविस–सॅनफ्रॅंसिस्कोचे बंदर

### सव्वा आठ मैलाचा अजस्र पूल

### ट्रेलर पार्क

अमेरिकेत विभक्त कुटुंबपद्धति किती किळसवाण्या कळसास पोंचली आहे हें तेथील एखाद्या ट्रेलरपार्कला भेट दिली म्हणजे सहज लक्षांत येतें. लॉस अँजेलीसच्या पार्क व क्रीडा विभागाच्या ज्या सभेंत माझें स्वागत झालें त्याचे अध्यक्ष लॅरी नार्मन हे त्यांचा स्वतःच्या मालकीचा ट्रेलर पार्क मला दाखवीत होते. हे एक भले मोठे खुलें मैदान असून त्यांत हें ट्रेलरच्या छोट्या छोट्या डब्यांचें जणू शहरच वसलें होते. नवरा आणि बायको आणि त्यांचा हा स्वतंत्र संसार. दोघांनीहि नोकऱ्या करावयाच्या, कॅफेटेरीयांत आयतें जेवण करावयाचे व रात्री या डब्यांत हाडें टाकायची.

लॅरीच्या त्या सात जणाच्या सभेंत मी जाऊन पोंचतांच मला त्यांनी आपल्याजवळ बसवून घेतलें व भारतांतील नगरपालिकांच्या कारभारासंबंधीं अनेक प्रश्नोत्तरें करून मोकळ्या मनानें चर्चा केली. लॅरी हा धंद्यानें विमा एजंट असल्यामुळें स्वाभाविकरित्यां त्याला अघळ-पघळ बोलण्याची संवय होती. त्यानें मला सायंकाळी एका प्रसिद्ध हॉटेलांत भोजन दिलें व आपल्या गाडींतून फिरवीत शहराचे दूरदूरचे भाग दाखविले.

असाच एक विमा एजट कार्ल लेविस मला लॉस अँजेलीसच्या रोटरीत भेटला व त्याने मुद्दाम माझी ओळख करून घेऊन आपल्या फ्रेस्नो या गावीं भेट देण्याचें निमत्रण दिलें.

लॉस अँजेलीस ते सॅनफ्रँसिस्को हा प्रवास मी रेल्वेने करावयाचे ठरविले व याच मार्गावर असलेल्या फ्रेस्नो गावी एक लहानसा मुक्काम केला

कॅलीफोर्निया हा अमेरीकेच्या पश्चिम किनाऱ्यावरील प्रात सर्वागीण सुबत्तेने नटलेला आहे. या रेल्वेच्या प्रवासात विविध व अफाट शेतीच्या उत्कृष्ट नमुन्याबरोबर मैलच्यामैल पसरलेल्या तेलाच्या खाबाची जंगले इतस्तत. पसरलेली दिसत होती पर्शियन आखातातील इराण व अरबस्तानमधुन प्रवास करताना पाहिलेल्या तेलाच्या खाणीचें चित्र माझ्या अंत.चक्षुसमोरून सरकू लागले पण कुठे या कॅलिफोर्नियाचा हा स्वयंभू प्रचड विस्तार आणि कुठे ते परोपजीवी अरबी देश! तेल आहे तर पाणी नाही आणि संपत्ति असून बुद्धीची वानवा!

सकाळी सव्वासहाला लास अँजेलीसहून गाडी सुटली. ती शहरी कारखान्यांच्या जाळचातून बाहेर पडली व लागवडीच्या भागात संचार करू लागली. द्राक्षे, ॲप्रीकॉट, ऑरेंजीस्, अॅपल्स इत्यादि फळे व कापूस याची लागवड नुकतीच झालेली दिसत होती. शेताशेतातून ट्रॅक्टर व मोटारींची जा ये सुरू होती.

साडेदहाच्या सुमाराला डोंगराळ मुलुख आला. आणि विज्ञानयुगातील हा बघा आणखी एक चमत्कार! लोहमार्गातील बोगद्यांची मौज तर आपल्या पाहण्यांत नित्याचीच आहे. पण ऊचसखल पहाडी भागातून मार्ग काढण्याची 'लूप' ची योजना जगांत ही एकच आहे.

आमच्या गाडीने त्या डोंगरविभागांतुन वेडावाकडा मार्ग काढीत असा कांही एक गोलाकार चक्कर खाल्ला की, चालून आलेल्या वरच्या लोहमार्गाखालून ही बघा आमची गाडी पुन्हा त्याच ठिकाणी पण कितीतरी खालून जात आहे. आणि हाच तो जगप्रसिद्ध 'लूप'.

फरेस्नोला आमची गाडी दुपारी १।। ला पोचली. लेवीसने आपला एक सेक्रेटरी स्टेशनवर पाठविला होता. मी आपलें सामान स्टेशनवरच ठेविलें व सारी सायकाळ लेवीसबरोबर फिरण्यात घालविली. लेविसनें मला तेवढयांत यांत्रिक शेती व गोपालन अशा दोन धंद्याचे उत्कृष्ट नमुने दाखविले

प्रथम आम्ही फ्रोस्नोपासून बारा मैलावर असलेल्या एका शेतकऱ्याचे घरी गेलो. हा एक दोनशे एकराचा द्राक्षाचा व इतर फळाचा मळा असून त्यांतच त्या शेतकऱ्याचे आधनिक सुखसोयीनी सज्ज असें घर होते. त्याची एकूण शेती पांचशे एकर असून नवरा, बायको व तीन मुलें असा त्यांचा संसार होता. तीन ट्रॅक्टर व पाच मोटारी आणि त्याशिवाय कापूस वेंचण्यापासून सर्व आधुनिक यत्रसामुग्री त्याचेजवळ होती. प्रत्येक ट्रॅक्टर व मोटारीवर रेडोओ टेलीफोन बसविलेले असून घरबसल्या कोण कुठे काम करीत आहे याची वास्तपुस्त व निगा त्यांना राखतां येत होती.

आणि हे बघा आम्ही आता या गौळवाडयात आलों. हत्तीसारख्या सुन्दर आणि स्वच्छ गाईचे गोदोहोन तेथे चालू होते. त्या गौळवाडयांत शंभराच्या जवळपास गाई असत. पाचपाच सातसात गाईचे दोहन एक दम करतां येईल अशी यात्रिक व्यवस्थां होती. ठराविक जागी गाई आणून बांधायच्या व त्यांच्या भरदार आंचळाला विजेच्या ताराशी जोडलेलें यत्र लटकवून द्यावयाचे. बटन दाबले की चारी आंचळाची ती रबरीं बुचे सकसक करीत पपासारखे खालीवर होत व त्याला जोडलेल्या रबरी नळीनें बाजूला ठेवलेल्या पत्रात पांढऱ्या स्वच्छ दुधाची नळासारखी धारवाहू लागें.

एक एक गाय वीस तें पंचेवीस शेर दूध देणारी. त्या गवळयानें सारें दूध ठरावीक वेळी काढून जवळच्या बर्फाच्छादित टाक्यांत छानून भरून ठेवायचें. पुढचें काम कारखानदाराचे. ठराविक ठेकेदाराने हे दूध तेथून नेण्याची व्यवस्था करावयाची व त्याच्या बाटल्या भरून वाटप करावयाचें.

फ्रेस्नो हें तालुक्याचे एक छोटे गांव. तेथील ही सारी आधुनिक विज्ञानाची मौज पाहून मी रात्रीच्या गाडीने निघालो व सकाळीं गोल्डकोस्ट म्हणून प्रसिद्ध असलेल्या सॅनफ्रन्सीस्को या माझ्या अमेरीकेंतील शेवटच्या मुक्कामावर येऊन पोहोचलों.

पॅसिफिक महासागरांतून, हवाई बेटें, फिलिपाईन्स व इतर अनेक आशियाई राष्ट्राशीं जो व्यापारी विस्तार झालेला आहे तो या सॅन-फ्रॉसिन्स्को बेच्या प्रचंड बंदरांतून. या खाडीच्या आसपास अनेक बंदरें उदयास आली असून 'सॅनफ्रॅसिन्स्को–ओकलॅंड बे ब्रिज' हा सव्वा आठ मैलांचा प्रचंड पूल जगांत सर्वांत मोठा म्हणून प्रसिद्ध आहे.

कलकत्याच्या हावरा स्टेशननजीक हावरा नदीवर बांधलेला झुलता पूल पुष्कळांनी पाहिला असेल. हा पूल फारतर एखाद्या मैलाच्या आंतच असेल. पण त्यावरून सॅनफ्रॅसिस्कोच्या बे ब्रीजची थोडीशी कल्पना येऊ शकते.

सॅनफ्रान्सिस्को बे मध्ये आमची गाडी सकाळी ८ ला येऊन थडकली. हे गोडाऊनवजा घाणेरडे स्टेशन पाहून मी गोंधळून गेलो. नीट प्लॅट-फार्म नाही की धड नांवाच्या पाट्या नाहीत. मजजवळ माझ्या एका मोठ्या बॅगशिवाय पुस्तकांचे एक जाडजूड गाठोडे झाले होते. हमालाने विचारले कुठे जायचे ?

रात्रभर जागरण व अपेक्षा न केलेले हे या स्टेशनचे ओंगळ स्वरूप! अशा मनःस्थीतीत मी त्या हमालाला माझे सामान क्लोकरूममध्ये घेऊन चलण्यास सागितले. एक छोटेसे केबीनवजा स्टेशन. कामावरचा मास्तर कुलपाशिवाय असलेले पुस्तकाचे गाठोडे ठेवीना. त्याची थोडी मनधरणी करून सामान तर त्याच्या ताब्यांत दिले व चौकशीला निघालो.

सारे लोक धावपळ करीत एका विवक्षित मार्गाने जात होते. मीहि त्यांच्या मागोमाग गेलो.

तो एक मोठा तराफा माणसाने गजबजून गेला होता. आता माझ्या ध्यानांत आले कीं, आपण उतरलो हे या 'बे' वरील आगगाडीचे टरमीनस्

असून येथून या तराफ्याने पलीकडच्या किनाऱ्यावर असलेल्या सॅनफ्रान्सिस्को बंदराच्या स्टेशनवर जावे लागते.

ही छोटी बोट सुटण्याची घंटा झाली व त्याला जोडलेला पूल उचलल्या जाऊं लागला. मी डेकवर आधीच चढुन गेलो होतो आणि आता ती बोट सुटली आणि माझे सामान! ते राहिले मागे.

वीस मिनिटांत आम्ही पैलतीरावर पोचलो. वारा खूप झोंबत होता आणि माझा 'शीतसरक्षक' (ओव्हरकोट) मला सोडून मागे राहीला होता. हे स्टेशनवजा बंदर मात्र खूप अद्याढव्य व साऱ्या सुखसोयींनी सज्ज होते. प्रथम मी माझी हुडहुडी घालविण्याकरीता तेथील हॉटेलमध्यें चहाचा गरमागरम डोस चढविला व चौकशीच्या स्टॅन्डवर आलो.

तेथील चौकशी कारकुनाने हातचे काम बाजूला सारून माझे म्हणणें शांतपणे ऐकून घेतले व फोन उचलला. खाडीपलीकडील टरमीनसवर त्याने माझ्या सामानाची चौकशी करून पलीकडे बसलेल्या वरच्या अधिकाऱ्याची त्या बाबतीत सल्ला घेतली व तडकाफडकी निर्णय घेऊन मला माझे सामान एक तासांत येथे बोलावून देण्याचे आश्वासन दिले.

साऱ्या अमेरिका खडातील माझ्या प्रवासांत प्रामुख्याने हाच अनुभव मला येत गेला. कुणाशी कुठेहि गांठ पडो, त्याचा सहकार्याचा हात सदैव पुढे असायचा! वास्तवीक, समृद्ध आणि सुखी जीवन व्यतीत करणाऱ्या अमेरिकेमध्यें धमेंड व बेमुर्वतखोरपणा आढळला असता तर विशेष नवल वाटण्याचें कारण नव्हते. पण अशा या क्षुद्र दुर्गुणांत वावरण्याचे दुर्भाग्य लाभलेल्या माझ्यासारख्या भारतीयाला या अमेरिकनाच्या स्वभावविशेषानें पूर्णपणें भारून टाकले.

वीस ते पंचेवीस मे इतके दिवस माझा येथे मुक्काम झाला; कारण येथून हवाई बेटावर उड्डाण करण्याला दिनांक पंचेवीसच्या विमानांत मला जागा मिळाली.

सॅनफ्रॅन्सिस्को हे त्याच नावाच्या खाडीच्या मुखावरील प्रसिद्ध बंदर असून या अमेरीकेच्या महत्वाच्या प्रवेशद्वाराला सुवर्णद्वार (गोल्डन गेट)

असे नामाभिदान प्राप्त झाले आहे. कारण कॅलीफोर्नीयात सोन्याच्या खाणीचा ज्यावेळी शोध लागला त्या वेळी या विभागात प्रवेश करण्याचे हेच तें महाद्वार.

या खाडीतून होणाऱ्या आयात व निर्यात व्यापाराचे व्यापक स्वरूप तेथील त्या अवाढव्य सव्वाआठ मैलाच्या खाडीवरच्या पुलाने व वीस मैल पसरलेल्या बदराच्या विस्तारावरून करता येते.

या पॅसिफिक महासागरातल्या महत्वाच्या बदरात असलेले वैशिष्ठय अभ्यासण्याची अनायासे मिळालेल्या सुवर्णसंधीचा योग मोठा अपूर्व होता. प्रत्येक मे महिन्यात तेथे एक आठवडा 'मॅरीटाईन' फेस्टीवल मोठ्या थाटानें साजरा करण्यांत येतो व या निमित्तानें मिरवणुकी प्रदर्शने सर्व बदरात फुक्ट सहली व निरनिराळ्या मुलकी व लष्करी जहाजाचे अंतर्बाह्य परीक्षण व निरीक्षण. करण्याची संधी सर्वांना प्राप्त होते.

मला टॉरपेडो, सबमरीन इत्यादि जातीच्या पाण्याखालून अनेक दिवस संचार करणाऱ्या बोटींनी चाळीस, चाळीस, माणसे सर्व सुखसोयींनी राहून शत्रूवर पाळत व हमला करणाऱ्या जहाजातून मोकळेंपणानें फिरावयास सापडले. तसेंच येथें एक 'मरीन म्युझियम' आहे. त्यांतून सचार करताना या आधुनिक विज्ञानाचा सांगोपाग इतिहास डोळ्यासमोर उभा रहातो व नवभारताने क्रियाशील बनून अशा अनेक क्षत्रांत द्रुतगतीनें प्रगति करून घेतली नाही तर काळाशी टक्कर देताना, आपले कसे होईल असे विचार मनात येतात.

न्यूयॉर्क शहराला एकशे दोन मजल्याचें एम्पायर बिल्डीग जसे कळसासारखे शोभतें तसे सॅनफ्रॅन्सिस्कोचा हा सव्वा आठ मैलांचा 'बे-ब्रिज' जिकडे जाल तिकडे आपल्या नजरे समोरून हालत नाही. या पुलाचे दोन भाग असून, ट्रेझर बेटापर्यंतचा भाग लटकता असून ओकलॅंडपर्यंत गेलेल्या दुसऱ्या भागाला या बेटावरील बोगद्यानें जोडण्यांत आला आहे. हा पूल दुमजली आहे. त्यांत मोटार व आगगाड्याकरितां वेगवेगळे रस्ते असून जाणारे व येणारे असे स्वतत्र रस्तेहि आहेतच.

पश्चिमेकडील या पॅसिफिक महासागराच्या सुवर्ण महाद्वारांतील आणखी दोन महत्वाच्या गोष्टी सांगून या नव्या जगाचा आपण निरोप घेऊं !

पूर्वेकडील भागाशी जसा युरोपीय राष्ट्राचा विशेष संबंध आल तसा या पाश्चिमात्य भागाशी आशियाई राष्ट्राचा सबंध आला. पण युरोपीयन राष्ट्रांतील लोकात असलेल्या धडाडीसारख्या अभिजात गुणामुळे त्यानी सारी अमेरिका पादाक्रांत केली व व्यापार आणि उद्योगाबरोबर तेथे आपले राज्यहि स्थापित केले.

आशियातील चीन, जपान, फिलिपिनो, हवाइयन् हे लोक पश्चिम किनाऱ्याकडून आले खरे; पण त्यांचे प्रमाण व प्रभाव फारच कमी पडला. त्यातल्या त्यात चिन्याचे प्रमाण पुष्कळच असल्यामुळे आजहि अमेरिकेतील मोठमोठ्या शहरात त्यांची स्वतंत्र वस्ती आहे.

सॅनफ्रन्सिस्कोत तर चायना टाऊन म्हणून चाळीस हजार नागरीकाची सलग वस्ती असून त्याच्या विभागातून वावरताना आपण प्रत्यक्ष चीनमध्येंच असल्याचा भास होतो. त्याची ती पॅगोडासारखी घराची छपरे, अरूद गल्ल्या, दुकानांची ठेवण, देवळे व जिकडे तिकडे चायनी लिपीतील किडेमाकोड्यासारखें उभे फलक !

पण हे सारें चिनी पूर्ण अमेरिकन झालेले असून लाल चीनला शत्रु समान लेखतात.

सहज फिरता फिरता मी एका किराण्याच्या दुकानात शिरलों. त्या दुकानाचा थाट थेट आपल्या आशीयाई पद्धतीचा होता. टेबलखुर्चीच्या ऐवजी गादीवरील चिनी मालक फतकल मारून बसला होता. त्याला थोडेबहुत इंग्रजी येत होते. सारे दुकान चिनी पद्धतीच्या विशिष्ट मालाने व चिनी स्त्रीपुरूषांनी गजबजले होते. यानी शेकडो वर्षें अमेरीकेत राहून आपली चिनी संस्कृती व रहाणीचें मान यांत यत्किंचितहि बदल केलेला दिसत नव्हता.

आता 'सिव्हीक सेंटर' हे काय प्रकरण आहे ते पाहूं. तीन कोटी डॉलर खर्च करून शहराच्या मधोमध बांधलेला हा या शहराचा एक वैशिष्टयपूर्ण भाग आहे. मधोमध अवाढव्य व अद्यावत अशी नगरपालिका. तिच्या दोन्ही अंगाला हे बघा विस्तीर्ण चौक असून तें सुदर बाग-बगीच्यांनी श्रृंगारलेलें आहेत आणि चोहोबाजूच्या या सरकारी कचेऱ्याशिवाय सावजनिक वाचनालय, ऑपेरा, स्वास्थ्यकेंद्र, वारमेमोरियल वगैरे उत्तम नागरिकत्वाचे निदर्शक अशा या सर्व सोयी एकाच ठिकाणीं केंद्रित केलेल्या दिसत आहेत.

अशा तऱ्हेनें या नव्या जगाचे वास्तव व विराट दर्शन घेत घेत अठ्ठेचाळीस दिवस मजल दर मजल करीत मी हा चार हजार मैलाचा अभिनव प्रवास सपविला.

गुरुवार ता. ८ एप्रिलला या भूमीवरील पूर्वेकडील बोस्टन शहरी मी प्रथम उतरलो व मगळवार ता. २५ मे रोजी पश्चिमेकडील सॅन-फ्रॅन्सिस्को या शहरांतून या नव्या जगाचा निरोप घेत आहे. काय पाहिले मी या नव्या जगांत! अमेरिकेंत पदार्पण करताना मी कोणत्या भावनांनी भारावलो होतो! आणि या नंदनवनाचा निरोप घेतांना आज! माझ्या भावना तर राहोच पण माझ्यातच कितीतरी बदल झाल्याचा भास मला होत होता. मी जे पाहिले, जेथे वावरलो आणि ज्याचा प्रत्यक्ष अनुभव घेतला ते हे नवे जग! अमेरिकेत रहाणाऱ्या सुभगांचें हे जीवन!

२२ मे हा माझा जन्मदिन, मी नव्या जगाचा निरोप घताना अमेरिकेच्या पश्चीम किनाऱ्यावर साजरा केला व नवे विचार व नवा अवतार घेऊन आता पुनश्च जुन्या जगाकडे वळत आहे.



# हवाई बेटें

## ( सप्तदश खंड )

'हवाई बेटें' हा एक पॅसिफिक महासागरांतील ७–८ छोटया बेटांचा समूह आहे. या बेटांना तेथील सुखावह हवामानामुळे स्वर्गाची उपमा देण्यांत आली आहे. कारण येथें सदा सर्वकाळ एकच ऋतु आणि तोहि 'वसंत'. येथील उष्णतामान ७१ अंशाच्या खाली जात नाहीं व ७९ अंशावरहि कधीं वाढत नाहीं. आणि सदैववसंताची बहार. हिरवीगार नयनमनोहर वनश्री. हरतऱ्हेच्या फळाफुलांनी नटलेली असते.

या बेटांना उथळ व शांत समुद्राचें वेष्टन असल्यामुळे पोहण्याची मौज तर सदैव लुटता येते.

सॅनफ्रान्सिस्कोच्या विमान तळावरून आमचें पॅन अमेरिकनचें क्लिपर जातीचे विमान सकाळी ११॥ ला निघाले ते९॥ तासांत संथपणें आकाशाच्या पोकळीतून भ्रमण करीत चोवीसशे मैलांचा प्रवास संपवून सायंकाळी सहा वाजता होनोलोलूला उतरले. साऱ्या प्रवासांत खाली शांत व गंभीर सागर व वर निरभ्र नीलवर्ण आकाश. माझ्या घडयाळांत जरी साडेनऊ झालें असले तरी हवाईच्या या 'ओहू' बेटावर सूर्यप्रकाश तळपत असून संध्यासमय होता.

'ओहू' बेट अवघे चाळीस मैल लांब व सव्वीस मैल रुंद आणि अडीच लक्ष वस्तीचे. होनोलोलू हे या बेटांच्या राजधानीचे शहर. येथे फुलांची इतकी विपुलता असून कागदी फुलांचेहि हार घालून स्वागत

करण्याची प्रथा आहे. प्रत्येक उतारूच्या गळयांत त्यांच्या आप्तस्वकीया-कडून हार पडले. माझे तेथे कोण असणार! पण एका हवाई गृहस्थानें मला एकाकी उतरताना पाहून, " आपण हिंदुस्थानातून आलांत का ? "



हवाईत एडवर्ड लिआन्स व त्यांच्या सहकाऱ्यासह गोपाळराव पाठक

असा प्रश्न केला व माझ्या गळयांत हार घालून, या स्वर्गतुल्य हवाईत आपले स्वागत असो " असे हंसून उद्गार काढले. नवख्या गृहस्थानें माझे असे स्वागत केलेले पाहून मला या हवाईयन लोकांच्या आनंदी व खेळकर वृत्तीचें साभीमान आश्चर्य वाटले. मी त्याच्याशी हस्तांदोलन करून त्याचे आभार मानले.

या शहराचे ' डाऊन टाऊन ' व ' वाइकीकी ' असे दोन विभाग आहेत. आमची 'लायमोसीन' वर्दळीच्या डाऊनटाऊन विभागांतून नऊ

मैल असलेल्या 'वाइकोकी' विभागांत आली. येथील इतर साऱ्या हॉटेल प्रमाणें 'वाय्'चेहि हॉटेल फारच सुरेख आहे. तेथे मला तावडतोब खोली मिळाली.

या बेटावर पाय ठवताच तेथील सुसह्य हवामान व नयन-मनोहर वनश्री पाहून मनाला सहज आल्हाद वाटू लागला. वाटले खूप दिवस रहावे या मौजेच्या स्थळी! स्त्रीपुरूषाचे पोशाख फुलपाखरासारखे झिरझिरीत कपड्याचे. स्त्रियः, बिनबाह्याचें अर्धी छाति उघडी असलेले जाकीट व खाली पोरीसो ीसारख्या चिट्ठ्यापट्ट्याचा गुढग्याच्या वरच झगा; पुरुषांचे अर्ध्या बाह्याचे चित्रविचित्र बुशशर्ट व विजारं. कचेरीत अगर कामावर सुद्धा हेच पोशाख सर्वमान्य झालेले. पण दुर्दैव माझे की, येथून जपानला जाणारे विमान आठवडयातून दोनच खेपा करीत असल्यामुळें तिसरेच दिवशीच्या विमानात मिळालेली जागा घेवून मला या रम्य नंदनवनाचा अल्प आस्वाद घेऊन निरोप घ्यावा लागला

शिकॅगो शहर आपुलकीने दाखविणाऱ्या वाल्टररॉयनें येथील पार्क विभागाचे सुपरीटेंडेट एडवर्ड लिआन्स यांना, मी येणार असल्याचे पत्र आगाऊच टाकून ठेविले होते· त्याना मी फोन केला तों, मी वायकीकी रोटरी क्लबांत दुपारच्या भोजनाला जाणार होतो तेथेच त्यांनी येण्याचें कबूल केले. येथें उच इमारती बोटावर मोजण्याइतक्याच दिसल्या. रोटरीची सभा तर सपूर्णपणे हवाई वातावरणात भरली होती. हे बांबू व चटयाचे मंडपवजा ठेंगणे पण प्रशस्त गृह होते. या सभेत मुबईचा एक वासी नांवाचा पारशी व्यापारी पण हजर होता. कागदी फुलाच्या माळा घालून आमचे स्वागत करण्यात आले. जुन्या मित्रासारखी साऱ्यांची सलगीची वागणूक पाहून तर आम्ही आपल्या घरापासून हजारो मैल दूर आहोत याचा मला क्षणभर विसरच पडला.

वासीची मी ओळख करून घेतलो व सभा संपताच एडवर्ड लिआन्सच्या गाडीत बसून आम्ही त्यांच्या कचेरीत आलो. त्याने प्रथम या निसर्गनिर्मित नंदनवनांत नित्य येणाऱ्या पाहुण्याना व स्थानिक नागरिकाना शरीर

स्वास्थ्य लाभून मानसिक शांतीचा आस्वाद घेता यावा म्हणून अमलांत असलेल्या अनेक योजना आम्हाला समजावून सांगितल्या. नंतर आम्ही त्याच्या मोटार मधून एकापेक्षा एक अशा सुंदर स्थळांचे निरीक्षण करण्यास निघालो.

या फेरफटक्यांत एकदा त्यानें आम्हाला 'पंच बाऊल' नांवाच्या तेथील पांचशे फूट उंच असलेल्या सुप्त ज्वालामुखीच्या मध्यावर नेवून उभे केले. येथून होनोलोलू शहराचे दूरवरचे सारेचे सारे दृश्य समोर उभे रहातें.

आणि हे बघा हे पलीकडे दिसते ते सुप्रसिद्ध 'पर्ल हार्बर', गेल्या महायुद्धात जपान्यांनी जो अचानक गुप्त हल्ला करून सगळ्या जगाला जोराचा हादरा दिला तेंच हे ठिकाण. त्या काळचे लिआन्सचें अनुभव ऐकून आमच्या अगावर शहारे आलें. आजहि हे ठिकाण अमेरिकेचें महत्वाचे सैनिकी केंद्र असून पेट्रोलचा साठाहि येथ फार मोठ्या प्रमाणांत केला असल्याचें लिआन्सनें सागितले. या ज्वालामुखीच्या शेंकडो एकर पसरलेल्या सुप्त मुखांत फुल झाडाची रेखीव लागवड केलेली दिसत होती. लिआन्सने या दृश्याकडे आमचें लक्ष मुद्दाम वेधून विचारले, "हे स्मशान आपल्याला कसे काय दिसते" ? मी आश्चर्यानें विचारले, 'स्मशान' !

लिआन्स सांगू लागला कीं पॅसिफिक महासागरांतील युद्धांत समर्पण झालेल्या साऱ्या अमेरिकन योद्ध्याचें देह येथें पुरलेले आहेत; आणि अशा ठिकाणी समाध्या अगर क्रास लावून या पवित्र ठिकाणाला किळसवाणे स्वरूप आणण्याच्या ऐवजी आम्ही अशा हिरवळीवर प्रत्येक देहागणीक एक एक सुंदर फुलझाड लावण्याची सुधारणा येथें अमलांत आणली आहे. आणि खरोखरच हे दृश्य फारच विलोभनीय दिसत होते. नाही तर खुद्द अमेरिकेत मी क्रॉसची जंगलेची जंगलें पाहिलेली आहेत. अमेरिकेच्या माझ्या साऱ्या प्रवासांत दोन तऱ्हेच्या स्मशानांची

(Graveyards) दृश्यें नित्याचीच झाली होती. एक युद्धांत कामी आलेल्यांच्या समाधीवरील क्रॉसचें जंगल व दुसरें निरुपयोगी झालेल्या मोटारींचे जागजागी पडलेलें प्रचंड खच!

त्यादिवशीचा लिआन्स बरोबरचा फेरफटका आटोपून मी व वासी समुद्राच्या किनाऱ्या किनाऱ्याने फिरावयास निघालो होतो. अजून सूर्य पुष्कळच वर होता. आणि हे काय! हे एक महाराष्ट्रीय कुटुंब दिसते आहे, स्वबांधवाचा परिवार! स्वाभाविकच आम्ही एकमेकाकडे आकर्षिलो गेलों, व परस्पर ओळख करून घेतली. हे होते मुंबईच्या वालचंद हिराचंद या सुप्रसिद्ध फर्मचे मालक शेठ गुलाबचंद आणि त्यांच्या सुविद्य पत्नी. डॉ. सप्तर्षी. त्यांच्याबरोबर त्याचा एक आठ वर्षाचा मुलगा व एक सहकारीहि होते. नंतर आम्ही सर्व मिळून हुमूहुम् बोटीची तिकिटे घेवून समुद्रतळाच्या सफरीला निघालो.

---

# हवाईतून वटुकेश्वराच्या राज्यांत

## (अष्टदश खंड)

आपला हा पृथ्वीगोल तीन हिस्से पाण्याने व्यापलेला असून उर-लेल्या एक चतुर्थांश भागावरील आपण स्थलचर या अथांग सागरसृष्टीच्या मानानें किती अल्प आहोत !

हवाई बेटांतील उथळ सागरसपाटीचे वैशिष्ठ्य म्हणून जी जल-चरांची नवीनच सृष्टी मला पाहावयास मिळाली ती कांहीं औरच होती. ज्या 'हुमूहुमृ' बोटीनें आम्ही सफरीला निघालो तिचे तळ कांचेचे होते. आम्ही सहा भारतीय एक अमेरिकन वृद्ध जोडपे व त्या बोटीचे चालक इतकीच मंडळी त्यांत होतो.

त्या छोटयाशा बोटीच्या मधोमध असलेल्या लंबचौकोनाकार भागाच्या तळाशी कांच बसविलेले असून त्याच्या भोंवती कठडा होता. आणि या कठडयाशीं भोवताल ठेविलेल्या बाकावर बसून पाताळाचे दृष्य पाहण्यास आम्ही सज्ज झालो.

बोट सुरू झाली तशी त्या कांचातून गढूळ पाण्याची खळबळ दिसू लागली. कांही वेळानें आमची ती 'हुमूहुमू' साधारण मैल दोन मैल आंत जाऊन स्थिर झाली.

आणि काय चमत्कार ! सारा समुद्रपट आमच्या दृष्टीसमोर प्रत्यक्ष नाचू लागला. माशांची ती स्वैरपणें विहार करीत असलेली निसर्गनिर्मित सृष्टी पाहून आम्ही मंत्रमुग्ध झालो.

समुद्रतळाची साधारणपणे आपली कल्पना अशी असते कीं, वाळूचा सपाट थर व त्यावरून संचार करणारे मासे आणि फारच झाले तर त्यात त्याच्या रंगीबेरंगी विविध जाती!

पण त्या नावाड्यानें, तब्बल एक तासभर, संथपणें, तेथील निरनिराळ्या भागात फिरवून जे या सागरसृष्टीचे अभिनव दर्शन आम्हाला घडविलें ते अलौकीकच नव्हे तर जलचरसृष्टीतील जीवनाचा एक विशेष आविष्कार होता.

हा बघा ! वीतवीत लांबीचा एक अगणीत सुवर्णकांतीयुक्त माशांचा थवा सुळसुळ करीत चालला आहे. एका खोल कपारीतून निघून दुसऱ्या कपारीत गडप झाला. आंत रंगीबेरंगी छटा असलेल्या खोलचखोल दऱ्या, त्याच्या आजुबाजूला उचसखल कडे व त्यावर कलापूर्ण मांडणी केलेल्या फुलगोबीसारख्या चित्रविचित्र वनस्पती ! याला इंग्रजीमध्ये कोरल गार्डन (CORAL GARDEN) म्हणतात.

या रंगीबेरंगी कड्यामधून आम्ही अनेक लहानमोठी विवरें पहात होतो. ही यांची वसतीगृहे असावीत. माशांचे आकार आणि रंग तरी किति विविध!

ही या उथळ सागराची लहानशी सृष्टी! आणि मग अथाग सागराच्या पोटी वास करणाऱ्या प्रचंड माशाची विवरवजा घरेंदारे ती कशी आणि केवढी असतील ?

परवां कलकत्त्याच्या एका प्रदर्शनांत एक पंचेवीस फूट लांबीचा मासा मी पाहिला. त्याचे नांव 'करवत मासा'. त्याचा जबडा पांच हात निमुळता पुढे निघून त्याला दोन्ही बाजूने करवतीसारखे तीक्ष्ण दांते होते.

मागे मी नार्वेमधे असतांना 'कॉड' मासे पकडून त्यांचे तेल व चरबी काढण्याचे जहाज पाहिले होते. हे जहाज म्हणजे कॉडलिव्हर आईलचा एक तरंगता कारखानाच म्हणाना ! या प्रचंड जहाजाच्या तळाशी असलेल्या यंत्राच्या सहाय्याने दोनतीनशे फुट लांबीचे ते त्या 'कॉड' माशाचे

अगडबंब धूड गळाला फसवावयाचे व पाण्यातच त्याचें तुकडे तुकडे करून ते तुकडे वर बोटीत ओढायचे. कारण सबध मासा वर ओढणे अगर त्याला किनाऱ्यावर आणणे अशक्यच. त्या तुकड्यांतून आवश्यक असलेला खाद्यपेय व औषधीला असलेला उपयुक्त भाग तेवढा काढून बोटीवरच टीन व बाटल्या भरायच्या.

अशी ही कारखानेवजा औद्योगिक बोट महिना महिना खोल समुद्रांत संचार करून किनाऱ्यावर मुद्देमालासह परत फिरायची.

मध्यपूर्वेतील सफरीत पर्शीयन आखातांतून आम्ही चाललो होतो. पूर्ण वेगाने चाललेल्या त्या बोटीचे पंखे सागराचे अतरग कांपीत मार्ग काढीत होते. एक, तीन ते पाच फुट लांबीच्या असंख्य माशांचा थवा आडवा आला. आणि त्या भयभीत माशाचे ते पळापळीचें चित्तवेधक दृष्य ! कांहीं अभागी सोडून सारे प्रवाशी डेकच्या कठड्याशी उभे राहून अनिमिष नयनानें ते पाहण्याला धावले.

त्या जलचरांची स्वैरसंचाराची समाधी भग पावल्यामुळे संतापानें त्या अशा काही उसळ्या मारून वर येत व निमिषार्धात अशा काही उलट्या सुलट्या उड्या घे न अंतर्धान पावत की आम्हा बघ्यांची तब्येत केवळ खूष !

पहाणारांचें चित्त थरारून सोडणारी त्या जलचरांची ती एक सामुदायीक कवायतच म्हणाना !

अशा या जलचर सृष्टीत प्रत्यक्ष शिरून त्याचें हृद्य जीवन आम्ही पहात होतो. तो नावाडी त्या जीवसृष्टीच्या अनेक गमती सांगून जणू दुधात साखर ओतीत होता.

तो सागत होता की, आमच्या या हवाई बेटात भाल्याच्या टोकानें मासे पकडण्याचा (SPEARING THE FISH) एक नेम बाजीचा मोठा गमतीचा खेळ आम्ही खेळत असतो. हातात तीक्ष्ण पात्याचा लांब भाला घेवून पोहत पोहत जायचे व मांश्यांचा थवा दिसताच डुबकी मारून त्या चंचल प्राण्यांची शिकार साधण्याकरीता उघड्या डोळ्यांनी नेम साधायचा आणि प्रयासानें कधी एखादा मासा गवसला तर नशीब.

असो. दुसरे दिवशी एडवर्ड लिआन्सने आपल्या हाताखालील एका अधिकाऱ्याला आमच्या दिमतीस देवून साऱ्या बोटाचा फेरफटका करविला. त्या दिवशी सकाळी ९॥ ला आम्ही निघालो तों सायंकाळी ५ पर्यंत, कांही नाहीं तरी शंभर मैलांचा प्रवास करून नयनमनोहर निसर्गानें नटलेली वनश्री पहात पहात, मधोमध असलेल्या त्या बेटावरील उत्तूग पहाडाला पूर्ण वळसा देवून निरनिराळी किती दृष्यें पाहिली यांचा नेमच नाही. आणि आता, हे बघा, आम्ही या लागवडीच्या विभागातून चाललो आहोत. शेकडो एकर अफाट पसरलेंलें हे उसाचे मळे–मळे कसचे आणि शेतेहि नव्हत, ती जगलेच! पण किती रेखीव. आणि. हा बघा साखरेचा कारखाना. ही यंत्रे बघा उसाचे मुळासकट उच्चाटन करून सरळ कारखान्यांत आणून ओततात आणि शेवटी साखरेच्या गोण्याच तेथून भरून भरून बाहेर पडतात. आणि ही बघा अननसाची लागवड. त्यांची लावण, किडनिवारक औषधाचे फवारे उडविणे व त्याचे कोवळे कोंब पुन्हा लागवणीसाठी वेंचणें, सारीं कामें ट्रॅक्टरच्या साहाय्यानें होत आहेत. आणि हा बघा अननसाचे डबे भरण्याचा कारखाना!

हजारों एकराची यांत्रिक लागवड व त्यातून तयार माल करण्याचा कारखानाहि तेथेंच. हें या हवाईचें वैशिष्ठ्य आणि याचा अभ्यास करण्याकरितांच वालचंद हिराचंद या सुप्रसिद्ध कंपनीचे मालक श्री. गुलाबचंद या ठिकाणी संचार करीत होते.

हवाई बेटें हा अमेरिकेचाच एक विभाग असला तरी साऱ्या संयुक्त संस्थानात हेच एक असें संस्थान आहे कीं, जेथें राजा असून त्याचे नामधारी तक्त अजून कायम आहे. अमेरिकेचा अध्यक्ष त्याची गव्हर्नर म्हणून नेमणूक करतो व तो तीस प्रतिनिधी मंडळाच्या सहाय्यानें येथील राज्यकारभार हांकतो. तसेंच मताधिकार नसलेला एक नामधारी प्रतीनिधीहि अमेरिकन कांग्रेसचा सभासद असतो.

मुळचे हवाईयन, जपानी व थोडेसें युरोपीयन अशा त्रिविध जमातीची ही पांच लाखांची वस्ती असून सुखलोलुप पाहुण्यांची येथें सदैव गर्दी असते.



वालचंद हिराचंद या सुप्रसिद्ध कंपनीचे मालक गुलाबचंद, त्यांच्या सुविद्य पत्नी, डॉ. सप्तर्षी व गोपाळराव पाठक समुद्रतळाच्या सफरीत.

---

न्यूयॉर्कच्या धनपतींनीं येथील कंपन्यांत आपलें भांडवल गुंतविण्याची पराकाष्ठा करून पाहिली पण या बाबतींत स्थानिक रहिवाशांची जागरुकता वाखाणण्यासारखी आहे. संयुक्त संस्थानाच्या राज्यकारभारांत बरोबरीचे स्थान प्राप्त झाल्याशिवाय असले छक्केपंजे आम्ही चालू देणार नाही असा त्यांचा निर्धार दिसला.

असो. असा हा औट घटकेचा स्वर्गसंचार आटोपता घेऊन मी संध्याकाळच्या विमानानें या हवाई बेटाचा निरोप घेतला.

होनोलोलू विमानतळाहून आम्ही सायंकाळीं ७॥ ला निघालो. आज गुरुवार ता. २७ मे होती. टोकिओपर्यंतचा हा सव्वाचार हजार मैलाचा प्रवास संपविण्याला आम्हाला एकूण १७॥ तास लागणार होते. पण आम्ही टोकियोला पोचलो तो सारे सकाळचे आठच वाजले होते. आणि दिवस मात्र शनिवार ता. २९ ! शुक्रवार फराळांत गेला. हवाई व वेक आयलंड यांच्या मधोमध एक आतरराष्ट्रीय तिथीरेषा शास्त्रज्ञांनी कल्पिली असून ती दक्षिणोत्तर ध्रुवांना १८० डिग्रीशी समांतर अशी मिळते.

या रेषेच्या पश्चिमेला जाताना एक दिवस कमी करावा लागतो तर उलट दिशेनें सीमोल्लंघन करीत असतांना आठ दिवसांचा आठवडा कल्पून दोन शनिवार, दोन शुक्रवार असा एक अधिक न कर्त्यांचा वार फुकट पदरांत पडतो.

साडे नऊ तासाच्या सतत उड्डाणानंतर वेक बेटावर आमचा एका तासाचा मुक्काम झाला. हे सारे दोन चौरस मैलाचे सपाट बेट, पॅन अमेरीकन, स्टँडर्ड आईल कं. व अमेरीकेचे सरकारी कर्मचारी यांनीं व्यापलेलें असून तेथील संपूर्ण लोकसंख्या फक्त सातशेचीच आहे.

प्रभातकाली आमचे विमान पॅसिफिक महासागराच्या उत्तर विभागांतून संचार करीत होते. पूर्वेकडील क्षितीज ढगांनी व्याप्त होते. आणि आता हे बघा या धुसर रंगातून गुलाबी छटा फांकू लागली. रविबिंबाचा येथील हा उदय फारच गमतीदार होता.

ढगांच्या विच्छेद करीत वर डोकावणारी ती सूर्यनारायणाची मर्ती चंद्रासारखी शीतल व शांत दिसत होती. घननील सागराच्या छटेंत रत्रीच्या रातरगाची छाया मिसळून त्या विखुरलेल्या वलयातून अशी एक जांभळी झाक चिलसू लागली की, क्षणभर माझ्या मनांत हा सूर्य कीं, चंद्र अशी भ्रांती निर्माण झाली. त्यांतून हे उदयकालीन सूर्यबिंब, त्यावरून सरपटणाऱ्या धूसर वलयामुळें, किंचित लांबोडे भासत होते.

पांचसात मिनिटे तरी आजचे हे दृष्य पहाण्यांत मी व्यग्र झालो होतो. नित्याचा नवनवा सूर्योदय पहाणारा मी पण आजचो ही अभिनव घटना दाखविणारी दृष्टीच वेगळी असली पाहिजे. दिव्य दृष्टी ती हीच असेल कां?

आम्ही जसजसे जपानच्या किनाऱ्याजवळ येऊ लागलो तसतसा हवेत गारवा वाढू लागला. आणि हा बघा हा टोकियोपासून अवघ्या पंचाहात्तर मैलावर असलेला सुप्रसिद्ध ज्वालामुखी 'फुजी', त्यावर आच्छादिलेल्या बर्फामुळें चमचम चमकत आहे.



# हा आपला आशिया !

## ( अष्टदश खंड )

### आशियाई झळक

ऊंचसखल टेकड्या व त्यावर भरगच्च भाताची शेती. आमचे विमान टोकिओच्या विमान तळावर उतरत होते. जमीनीला पाय लागताच मिचिमिची डोळ्याचे ते बुटके जपानी सभोवार दिसू लागले.

या खेपेला आमच्या बहुतेक सहप्रवासिनी अमेरिकन गृहीणी आणि त्यांची छोटी छोटी बालके. या बालकांकरितां विमानांत पळण्यां चीहि व्यवस्था करण्यांत आली होती. त्यांतून हे विमान दुमजली असून तळमजल्यावर गोलाकार 'लाऊंज' असे. त्या लाऊंजमध्ये आम्ही गप्पा ठोकीत असताना या ललना अमेरिकन सैन्यातील आपल्या पति-देवांना भेटायला निघाल्या असल्याचे कळले.

'आवजाव घर तुम्हारा' असाच कांहीसा प्रकार येथें मला दिसला. कस्टम् व इतर भानगडी नावापुरत्याच भासल्या. मी एक स्वतंत्र टॅक्सी करून शहरांत येण्यास निघालो.

नव्या दिल्लींतून जुन्या दिल्लींत शिरताना जसें वैचित्र भासते तसे, डोळे दिपविणारे अमेरिकेचे वैभव पाहुन आलेला मी, येथें पाऊल टाकताच स्वर्लोकांतून परत पृथ्वीवर ढकलल्याची जाणीव मला पदोपदी होऊ लागली. एकूण काय, 'हा आपला आशीया '!

माझ्या त्या टॅक्सीचा खटारेवजा अवतार गलीच्छ रस्त्यांतून संचार करूं लागला. आणि दुतर्फा भिकार लाकडी घरें!

•

पॅरीसच्या खालोखाल जगातील चवथ्या नंबरचें हे टोकियो शहर. साठ लाखाच्यावर वस्ती. 'काडा' विभागांतील वाय. एम. सी. एत मी एक खोली मिळविली. पाचमजली हवेली ही! चढउतार करण्याकरिता 'लिफ्ट' चीहि योजना येथें होती. पण आशीयाई झळक मात्र सर्वत्र पसरलेली दिसत होती.

येथें संचार करतांना आता भाषेचिहि अडचण जाणवू लागली. माझ्या सुदैवानें एक चॅटर्जी नांवाचें कलकत्याचे चहाचे व्यापारी गेलें दोन महिने येथेच मुक्कामाला होते त्यांची गांठ पडली. आम्हा भारतीयांना उभयपक्षी 'भरतभेटीचा' आनंद अनुभवास आला.

रात्रीच्या झोपेची भरपाई करण्याकरिता प्रथम मी चाटर्जींबरोबर न्याहारी केली व चार वाजेपर्यंत खमंग झोप काढली नंतर उठून पहातो तों चॅटर्जी आपल्या उद्योगाला निघून गेले होते. तेव्हां मी एकटाच फेरफटका करण्यास बाहेर पडलो.

जिकडे वाट फुटेल तिकडे स्वैरविहार करता करतां तेथील राजवाड्याचा तट दृष्टीस पडला. या तटाभोवताल दुहेरी खदक होते. त्यावर जागजागीं पूल बांधलेलें असून त्यावर सैनिकी पहारे होते. जपानी पद्धतीच्या एकदोन छपराशिवाय राजवाड्याचा भाग बाहेरून काहींच दिसत नव्हता.

या राजप्रसादांत एका विवक्षित स्थळापर्यंत वर्षातून फक्त दोन प्रसंगीच नागरिकांना प्रवेश असतो. नववर्षारंभ व राजाचा जन्मदिन. या दोन दिवशी राजदर्शनाकरिता नागरिकांची तोबा गर्दी उडते.

खंदकाच्या उत्तम बांधणीमुळे त्याला तलावाचें स्वरूप आले असून आत सोडलेल्या हंसांचा विहार पहात कित्येक लोक आपली करमणूक करून

घेत होते. खंदकाच्या आंतील बाजूस रेखीव उपवनें व बाहेरून प्रशस्त राजमार्ग. या राजमार्गाच्या दुतर्फा आधुनिक पद्धतीच्या पाचसात मजली हवेल्या असून त्यात सरकारी व व्यापारी कंपन्यांची दप्तरे दिसत होती.

राजद्वाराच्या विरुद्ध दिशेनें टोकीओचे मध्यवर्ती रेल्वे स्टेशन असून एकंदरीत हा साराच भाग भव्य, रेखीव व सुदर असून विशेष वर्दळीचा होता.

गेल्या महायुद्धांत झालेल्या असंख्य बॉबहल्याने टोकिओ शहर छिन्न-विछिन्न झालेले होते. पण गेल्या अवघ्या पांचसहा वर्षात उद्योगप्रिय जपान्यांनी मुख्य मुख्य भागाची पाश्चिमात्य पद्धतीने आखणी करून सारें स्वरूप बदलून टाकलेले प्रत्ययास येते. अविरत बाब हल्याच्या कटू अनुभवाने जणू त्याचें धरणीकपाचें संतत भय नाहीसे होऊन तेथे आतां पाच ते पचवीस मजल्याच्या काही गगनचुबी इमारतीहि डोके वर काढताना दिसत आहेत.

नित्याप्रमाणें पायदुखेपर्यंत भटकंती करून एका हॉटेलात 'राईस-करीचे 'स्वादिष्ट जेवण केले व आपल्या निवासस्थानी रात्री दहाला परतलो.

आज या बटुकेश्वराच्या राज्यांतील माझा दुसरा दिवस. रविवार होता तो. व्यायाम व क्रीडा विभागाची चौकशी करणे हा माझा मुख्य उद्देश. पण आज सुटीमुळें साऱ्या कचेऱ्या बंद, तेव्हां चाटर्जीच्या सोबतींत आम्ही 'निको' नावाच्या एका प्रेक्षणीय स्थळाला भेट देण्याचें ठरविले.

जपानमध्यें "निको ला भेट द्या व मगच भव्यतेची कल्पना करा" अशी एक प्रचलित म्हण आहे. तेव्हां निसर्गाची भव्यता आणि मानवी कौशल्य यांची सुन्दर सांगड असलेलें 'निको' आम्ही पहाण्यांस निघालो.

टोकीओ पासून एक्याण्णव मैल उत्तरेकडे असलेलें हे रमणीय स्थळ गाठण्यास प्रथम आम्हांला तीन तास रेल्वेचा प्रवास करावा लागला. आम्ही सकाळी ७॥ लाच युनो स्टेशन गाठले. सुट्टीच्या 'पिकनिक' पार्टीला निघालेल्या तरूण तरुणींनी गाडी खचाखच भरलेली होती.

थेट युरोपियन गौरवर्णीय, पण चापट चेहेरे व गजाननासारखे अर्धवट मिटलेले नाजूक नेत्र, अशा ठेंगण्या टुसक्या युवती, गुबगुबीत गालावरील गुलाबी छटेमुळे वैशिष्टय पूर्ण भासत होत्या. आपसांत हासत खिदळत प्रवास करणाऱ्या त्या स्थानिक नागरिकांची भाषा सुरेल संगीतासारखी कानाला गोड वाटत होती. 'हाजिमेटें ओमे नी काकारू मासू'–आपली भेट झाली आनंद झाला., किंवा 'आटोगा गोझाइ मासू' म्हणजे धन्य–वाद, ही ती भाषा.

आसमंतात शेतकरी बायका मुलासह राबतांना दिसत होते. कोठें गव्हाचें सौगण तर कोठे धनाची लागवण चालू होती. एकेकच घोडा, अगर बैल नांगराला जूपलेले दिसत होते. पोटापाण्यांची विपुलता दिसत होती. मधून मधून लागणाऱ्या खेड्यातील ती भिकार घरे पण सादीकोपऱ्याच्या इंच इंच जागेत भाजी पाल्याची लागवड सर्रास नजरेत भरून त्यांच्या उद्योगप्रियतेची साक्ष देत होती.

हे बघा, निको स्टेशन, सारी गाडी रिकामी झाली व बाहेर उभ्या असलेल्या ट्राम व बसेस भरू भरू जाऊ लागल्या. येथून पुढें कुठे जायचे व काय पहायचें आम्हाला काहीच ठाऊक नव्हते.

आजूबाजूला यात्रे सारखी दुकाने थाटलेली होती. शेवटी आम्ही एक स्वच्छसे हॉटेल पाहून आंत शिरलो. हसतमुख मुली समोर आल्या पण आमची भाषा न कळल्यामुळे त्यांना गम्मत वाटू लागली. शेवटी खाणा खुणानी आम्ही ब्रेड, अंडी, चहा वगैरे मागवून न्याहारी नरउरकून घेतली.

बसेसची जा ये सुरूच होती. आह्मीहि एका बसमध्ये जाऊन बसलो. वनश्रीने नटलेल्या पहाडी रस्त्याने सात आठ मैल प्रवास करून आतां हे बघा एक स्टेशन आले. ही त्या पहाडातील एका उच्च श्रृगा-वर नेवून सोडणारी 'रोपरेल्वे' होती. सर्वांच्या बरोबर तिकिटे काढून आम्ही त्या उभाट डब्यांत गॅलरीसारख्या वरखाली असलेल्या बाकावर जाऊन बसलो. विजेच्या सहाय्याने सरळ पहाड चढणारी ही गाडी. वरचा डबा खाली सुटला व आमचा डबा वरवर जाऊ लागला. वाटेत दोन बोगदेहि लागले.

मागे मी नेपल्समध्ये असताना सुप्रसिद्ध 'व्हेसुविअस' ज्वालामूखी पहाण्यास अशाच तऱ्हेच्या 'रोपरेल्वेने'वर चढलो होतो. पण आजचे हे ठिकाण विशेष उंच अशा गिरीकंदरांत असल्यामुळें अचाट वनश्रीच्या सौंदर्याने नटलेले दिसत होते.

या शिखरावर पोचताच तेथून दुसऱ्या एका आणखी उंच अशा शिखरावर लोबकळत जा ये करणारी दुसरी एक रोपरेल्वे होती. या अतराळी संचार करणाऱ्या लटकत्या डब्यांत फक्त सात आठ माणसे नेण्याची सोय होती.

या धाडसी प्रयोगाची प्रथम कोणालाहि झाली तरी भीतीच वाटणार! पण हे येवढे लोक जातयेत आहेत ना? मग घ्या देवाचे नांव आणि चला त्यांच्या पाठोपाठ.

आमची पाळी आली तशी आम्हीं त्यांत जाऊन बसलो आणि चालल्लो अंतराळी लटकत! खाली पहाण्याची सोयच नव्हती. किती खोल दरी! बिचाऱ्या चॅटर्जी बाबूनें तर डोळेच मिटून घेतले. कसल्याहि आधाराशिवाय सप्तसागरावरून तासन्तास उड्डाण करून आलेला मी, मौज वाटत होती मला या अभिनव प्रकाराची.

हे प्रसिद्ध 'टॅंबोडाई' शिखर. या दहा हजार फुटावरून आसमंतात अफाट पसरलेले निसर्गाचे साम्राज्य आमच्या समोर उभे राहिले. ज्वालामुखीचा देश ना हा? आकारमानांत आकृतीची विविधता! कांही कांहीं मुखांतून धुराची वलये दिसत होती, तर गर्द निळ्या रंगाची मधून मधून झालेली तलावाची पाखरण पांचूच्या खड्यासारखी चमकत होती. हा बघा, मधूनच धो धो वहाणारा धबधबा दिसतो आहे. सखल भागांत जुनी मंदीरे, लहान लहान खेडी आणि काही कारखानेहि दिसत आहेत. हिरव्यागार गालीच्यावर जणू कलावत्तूने विणलेले हे कलाकुसरीचे बेफाम चित्रच! कोण असावा बरें हा येवढा कुशल कारागिर! अरे पण ही तर स्वय-भू! हेच तर ते त्या जगन्नियंत्या परमेश्वराचे चित् स्वरूप नसेल ना!

न्यूयार्कमधील एम्पायर स्टेट बिल्डिंगवरून नुकतेच पाहिलेले मानवी कर्तृत्वाचे चित्र तुलनेकरीता मी आपल्या अंत:चक्षूसमोर उभे केलें. हे आम्ही मानवांनी उभारलेले चवदाशे फुटाचें डौलदार शिखर! येथून आसमंतात नजरेत भरणारी ही गगनचुंबी इमारतींची सृष्टी आम्हींच निर्माण केलेली. ती पहात असतांना आमची मान अभिमानानें ऊंचावून ताठ होते. आणि येथें या निसर्गाच्या अनुपम साम्राज्यांत! तीच मानवीमान पुढें ठाकलेल्या अभिनव दृष्यानें नतमस्तक होऊन आपल्या वृथाभिमानाला तिलांजली देत आपली क्षुद्रता चटकन कबूल करून टाकते.

त्या दिव्य दृष्यावरून आमची नजर कशी म्हणून वळेना. पण परत फिरल्याशिवाय गत्यंतर नसल्यामुळे आम्ही खालच्या शिखरावर परतलो व तेथून बसेसनें सहा मैलावर असलेल्या 'चूझेंजी' तलावावर उतरलो. मधोमध चोहोबाजूंनी सुंदर टेकडयांनीं व्यापलेला हा अफाट तलाव. एका बाजूला लहानसें खेडे व एक 'शिंटो' धर्माचें पुरातन मंदीर. हे सारें पाहून आम्ही दुपारीं तीनच्या सुमाराला निको गांवांत परतलो.

आता आम्हाला कळले की या गावालगतच अप्रतीम अशा कारागिरीची अफाट मंदीरे आहेत. चला जाऊ या, या यात्रेकरूच्या मागे. म्हणजे या जपानी मंदीरांचा थाट व घाट कसा असतो ते आपोआपच कळून येईल.



# जपानचें नाक — ' निको '

## ( नवदशखंड )

जपानची अत्युच्च कला व परंपरागत संस्कृति यांची सांगड अभिनव निसर्गसुन्दरीशी घालून जो त्रिवेणीसंगम घडवून आणीला आहे, तेंच हें ठिकाण ' निको '.

निको गांवालगत उंचच उंच ' सिडर ' वृक्षांचें जे जंगल दिसतें ती एक रेखीव बाग असून त्या नयनमनोहर वातावरणांतच बुद्धांचीं कित्येक मंदीरें व टोकुगावा या जपानी पेशवाईतील आद्यपुरुषांचे समाधि-स्थान मोठ्या कौशल्याने उभारलेली आहेत

त्या चढावाच्या रस्त्याने लोकांच्या झुंडीच्या झुन्डी जात येत होत्या. आम्हीहि त्यांच्या पाठोपाठ निघालों. समोरच एक भव्य आडवा वाड्यासारखा हॉल लागला. त्याच्या त्या अनेक पायऱ्या चढून आत शिरलों तों एका ओळींत सोनेरी वर्खानें मढविलेल्या तीन बुद्धाच्या सूवर्ण मूर्ती, झळकू लागल्या.

या त्रयमूर्तीला तेथें ' सांबुटसोडा ' असें संबोधितात. प्रत्येक मूर्ति उमललेल्या सुवर्णांकीत कमळावर ध्यानस्थ बसलेली असून तें कमळ शटकोनी बैठकीवर स्थीत होते. त्या प्रत्येक मूर्तीची उची सत्तावीस सत्तावीस फूट आहे. मध्यवर्ती मर्ति बोधीसत्वाची द्योतक असून उजवी-कडील मूर्ति, हें हजार हाताचें दैवत, दयेचें द्योतक आहे. तर डावीकडील अश्वमूखी मूर्ति पशुसंरक्षक गणल्या जाते.



बाजूला त्यांचें एक कार्यालय होते. त्यांत गुळगुळीत डोक्याच्या पांच सांत भिक्षु–भिक्षुणी गुडघे मोडून बसल्या होत्या. त्यांनी परिधान केलेले ' किमानो ' पांढऱ्या स्वच्छ वस्त्राचे होते. आम्ही कुतूहलाने सहज आत डोकावलें तों त्यांनी हसून आमचें स्वागत केलें तेवढ्यावर आम्हीहि आंत शिरलों व त्यानी दिलेल्या चटयावर त्यांच्याप्रमाणें गढघे मोडून बसलो. भाषेच्या अभावी इंडिया, इंडीया असे कांहीतरी बोलून त्यांनी ते घेत असलेला हिरवाकंच चहा कटोऱ्यांतून आमच्या पुढे ठेविला आम्ही त्या वैशिटष्यपूर्ण चहाची लज्जत घेत घेत ती अल्पशी मूक ओळख आटोपती घेतली.

चौकशीअती जपानमधील ' चा–नो–यू ' किंवा टी सेरीमनी ही एक सांस्कृतिक सभ्यतेची परंपरा आहे असे कळले. जीवनकलेचा धर्म म्हणून हे समारंभ प्रतिष्ठित समाजात नित्य घडून येत असत. हें अमृततुल्य पेय पावित्र्याच्या भावनेनें भारलेलें असून जपानांत अशा समारंभांना एक कलात्मक स्वरूप प्राप्त झालेलें आहे.

नंतर आम्ही 'शोनुगाटे' वंशावळ स्थापन करणारा 'टोकुगावा आटोयासू' या थोर ऐतिहासिक पुरूषाची समाधीमंदिरे पाहाण्यास पुढें गेलो. या मंदिराचे अनेक विभाग असून त्यानी कित्येक एकर जागा व्यापलेली आहे. जपानी कलाकौशल्याचे एकापेक्षाएक सरस असे अप्रतीम नमूने येथे भरपूर पहावयास मिळतात.

नुसते प्रवेशद्वार निरखून पाहूं म्हटले तरी तासचे तास निघून जातील. तेथील खांब, भिंती, छत, छपरे, सारे, सारे कांही लाकडावर नखशिखांत कोरलेल्या नक्षीचे असून भडक रगाला येथें विशेष प्राधान्य आहे. काळयाभोर शिसवी रगापासून, लाल, हिरव्या, सोनेरी इत्यादी रंगाची संगती ठसठशीत व आकर्षक दिसते. तेथील कोरलेल्या मूर्तींत व चितारलेल्या चित्रात अक्राळविक्काळ व भयानकपणा जरी असला तरी रेखीवपणा हा एक त्या कलेचा विशेष गुण सागता येईल.

वेंड्यावाकड्या अवयवांचे राक्षस व अजगर–सुसरी (ड्रेगन) यांना तर तेथें कांही तोटाच नाही. याशिवाय डोळे मिटून झोपलेली मांजर व महात्मा गांधीच्या संग्रहात प्रसिद्धीस आलेले तीन वानर यांच्याहि कोरीव मूर्ती विवीक्षित ठिकाणीं बसविलेल्या आहेत.' वाईट बघू–बोलू–ऐकू नये' याचे हे निदर्शक, तीन वानरांचे प्रतीक, प्रथम येथूनच प्रचारात आले असें म्हणतात.

नतर आम्ही एकशेसहा फूट उंचीचा पंचमजली रंगदार पॅगोडा, सोरींटो शांतीस्तंभ वगैरे अनेक प्रेक्षणीय व ऐतिहासिक भाग पहात हिंडत होतो. पण डोळयाच्या अशा या अवीट गोडीने भरलेल्या तृप्तीकरिता साऱ्या सकाळपासून सारखे रखडत असलेल्या आमच्या पदयुगलांनी सोशिकता तरी किती दाखवायची ? त्यातून आमच्या गाडीचीहि वेळ झालीच होती. तेव्हां त्या वैचित्र्यपूर्ण सृष्टीतून आम्ही काढता पाय घेतला व स्टेशन गांठले. त्या रात्री आम्ही निवासस्थानी पोचलों तों अकरा वाजले होते.

आपल्या नागपूरचें एक अभ्यंकर नांवाचे गृहस्थ येथील भारतीय वकीलातींत असल्याचें कळले. तेव्हा आज मी प्रथम त्याच्या कचेरीत आलो. अभ्यंकरानी

मला चटकन ओळखले. नंतर त्यांनी तेथील एकदोन खाते प्रमुखांची भेट करून दिली. जपानच्या अंतर्राष्ट्रीय खात्यांत मला जावयाचे असल्यामुळें त्या वकीलातीतून एक इंग्रजी बोलणारा जपानी कर्मचारी मी मुद्दाम मागून घेतला. त्याच्या सहाय्याने माझी पुढची कामे बरीच सुकर झाली.

अंतर्राष्ट्रीय खात्यांतून शिक्षण खात्यांत व शिक्षण खात्यातून शारीरिक शिक्षण खात्यात असे हिंडता हिंडता बऱ्याच जणांच्या ओळखी झाल्या. मागे इस्तंबूलच्या कांग्रेसमध्ये भेटलेले डॉ. अझूमा याचाहि पत्ता लागून त्यांच्याशी फोनवरून दुसरे दिवशी भेटण्याचे ठरले. हे डॉ. अझूमा तेथील स्पोर्टस् फेडरेशनचे प्रमुख असून त्याच्या सहाय्यानें जपानमधील एकंदर शा. शिक्षणाच्या कार्याची बरीच माहिती झाली. अंतरराष्ट्रीय खात्यातील श्री जिटारो काटुका या गृहस्थानें अनेक ठिकाणी फोन करून निरनिराळ्या क्षेत्रांतील अनेक व्यक्तींशी माझ्या भेटी ठरविल्या.

आमच्या नुकत्याच झालेल्या अमेरिकन कांग्रेसमध्ये कोरियातर्फे आलेले प्रतिनिधी थिसीकीम हेहि याच सुमारास येथे येऊन आमच्या 'वाय्' मध्येंच उतरल्यामुळें तेहि भेटले. त्याचे शिक्षण टोकीओतच झाले असल्यामुळे त्याच्या सहकार्यानें मला तेथील विविध क्षेत्रांतील समाज–दर्शन घडण्यास अतिशय मदत झाली

आज आता आम्ही जपानी 'डायेट' पहाण्यास निघालो होतो. गेल्या महायुद्धानंतर जपानला जे लोकशाहीचें स्वातंत्र्य मिळाले आहे त्याचे हे पार्लमेंट. आजची बैठक अटीतटीची होती. आम्ही परवानगी काढून आंत शिरकांव केला खरा पण सभास्थानी आम्हाला जाता आले नाही. जिकडे तिकडे कडक सैनिकी पहारा दिसत असून कांहितरी विशेष भानगड असल्याचा आम्हाला प्रत्यय आला. शेवटी राजाची बसण्याची खोली वगैरे सारख्या इतर गोष्टी पाहून आम्ही बाहेर पडलों. सायकाळच्या वर्तमानपत्रांत भडक बातम्या होत्या की योशीडा पंतप्रधानाच्या अमेरिकेच्या संचार–खर्चाच्या बिलांवर त्या दिवशीच्या डायेटमध्यें बरीच खडाजंगी होऊन मारामारीपर्यंत घोर प्रसंग निर्माण झाला व पोलीसच्या

मध्यस्थोने शांतता प्रस्थापित करावी लागली. आणि काय आश्चर्य हे सर्व आत चालू असता आम्हीं तेथेंच आसपास घुटमळत होतो.

या प्रसंगानें जपानच्या राजकीय परिस्थितीसंबंधानें कित्येकांशीं चर्चा करण्याची संधी मला मिळाली. आज दुर्दैवानें जपान अमेरिकन वर्चस्वाखाली सापडलें असले तरी ही परिस्थिती जपानी जनतेला असह्य वाटत आहे. पंतप्रधान योशोडा अमेरीकनधार्जीणा असल्यामुळें त्याला डायटमध्ये कडकडून विरोध झाला, या घटनेवर जपानी जनता खुष दिसत होती.

जपानीं जनतेचें आपल्या देशावर अपरंपार प्रेम आहे आणि या त्यांच्या निरतीशय देशप्रेमाच्या पोटीच त्याच्या सर्वांगीण उन्नतीची बीजे लपलेलीं आहेत.

जिटारो काटूका यांनीं आज मला एका खेड्यावर नेले होतें. हे खेडे टोकिओपासून पन्नास एक मैल असावे. त्या खेड्याचा अवतार थेट आपल्या भारतांतील खेड्यासारखा होता. गल्लीबोळांतून आम्ही जाऊ लागलों तों एक छोटेसे छप्परवजा देऊळ लागलें. त्यावर एक फाटके निशाण फडकत होते. भोवतालचा चबुतरा मोडकळींस आला असून बाजूला कचऱ्याचे ढीग पडलेले होते. मुलामुलामध्ये मारामारी चालली होती. जिटारोने त्या मुलांना थोडे दाटफटकार करून तो प्रकार थांबविला. तेथून आम्ही एक टॅक्सी करून ५–७ मैल असलेल्या एका शेतीवर आलो. हे लहान लहान शेतीचे तुकडे दोन, ते, पाच एकर येवढेच! अंधार पडेपर्यंत नवराबायको हाताने भाताची लावण करीत होती. त्यांच्याजवळ एक गाय होती व दुधापेक्षा शेतीच्याच कामांत ते तिचा उपयोग करीत होते.

'खपेल त्याची शेती' हे विनोबाचें स्वप्न येथें साकार झाल्यासारखें दिसत होते स्वकष्टार्जित तुकड्या तुकड्यांची शेती हे जपानचे वैशिष्ट्य जरी असलें तरी वैभव मानता येईल किंवा नाही हे सांगणें कठीण आहे. कुणीकडे अमेरिकेचे ते यांत्रिक शेतीचे अमाप उत्पादन आणि कुणीकडे ही जपानी जीवनाची जगण्यांची अविश्रांत धडपड !



कुठ तो आधुनिक अमेरिकन शेतकरी!

साधनांच्या अपुऱ्या भांडवलावर व जगण्याकरिता अविश्रांत श्रम नशिबी लिहिलेले असतांना, जेव्हां त्यांची क्रीडाक्षेत्रांतील सर्वांगीण प्रगति समोर उभी रहाते तेव्हां याची संगती कशी लावावी हेंच कळत नाही!

एका संध्याकाळीं कोरियाचे थिसिकीम व मी स्केटींग रिंगच्या भव्य क्रीडागृहांत तिकीटें खरेदी करून जाऊन बसलों. रोमच्या राष्ट्रीय उत्सवांत भाग घेण्याकरितां निघालेली ही बघा नऊ जणांची खेळाडूंची चमू. त्यांत दोन मुलीहि होत्या. सारेंच चँपियन, त्यांना विधियुक्त निरोप देण्याचा हा गोड समारंभ होता. आणि तें पहाण्याकरितां तिकिटें



आणि कुठे हा चिखल तुडविणारा जपान ! !

लावून ही तोबा गर्दी ! निरोप समारंभाच्या प्रदीर्घ विधीनंतर, ते निष्णात असलेल्या कवाईतीची प्रात्यक्षीकेहि तेथे करून दाखविण्यांत आली तेथून नंतर जवळच बेसबॉलची एक महत्त्वाची मॅच चालू होती ती पहाण्यास आम्ही गेलो.

आज श्री. कीम यांनीं टोकीओ यूनिव्हर्सिटीच्या शा. शिक्षण खात्याचें 'डीन' श्री. इमामुरा यांचेंकडें जावयाचे ठरविले होते. हे जपान मधील या विषयांवरील प्रमुख व आदर्श कॉलेज. पण छें, मी अमेरिका अगोदर उगीच पाहिली असे वाटू लागले. प्रत्येक गोष्टींत दोन ध्रुवा इतकें अंतर ?

आज दुपारी श्री. जिटारो यांनीं टोकीओमधील एका प्रसिद्ध नर्तकीची नृत्य शाळेला भेट ठरविली होती. मी त्यांनी दिलेल्या पत्त्यावर बरोबर तीन वाजता जाऊन पोचलो. या नर्तकीचें नांव 'मिडोरी निशिझाकी'. या नर्तकीला इंग्रजी चांगलें येत असल्यामुळे व ही नटी बरीच सुसंस्कृत असल्यामुळें जपानी व भारतीय नृत्य कलेसंबंधी आमची चांगलीं तासभर उद्बोधक चर्चा झाली. नंतर तिनें दोन मुलींना बोलावून यांच्या नाचाचें विविध प्रकार मला मुद्दाम करून दाखविले.

तिच्या त्या लोकप्रिय नृत्यशाळेची गेल्या महायुद्धातील दुष्ट बॉंब-हल्ल्यानें कशी वाताहत करून टाकली व आतां ही 'नवी विटी नवे राज' जिकीरीनें छोटयाशा प्रमाणांत उभारून पूर्वस्थिती प्राप्त करून घेण्याकरितां किती धडपड करावी लागतें, ही कारुण्यमय कथा निवेदन करिताना तिचे डोळे पाण्यानें डबडबून आले.

तिनें उदयशंकरचें अप्रतीम भारतीय नृत्य पहिल्याचें सांगून त्या नृत्याची श्रेष्ठता कबूल केली. तिची कलेबद्दलची सहृदयता पाहून त्यांच्या नृत्याबद्दलचे माझें प्रांजल मत मला सांगावेंसे वाटलें. कारण—



# जपानांतून चीनच्या किनाऱ्यावर

## ( विशतो खंड )

'मिडोरी निशिझाकी' ही जपानची प्रसिद्ध, लोकप्रिय नर्तिका गुडघे मोडून माझे समोर बसली होती. ही मध्यम वर्गाची तरुणी मध्यम उंचीची असून स्वतःच्या कलाभिमानानें पाणीदार दिसत होती.

भारतीय नृत्यकलेची श्रेष्ठता उदयशंकरचे नाच पाहिल्यापासून तिला पटली होती.

जपानचें काबुकी म्हणून प्रसिद्ध असलेलें नृत्यनाटच मी मागे लॉस-अँजेलीस येथें असतांना व आज प्रत्यक्ष या कलासम्राज्ञीच्या घरीं पाहिलें होतें. मला तें आवडलें नव्हतें; आणि माझ्या सरळ स्वभावा-प्रमाणें माझें मत तिला सांगूनहि टाकलें होतें. तें कां आवडले नाही हें जाणून घेण्याला ती उत्सुक होती.

कुणालाहि झाले तरी आत्मप्रशस्तीच प्रिय असते, आणि मी तर सरळ दोषदर्शन करीत होतो. पण ती मोकळ्या मनाची दिसली. मी जेव्हां तिला सांगितलें कीं, तुमच्या या नृत्य प्रकारांत शरीरावर अवा-स्तव भडक रंगाची जी वेष्टणें घालण्याची पद्धत आहे, त्यामुळे रसि-कांच्या अंतःकरणाचा ठाव घेणारे भावाविष्कार नजरेत भरत नाहींत.

तिने हा दोष कबूल तर प्रांजळपणें केला; पण खोंचकपणें विचारते कशी, "आपल्याला वस्त्रहीन नृत्यांतील अंगोपांगांतील हाल-चालीची आवड दिसते ! "

हा प्रश्न टाकून ती माझ्या चेहऱ्यावरचे भाव निरखू लागली. तिच्या त्या भेदक पण प्रसन्न नजरेशी नजर भिडवून मी उत्तर दिले कीं, 'आमच्या भारतात तर तुम्ही म्हणतां तसले नृत्यप्रकार प्रचारांत नाहीतच, पण पाश्चात्य राष्ट्रांत असले चावट प्रकार नाईट क्लबांतून बरेच बोकाळलेले दिसतात. माझ्या प्रवासांत मीहि असले एकदोन प्रकार पाहिले आहेत. आपल्या जपानमध्यें काय असेल तें देव जाणे.

"आमच्या देशानें गेल्या महायुद्धापासून तर तालच सोडला आहे." हे उत्तर देताना तिची दृष्टी खिडकीतून दूर कोठेतरी खिळली होती. 'आपण आमच्या आसाकुसा या प्रसिद्ध विभागांत फिरून या. म्हणजे असल्या नग्ननृत्याला लाभलेली वाढती लोकप्रियता पाहुन आपण थक्क व्हाल. मला मात्र असली अधोगति पाहून चीड येते."

बराच वेळ झाल्यामुळें मला त्या प्रसिद्ध नृत्यांगनेची मुलाखत आटोपती घ्यावी लागली. इतक्यात तिचे पतिदेवहि बाहेरून आले व त्यांनी आपल्या मोटारनें मला माझ्या निवासस्थानी पोंचवून दिलें.

निशिझाकीनें सांगितल्याप्रमाणे एक दिवस आसाकुसा या करमणूक केंद्रांत मी जाऊन पोचलो. तेथें पहातो तो खरोखरच कित्येक छोटीमोठी नृत्यगृहे विवस्त्र नटीच्या आकर्षक जाहिरातीनी श्रृन्गारलेलीं दिसली. प्रेक्षकांच्या झुंडीच्याझुडी मिरवत होत्या. तासातासाचें सगीत श्रृगाराचे कार्यक्रम. तिकिटांचे दरहि माफक होते. मीहि एकदोन ठिकाणचें कार्यक्रम पाहिले व जपानी अभिरुचीची कीव करीत बाहेर पडलों.

परत येतांना एका भल्यामोठ्या बाजारांतून रस्ता होता. रात्रीचे १० वाजत आल्यामुळें दुकानें बंद होत होती, पण त्या मंद प्रकाशांत जो निराळाच बाजार माझ्या दृष्टीस पडला त्यानें मी थक्क होऊन गेलो. शेकडो ललना थबकत थबकत हिंडत फिरत होत्या. मग माझ्या लक्षांत आलें कीं, हा देहविक्रयाचा बाजार आहे. असले प्रकार मागे मी पोलंड व आस्ट्रियांतहि पाहिले होते. मिडोरीनें हे जपानचे किळसवाणें अंतरंग पहाण्यास मला मुद्दाम कां प्रवृत्त केलें ते माझ्या नंतर लक्षांत आलें.

गिझा या मध्यवस्तींत मी एकदा भटकत होतो. येथे आधुनिक पद्धतीची मोठमोठी सिनेमागृहें होती. अशाच एका भव्य थिएटरमध्यें वस्त्रहीन नृत्याचा कार्यक्रम लागलेला दिसला. दुसऱ्या खेळाचा कार्यक्रम ७॥ ला होता. क्युमध्ये उभा राहुन मी एक तिकिट काढलें व मधल्या वेळांत बाजूच्या एका हॉटेलांत शिरलों. या हॉटेलांतहि स्त्री–साम्राज्य दिसले. एका तरुणीनें मी जातांच मला एका टेबलावर नेऊन बसविलें व आपणहि माझ्या शेजारी बसून काय हवें ते विचारू लागली. तिची भाषा तर मला कळेना ! येथे खाद्यपेयाबरोबर तरुणीचा गोड सहवासहि मिळण्याची सोय असलेली स्पष्टच दिसत होती. तेथे चाललेल्या हसण्या-खिदळण्याचें उघड प्रकार पाहुन मी सर्द झालो व थोडेसें खाऊन थिएटरकडे आलो.

हे अद्यावत छोटेंसे थिएटर पाचव्या मजल्यावर होते. याचे नांव 'निचिगेकी म्युझिक हॉल' असें होते.

शेदीडशे प्रेक्षक बसतील येवढीच येथे व्यवस्था होती व उशीरा आलेले प्रेक्षक उभ्या उभ्याच खेळ पहाण्याला उत्सुक होते. विशेष म्हणजे पुरुषांच्या बरोबरीनें स्त्री प्रेक्षकांचाहि येथे भरणा होता.

विजेच्या रंगीबेरंगी झोतात मखमली पडदा बाजूला सरला व निरुंद पट्टीचा लंगोट कसलेल्या, आपल्या शरीर सौष्ठवाचे प्रदर्शन करीत, पांच पंचेवीस देवांगना प्रवेश करत्या झाल्या. हा अचाट नग्न-नृत्याचा अभिनव प्रकार प्रेक्षक मंत्रमुग्ध होऊन पहात होते. त्यांचे ते कलापूर्ण नृत्य पाहून मी चुकून गंधर्व लोकांत तर आलों नाहीना असा मला भास झाला.

कलेच्या उपासनेचें हे अलोट धाडस पाहून अश्लीलतेच्या कल्पना पार विरून जातात, हे मात्र कबूल करावे लागेल.

आज नॉर्थ टोकिओतील रोटरीच्या सभेला मी गेलो होतो. हें एक 'मालसुझाकाया' नांवाचे दहा–बारा मजली डिपार्टमेंटल स्टोअर होते व

वरच्या मजल्यावर आमची ही भोजनसभा थाटामाटांत भरली होती. नरिझो युराटा हे इंग्रजी बोलणारे रोटेरीयन माझ्या दिमतीस देण्यांत आले होते. त्यांचा परिचय झाल्यावर असें कळले कीं, ते एक सेफटी रेझर व रेझर ब्लेडचे बडे कारखानदार आहेत. त्यांचा कारखाना पहाण्याची मी इच्छा प्रगट केली व त्यांनीहि तो दाखविण्याचे कबूल करून दुसरे दिवशी सकाळीं कारखान्याला भेट देण्याचे आमंत्रण दिले.

ठरल्याप्रमाणें नरिझो सकाळी नवाला मला आपल्या कारखान्यांत घेऊन गेला. जपानमधील एक मोठा व प्रसिद्ध कारखाना मी पहाणार होतो. पण येथें पहातो तों एक जुन्या वस्तीत तात्पुरते उभारलेले भले मोठे टीनचे शेड व आंत निरनिराळी यंत्रे बसवून ब्लेड्स् तयार करणे चालले होते. पन्नास मुली निरनिराळीं कामे करीत होत्या. ते सर्व पाहुन मी नरिझो युराटा यांच्या खोलीत आलों व त्यांना विचारले कीं, हा आपला कारखाना फार जुना व प्रसिद्ध आहे म्हणतां, मग याचे हें स्वरूप असें कां? त्याने हसून गेल्या महायुद्धांत विनाश पावलेल्या आपल्या जुन्या वैभवाची हकीकत सांगितली. मी त्याला विचारले की मग ही नवी उभारणी करण्याकरितां आपल्याला सरकारने भाडवल दिले असेल? त्यावर त्यानें तेथील सरकारच्या आर्थिक दिवाळखोरीचें वर्णन करून आम्ही सध्या करभारानें कसे वांकून गेलों आहोत ते सांगितले व आपली थोडीबहुत असलेली शेती व इतर जायदाद विकून उभ्या केलेल्या अल्प भांडवलावर हा कारखाना उभा करून परिस्थितीशी कसें झगडत आहोत, याचें वर्णन केले. आणि आश्चर्य हें की, ही सारी हृदय-द्रावक परिस्थिती सांगतांना पूर्वस्थितीला येण्याला वेळ लागणार नाही असा आत्मविश्वासहि त्यानें प्रगट केला. शेवटी त्याने आपल्या कारखान्यांत तयार केलेला एक सुंदर रेझर सेट आठवणीदाखल मला प्रदान करून माझी बोळवण केली.

आगाऊ ठरविल्याप्रमाणें आज सायंकाळी 'कोडोकान जुडो हॉल' या टोकिओच्या आदर्श व्यायामसंस्थेला मी भेट दिली. आपल्या कुस्ती

सारखी ' जुजुत्सु ' ही जपानची एक राष्ट्रीय कला प्रसिद्ध आहे. साठ, सत्तर फुटाचा हा एक चौरस हॉल व आजु बाजूला प्रेक्षकांच्या गॅलऱ्या आणि या गॅलऱ्याखाली शरीर सवर्धनाच्या प्रसाधनांनी युक्त अशा अनेक खोल्या. या हॉलमध्ये एक एक वीत जाड गाद्या सर्वत्र पसरलेल्या होत्या. चारपाचशे तरूण ओळींओळीनें आपल्या जोडीदाराशी या जुडो प्रकाराच्या वेगवेगळ्या डावांचे शिक्षण घेत होते. त्यात मुलीहि तरुणाच्या बरोबरीनें भाग घेत असलेल्या दिसत होत्या.

प्रत्येकाने पांढऱ्या कापडाचे पायघोळ व पोकळ पायजामे व किमानो परिधान केलेले असून कंबरेला घट्ट असा कापडाचाच कंबरपट्टा कसून बांधलेला दिसत होता. तालीम शिक्षक विवक्षित डावाचे प्रात्यक्षिक दाखवून व आवश्यक त्या सूचना देऊन इशाऱ्याची घटा देई व मग ओळीओळीनें समोरासमोर उभे असलेले जोडीदार सलामी घेऊन डावाला सुरूवात करीत. येथील सलामीचा प्रकारहि वेगळाच ! प्रत्येक खेळाडूने गुडघ्यावर बसून हात लांब करून एकमेकाला साष्टांग दडवत घालायचे व नमाज पढल्या सारखें वर हात करून पुन्हा दडवत घालायचे असे तीन वेळा केले कीं मग पवित्र्यावर उभे राहून कुस्तीला प्रारंभ व्हायचा. त्याचे डाव चालू असतां एकमेकाला धबाधब आपटल्याचे आवाज सारखे येत होते. ही या कलेच्या सामुदायिक शिक्षणाची मौज मी बराच वेळ पहात बसलों होतों. नंतर त्याच्या प्रमुख गुरुशी ओळख करून घेतली व एका मध्यस्थाच्या वतीने थोडी चर्चा करून निरोप घेतला.

या बटुकेश्वराच्या नगरीतील आज माझा नववा व शेवटचा दिवस रात्री एक वाजता निघणाऱ्या पॅन अमेरिकन विमानानें मला चीनच्या किणाऱ्याकडे उड्डाण करावयाचें होते. आज रविवार असल्यामुळे इतर कांहीं करणें शक्य नव्हतें म्हणून कांही प्रसिद्ध स्थळांना भेट देत भटकून दिवस घालविणें येवढाच कार्यक्रम होता. सकाळी मी येथील प्रसिद्ध 'मिजी श्राईन' व 'मिजी पार्क' पाहून आलो. आज पावसानें चांगलीच झोड उठविली होती. त्यामुळें दुपारचें भटकण्याचें कार्यक्रम रद्द करावे लागले.

आज दुपारच्या जेवणाकरितां मीं गिंझा विभागांत असलेल्या श्री. नायर यांच्या हिंदी रेस्टॉरंटमध्यें गेलों होतो. येथें हिंदी पद्धतीची मसालेदार भाजी, भात वगैरे उत्तम जेवण मिळालें. श्री. नायर यांचें जपानीं बाईशी चार हात झालेलें होतें व हे बरेच दिवस येथेंच स्थाईक होऊन हिंदी मसाल्याचा व इतर व्यवसाय करीत होते.

त्यांना "जपानी गृहणीशी लग्न करून आपण सुखी आहात काय?" असा मी मुद्दाम प्रश्न केला.त्यावर नायरनी आपल्या सहधर्मीणीची स्तुति करून ती भारतीय गृहिणीपेक्षां कांकणभर जास्तच सेवापरायण, सुबुद्ध, अंग-मेहनतींला न डगमगणारी व विश्वासू असल्याचा निर्वाळा दिला.

न्यूयॉर्कमधील अमेरिकन गृहिणीशी संसार थाटलेले गुर्जर, यांची मला या वेळी आठवण झाली. त्यांचीं ती तिला खुष राखून वागविण्याची पद्धत व नायरची जपानी गृहोणीशी परस्पर विश्वासानें वागण्याची पद्धत, या दोन देशातील गृहजीवनांची दोन ध्रुवेंच म्हणाना!

आज पावसाने खुपच कमाल केली. मी सारा दिवस टोकिओ सेंट्रल स्टेशनच्या सुखासीन वेटिंग रूममध्यें लिहिण्यावाचण्यांत काढला व ठराविक वेळी विमानतळावर येऊन पोंचलो. पावसाची धो धो मुसळधार चालूच होती. पण छत्र्या घेऊन आम्ही विमान गांठलें आणि ठराविक वेळीं रात्रौ बरोबर एक वाजतां आम्ही हाँगकांगकडे रवाना झालो.

# इंग्रजांच्या चीनी साम्राज्यांत

## ( एकोविंशति खंड )

### हाँगकाँग

टोकिओ विमानतळावर प्रवाशांच्या सहवासांत जे दोनतीन तास मला घालवावे लागले त्यांत एका हवाईयन तरुणाची माझी गाठ पडून मोठी उद्बोधक चर्चा झाली.

ह्या तरुण चिनी मातापित्यांचा मुलगा होता व अमेरिकन नागरिक म्हणून सैन्यांत भरती झाला होता. जपान स्वतंत्र झाले असले तरी अमेरिकेचा पगडा कायम असल्याचें द्योतक म्हणून अमेरीकन सैन्य जपानच्या सर्व महत्वाच्या ठाण्यावर ठाण मांडून बसलेले सर्वत्र दिसून येते. हा हवाई तरुण, चांग युंग सिंक्लेअर, टोकीओच्या विमानतळाच्या संरक्षक दलांत नोकरीवर होता.

चांग युन्गला, मी "स्वर्गतुल्य हवाईत जन्म घेणारा तूं किती भाग्यवान आहेस ?" असे छेडताच, तो आंबट तोंड करून म्हणाला, "ज्या स्वर्गांत माझ्यासारख्या धडधाकट तरुणाला पोट भरणें अशक्य झाल्यामुळें नोकरीकरिता देशोधडीला लागावे लागते, असा स्वर्ग कोणत्या कामाचा ?"

किती अर्थपूर्ण उद्‌गार हे!

सामान्य माणसाच्या भाषत स्वर्ग त्यालाच म्हणता येईल कीं जेथ त्याला प्रामाणीकपणे पोट भरुन जगता येईल. उपाशीपोटी स्वर्गातहि सौख्य लाभणें कठीणच आहे ही गोष्ट खरी !

खालची वरची धार एक, अशा धुव्वाधार पावसांत आमच्या विमानानें आकाशात भरारी मारली. वास्तविक विमान वर चढतांच पांच सात मिनिटांत स्थिरावते व कंबरेचे पट्टे सैल करण्याची सूचना दिली जाते. पण आज विमान झोके घेतच वर चढत होते.

अशा स्थितीतच मला झोपेनें घेरलें व जाग आला तो फटफटीत उजाडले होते.

तुरळक पांढऱ्या ढगांतून सरकत असलेली लहान बेटे सुदर दिसत होती. आमचे शौच मुखमार्जन व न्याहारी आटोपली. ऊन स्वच्छ पडले होते. दहाचा सुमार होता. हॉंगकांग आल्याची वर्दी आम्हाला मिळाली व पट्टे बांधुन आम्ही खाली पाहुं लागलो.

या पहा चीनच्या किनाऱ्यावरील छोटचा छोटचा टेकडचा. या टेकडचा वरून सरपटत आमचे विमान समुद्रावर आले व नेहमीच्या शिरस्त्याप्रमाणें गोलाकार चक्कर न घेतांच सरळ व हळुवारपणें हॉंगकांगच्या विमान तळावर उतरले.

आता तपासणीचे नाटक माझ्या चांगलेच अंगवळणी पडले होते. ते आटोपून कंपनीच्या बसनें आम्हाला शहरांत आणून सोडले. माझी उतरण्याची ठराविक जागा 'वाय् एम्. सि. ए.' जवळच दिसली. येथें खोली मिळण्याला त्रास पडला नाही.

हॉंगकांग हे चीनच्या किनाऱ्यालगत असलेले एक छोटेखानी बेट आहे. ज्या ब्रिटिश साम्राज्यावर पूर्वी कधी सूर्य मावळत नसे, त्या मावळत्या साम्राज्यशाहीचे अतीपूर्वेकडील हे एक उरले सुरले माणीक, दुसऱ्या महायुद्धाच्या जबरदस्त हादऱ्यानें हलवून पक्के होऊन बसले आहे.

या बेटाची लांबी अवघी अकरा मैल असून रूंदी दोन ते पांच मैल आहे. आजूबाजूला निर्मनुष्य अशी पंचाहत्तर बेटे व कावलून या भूशिराचा चाळीस पन्नास मैलाचा चिंचोळा पट्टा. येवढयाची ही ब्रिटिश वसाहत, लाल व पांढरा चीन यांच्या मधोमध ठाण देऊन बसली आहे.

कावलून व हाँगकागमधील समुद्राचा चिचोळा भाग एखाद्या प्रचंड नदीच्या पात्रासारखा शोभतो. या सरासरी दोन मैल रुंदीच्या सयुक्त किनाऱ्यामुळे हे जे हाँगकांगचे नैसर्गीक बंदर निर्माण झाले आहे त्याची उपयुक्तता व सौदर्य अवर्णनीय असे आहे.

या साडेबावीस लाख वस्तीच्या वसाहतीत इंग्रज अवघे नऊशे व चिनेतर तेराशे नागरीक रहातात. लालचीनचे कोटयावधी नागरीक व पाढऱ्या फार्मोसातील सत्तर लाख चिनी स्वबांधव, याच्या आपसांतील गहकलहाला कटाळून निर्वासित झालेली असंख्य चिनी कुटुंबे हाँगकागच्या आश्रयाला येऊन सारखी गर्दी करीत आहेत.

माझा निवास 'कावलून' विभागात समुद्र किनारीच होता. समोर असंख्य लहानमोठ्या बोटींनी गजबजलेली खाडी व पलीकडे लोंबकळलेल्या ढगानी व्याप्त अशा पहाडांच्या सुंदर रांगा. या पहाडांपहाडातून व किनाऱ्यालगत अनेक उंचच उंच इमारतीच्या ओळी. रात्रीच्या वेळी तर हे दृष्य फारच मनोहारी दिसत असे. या खाडीतून जा ये करण्याकरिता दर पंधरा मिनिटाला फेरी बोटींची योजना असून कावलून व हाँगकाँग या दोन्ही विभागांत प्रशस्त सडका व बसेसहि भरपूर व चांगल्या आहेत.

हॉगकागमधील माझा पहिला अनुभव म्हणजे येथील पाण्याचे भयंकर दुर्भिक्ष्य! जून महिना असल्यामुळें मुंबईसारखा उष्मा. मी जातांच तेथील नोकरानें हाततोड धुण्याकरिता एक पाण्याचे भांडे आणून दिले. येथे आधुनिक सोयीनी सुसज्ज अशा बाथरुमस् असून पाण्याच्या अभावी शुष्क दिसत होत्या.

मला येथून लाल चीनमधील पेकिंग, शांघाय वगैरे भागांत जावयाचे होते; म्हणून तसा व्हिसा मिळविण्याच्या खटपटीला प्रथम मी लागलो. ऊनपावसाचा खेळ चालू होता. फेरीनें मी हांगकागमध्ये आलो. व आपली एॅबसी गाठली. मणी नांवाचें गृहस्थ येथें आपले वकील म्हणुन असल्याचे कळले. त्यांची भेट घेण्याकरिता थोडे प्रयास पडले. भेट होतांच या महाशयांना मी आपली चीनमध्यें जाण्याची

भूमिका समजावून सांगितली. पण त्यांनी टाळाटाळी करून मला निरुत्साहित करण्याचा प्रयत्न केला. त्यांचे म्हणणें असें की चीनची वकिलात येथें नसल्यामुळे आम्हाला पेकिंगला लिहावे लागेल व तेथून व्हिसा येण्याला किती वेळ लागेल हे सांगता येत नाही. पण माझी या बाबतीतील विशेष चिकाटी पाहून मणी साहेबांनी मला एक युक्ती सांगितली. त्यांनी तेथील एका न्यू चायनीज न्यूज एजन्सीजचा पत्ता देऊन त्यांच्यामार्फत प्रयत्न केल्यास व्हिसा मिळू शकेल असे सांगितले

त्यानी सांगितलेल्या पत्यावर कार्नर व्हॉन रोडवर मी उभा होतो· घराचा नंबरहि बरोबर होता. पण हा पहा एक भक्कम लोखंडी दरवाजा, बंद आहे. मी बुचकळ्यांत पडून शेजारी पाजारी चौकशी करू लागलो. एका गृहस्थानें जाताजाता सल्ला दिला की चांगले जोराचे धक्के मारा त्या दरवाजावर, म्हणजे उघडतील लेकाचे आपोआप. हे ऐकून मी चकीतच झालो. पण हिंमत करून खरोखरच धक्के मारू लागलो. मग मात्र माणसाच्या उंचीवर असलेली एक पाटी सरकून त्यांतून डोळ्यांवरील चष्म्याची दोन भिगें चमकू लागली. त्या व्यक्तीला मी माझे काम सांगून दरवाजा उघडण्याची विनती केली. पण त्याने दार न उघडतांच त्या छिद्रांतून एक कागदाची गुडाळी माझेकडे सरकवली. हा एक छापील फार्म होता. त्यांत नांव गांव, भेटण्याचा उद्देश, असे खाने होते. ती सारी माहिती भरून त्या कागदाची गुडाळी मी परत आंत सरकविली. ती गुडाळी आंत जाताच तो झरोका बद झाला. आणि पांच सात मिनिटे वाट पाहिल्यानंतर त्यानें दरवाजा किलकिला करून मला आंत घेतले व काळजीपूर्वक दरवाजा बंद करून एका अडगळीच्या खोलीतून दुसऱ्या खोलीत व या दुसऱ्या खोलीतून तिसऱ्या खोलीत मला नेऊन बसविले. हा लाल चीनचा पँग, पोरगेलासा असून किडकिडींत होता. त्याचा वर्ण पिवळसर गोरा असून तो दिसण्यांत चलाख होता. मला लागणाऱ्या व्हिसाबद्दल माझें म्हणणें त्यानें ऐकून घेतलें व माझा पासपोर्ट पाहून एका कागदावर त्यानें टिप्पण करून घेतले. इतके झाल्यावर पेकींगला लीहून तेथून उत्तर आल्यावर काय तें कळवितो असेंच त्यानेहि मला सांगितले. व शेवटी तुम्ही आपल्या वकिलातीतूनच खटपट केल्यास हें काम ताबडतोब होऊ शकते असा सल्ला दिला.

ह्या साऱ्या प्रकारावरून आमच्या वकील महाशयांनी निव्वळ टाळा-टाळी करण्याचा कसा प्रयत्न केला हें माझ्या लक्षांत आले. ह्या हिसाचा नाद आपण सोडावा असें मी आपल्या मनाशी ठरवून त्या तरुणाशी थोडे मोकळेपणानें बोलण्याचा प्रयत्न केला.

एक तरुण स्त्री, ही बहुतेक त्याची पत्नी असावी, आतल्या खोलीं-तून आमचेकडे सारखी डोकावून पहात होती. मी त्याला विचारले कीं तुम्ही येथे येवढ्या कडेकोट बंदोबस्तानें कां रहाता? त्यावर तो केविल-वाणे तोंड करून म्हणाला, येथील लोक फार वाईट आहेत. वाटेल त्या कारणावरून भांडण उकरून काढतील आणि दगडफेक तर यांचा नित्याचा खेळच आहे अशा थोड्याशा चर्चेनंतर मी कोणी त्यांच्या शत्रुपैकी नाही अशी त्यांची खात्री पटताच त्याने आपल्या पत्नीकरवी मला लाईमज्युस दिले व विशेष जास्त बोलण्याची इच्छा न दर्शविता मला निरोप दिला.

मला चीनमध्ये जाणे शक्य नाही असें दिसताच मी हाँगकांग सोड-ण्याची तयारी केली. पण आठ दिवस विमानांत जागा मिळणार नाही असे मला सागण्यात आल्यामुळे मी मोठा विचारांत पडलो.

हाँगकांग हे हवाईतील होनोलोलू सारखें निसर्गसिद्ध सुदर बेट आहे. पण हवाईतील समशितोष्ण हवेची मौज कांही औरच होती. येथे एक 'पिक रेल्वे' असून ती तेथील पहाडाच्या उच्च शिखरावर नेऊन सोडते. या ठिकाणावरून साऱ्या हाँगकाँग बेटाचें दृष्य फारच सुंदर दिसते. मी सायकाळचा येथेच भटकायला येत असे. येथे सिंधी व्यापाऱ्यांचा भरणा बराच मोठा आहे. त्यांचीहि येथें गाठ पडत असे.

हाँगकांगचे दुसरे एक वैशिष्टय म्हणजे 'टायगर बाम पगोडा'. ऑबून हॉ या गहस्थानें त्याच्या टायगर बामच्या प्रसिद्धीकरीता हांग-कांग व सिंगापूर येथे अशी दोन स्थळें निर्माण केली आहेत की, ती पहाण्याकरिता हजारो प्रवासी हटकून येत असतात.

हा हाँगकांगचा पॅगोडा एका टेकडीवर उंचच उंच बांधला असून चिनी कलेचा एक उत्कृष्ट नमूना आहे. शिवाय या टेकड्यांच्या समूहाच्या कपारी कोपऱ्यांत चुना सिमेंट मध्ये बांधलेलें, चिनी, सामाजिक व ऐतिहासीक कथानकांचे अजब नमुने, चित्रविचित्र पेहेरावांत उभारलेलें आहेत. तेथल्या गल्ली-बोळांत व गूंफां-विहारांत, माणूस, देव, राक्षस, वाघ, हत्ती पक्षी काय वाटेल त्या पुतळ्याचे प्रदर्शन पहाता पहाता या अजब माया नगरीचे कोतुक करावें, की लाखो रुपये अशा शोकांत उधळणाऱ्या या 'टायगर बाम' वाल्याला वेड्यांत काढावे, कांहीं कळत नाहीं.

येथील चिनी लोक पिवळसर गौर रंगाचे असून जपान्यांच्या चेहेऱ्यावर असलेल्या लालीचा यांच्या चेहेऱ्यावर पूर्ण अभाव दिसत होता. यांचे डोळे किंचित निरुंद पण सुजल्यासारखें धुंद दिसत होते. सर्व साधारण जनतेत गरीबी व गलिच्छता स्पष्टच दिसत होती. स्त्री-पुरुषांच्या कपड्याची तऱ्हा म्हणजे आपल्या इकडील छत्र्यांना असलेला घोटीव काळ्या कपड्याच्या तोकड्या विजारी व उंच कॉलरची कशानें बांधलेली तसलीच बंडी. बहुतेक स्त्रियांच्या दोन दोन वेण्या पाठीवर सुटलेल्या. दोन दिवस असाच भटकून, चिनी देवळे, खेडी, नाटके, बाजार वगैरे सामाजिक अंगोपांगाचे जेंवढे दर्शन घेंता येईल तेवढे मी घेतले. आणि भारत व चीन यांच्या मागासलेपणाची मी आपल्या मनाशी तुलना करू लागलो, पण जोंपर्यंत लाल अगर पांढऱ्या स्वतंत्र चीनचे दर्शन मला घडले नाही तो पर्यंत त्यांच्या विषयी आपले मत बनविणें योग्य होणार नाही.!

चवथें दिवशी म्हणजे गुरुवार ता. १० जून रोजी फिलीपाईन्सला जाणाऱ्या विमानांत मला कशीबशी एक जागा मिळाली व या चिंगचूंग चोचो, चोचो, कांग-टांगच्या राज्यांतून बाहेर पडण्याला मला मोकळीक झाली.]

---

# फिलीपाइन्स

## [द्विविंशति खंड]

हांगकांग ते मॅनीला हा अवघा साडेतीन तासाचा प्रवास. ही सारी भरारी समुद्रावरूनच होती. मी लेकसिटीतील युटा युनिव्हर्सिटीच्या पुस्तकालयांतून लुई फिशरनें लिहिलेले गांधीच्या चरित्राच्या ३।४ प्रती विकत घेतल्या होत्या. कांहीं तेथल्या मित्रांना भेटी दाखल बहाल करून एक प्रत मुद्दाम माझ्या या प्रवासातील वाचनाकरिता जवळ बाळगलीं होती. त्याच्या वाचनांत मी इतका गढून गेलों कीं, मॅनीला केव्हां आले ते कळलें सुद्धा नाही.

सायंकाळ झालीं होती. मॅनीलाचे एअरपोर्ट यथातथाच दिसत होते. या द्विपसमुहाच्या राज्यांत मी अगदीच नवखा होतो. त्यांतून कस्टमची तपासणी बरीच कडक दिसली. सर्व उतारूचे पासपोर्ट विमानांतच जमा करून घेतले होते. खाली उतरताच तपासणीच्या चाकोरीतून सरकत सरकत आम्हाला एका हॉलमध्यें बसविण्यांत आले व तेथून एकेकाला बोलावून तेथील अधिकारी प्रत्येकाची चाचणी करून सुटका करीत होते.

माझा पासपोर्ट मुद्दाम शेंवटी ठेविण्यांत आला असावा असा मला संशय आला. कारण सर्व प्रवासी निघून गेले तरी ते सज्जन मला बोलाविण्याचे नाव घेईनांत. शेवटी मला त्या अधिकाऱ्याच्या खोलींत शिरून कसली भानगड आहे याची शहानिशा करणे भाग पडले. मी आंत गेलों तों ते तिघे अधिकारी माझा पासपोर्ट समोर ठेवून त्यासंबंधी आपसांत चर्चा करतांना दिसले. मी समोर दिसतांच एकाने प्रश्न केला की, 'आपण येथे कशाकरीता आलांत'?

त्यावर मी, भारत सरकारचा प्रतिनिधी म्हणून अमेरीकेंत कसा गेलो व व्यायाम, क्रिडा व करमणुक इत्यादि विषयांचा शैक्षणीक अभ्यास करीत हिंडत हिंडत, आपल्याहि देशांत कोणत्या उद्देशानें आलो वगैरे सर्व कांहि सांगितले.

पण का कुणास ठाऊक माझे येणे त्यांना संकट वाटत असावे असें दिसले. "आपण कोठें उतरणार, किति दिवस रहाणार, कुणाकुणाला भेटणार"? इत्यादि नसत्या चाभारचौकश्या ते करू लागले. शक्य तोंवर सारी उत्तरे बरोबर देऊन ते जेव्हा निर्णय घेईनात तेव्हा मला त्यांचा रागच आला. मी त्यांना खडसाबून विचारलें कीं, "मजजवळ माझ्या देशाचा व्यवस्थीत पासपोर्ट आहे. आपल्या अमेरीकेतील कॉन्सल जनरल कडून प्राप्त केलेला 'व्हिसाहि' बरोबर आहे. मग माझ्या यथे उतरण्यांत बाधा घालून आपण व्हिसा देणाऱ्या आपल्याच अधिकाऱ्यांचा असा उपमर्द कां करीत आहांत, हे कळणे कठीण आहे. तेव्हा नीट विचार करून ताबडतोब निर्णय घ्या. मला येथे उतरू द्यावयाचे नसेल तर येथून निघणाऱ्या पुढच्या विमानांत मला जागा मिळवून द्या, मी येथूनच आपल्या देशाचा निरोप घेईन."

माझ्या या सडेतोड उत्तरानें ते चपापले खरे, व मग म्हणू लागले कीं आपण जाऊ शकता पण हा तुमचा पासपोर्ट आमच्या जवळ राहील, आपण कुठल्या हॉटेलात उतरता ते फोननें कळवा म्हणजे पासपोर्ट तेथे पोचता करूं.

अरे वा! मी मनांत म्हटले की मला हे शेंबडा पोरच समजून बसलें! त्यांच्या त्या मूर्खपणाचे मला हसूच आले. मी हसतच त्याना प्रश्न केला की, "आपणापैकी कुणी परदेशाचा प्रवास केला आहे काय? परदेशांत हिंडताना खिशात पासपोर्ट नसणें म्हणजे आत्म्याशिवाय शरीरच समजा. तेव्हां काय वाटेल ते झाले तरी पासपोर्टशिवाय मी येथून इंचभरहि हलू शकत नाही.'

आता मात्र त्याचे डोळे पूर्ण उघडलें. माझा पासपोर्ट तर त्यांनी माझ्या स्वाधीन केलाच पण आता सारे प्रवासी निघून गेले असल्यामुळें मला त्यांनी एक टॅक्सी करून दिली व त्याला मला वाय. एम्. सि ऐं-त नीट उतरविण्याच्या सूचना देवून मला तेथून आदबीने निरोप दिला.

एकूण ही फिलिपाईन बेटे अमेरिकेची एक छोटी विकृत प्रतिकृतीच तर नसावी, असा मला भास झाला. कम्युनिझमच्या भूतानें पछाडल्याचाच हा प्रताप असावा, दुसरे काय ?

मॅले द्विपकल्पांतील छोटया छोटया सात हजार एकशे नऊ बेटांचा हा एक समूह आहे. त्यातील चारशे बासष्ट बेटे काय ती एका मैलापेक्षा मोठी आहेत. लुझान हे त्यांतल्यात्यात सर्वात मोठें बेट असून राजधानीचे मॅनीला शहर त्यावरच वसलेले आहे.

दोन कोटी फिलिपिनोच्या या जमातींत मलायन, चिनी, बोर्नीओ, इंडीअन, इंडोचिनी अशा अनेकविध लोकांचे हजारो वर्षापासून सांस्कृतिक मिश्रण झालेले असून आज ख्रिस्त धर्माचा तेथे पूर्ण पगडा बसलेला आहे. चिनी डोळे, बसकी व फेंदारलेली नाकें व उजट सावळा रंग, असे थोडक्यांत त्यांच्या रंगरूपाचे वर्णन करता येईल.

स्पेनच्या दुसऱ्या फिलिपने इ. स. १५२१ मध्ये हिंदुस्थानच्या शोधार्थ जे एक सुसज्ज आरमार पूर्वेकडे रवाना केले होते, त्यांना ही बेटे दिसली व त्यांनी त्यावर लीलेनें आपला ताबा बसविला. स्पेननें मागाहून आलेल्या अनेक देशांच्या हल्ल्याशी तोंड देत देत तब्बल साडे तीनशे वर्षे येथें मोठया शर्थीनें राज्य केले. आणि या फिलिप राजाच्या सन्मानार्थ ' फिलीपाईन बेटें ' असे या देशाचे नव्यानें नामकरण केले.

पुढें इ. स. १८९८ साली क्यूबाच्या तंटयावरून अमेरिकेशी स्पेनचे युद्ध जुपले व स्पेनला,या बेटांवर अखेरची तिलांजली देवुन तेथून पलायन करावे लागले. पण या हस्तांतराच्या भानगडींत जी बंडाळीची लाट उठलीं त्यांतच स्थानिक नागरिकांच्या अंतःकरणांत डॉ. जोस रिझाल या

मान्यवर देशभक्ताला अमेरिकनांनी बंडखोर ठरवून गोळी घालून ठार केले. पण या प्रकारानें जी लोकशाही स्वातंत्र्याची बिजें तेथें रूजल्या गेली तीच आज तेथें सुखाने नांदत असलेल्या 'रिपब्लीकला' जन्म देण्याला कारणीभूत झाली.

गेल्या महायुद्धांत जपाननें जे या द्विपसमुहावर बॉबचे निघृंण हल्ल्यावर हल्ले चढविले, त्यांच्या चिघळलेल्या जखमा आता कोठे थोड्या फार भरून निघत आहेत.

केवढाली सुन्दर सुंदर क्रिस्ति प्रार्थनामंदीरे, युनिव्हर्सीटया,दवाखानें, सिनेमागृहे, धारातिर्थी पडलेल्या दुर्लक्षित विरासारख्या भकासपणे आजहि सर्वत्र दिसून येतात. त्यावेळचे अमेरिकेचे ताबेदार असलेले फिलिपीन रिपब्लीक सरकार, जपानच्या हुसकावण्यानें वाशिंगटनला तळ देऊन कित्येक दिवस बसले होते, ही गोष्ट सर्वश्रृतच आहे.

असा हा या देशांच्या स्वातंत्र्याचा इतिहास भारतीय स्वातंत्र्य संग्रामाशी समकालीन असून पुष्कळसा जुळता आहे. आज तेथे पूर्ण लोकसत्ताक राज्य प्रस्थापित झाले असून सर्वांगीण प्रगति झपाटयाने होत असलेली दिसून येतें.

माझा या बेटावर अवघा तीन दिवस मुक्काम होता, पण अमेरिकेंतून आणलेल्या येथील एका शारीरिक शिक्षण प्रमुखाच्या ओळखपत्रामुळे मला तेथील शिक्षणप्रणालीचें जे दर्शन घडलें ते अपूर्व होते.

(Education is the first charge on the state treasury) सरकारी खजीन्यातील सर्वांत मोठी रक्कम येथें सर्वांगीण शिक्षणावर खर्ची पडते असे मला सांगण्यांत आले.

शिक्षण खात्यांत माझी अनेक वरीष्ट अधिकाऱ्याशी ओळख करून देण्यांत आल्यावर होसे पी अमोरीन या एका फिजिकल इन्स्पेक्टरला बरोबर घेऊन मी तेथील महत्वाच्या स्थळांना भेटी दिल्या.

आपल्या इकडच्या सारखे एका घोडयाचे टांगे, विक्रीला ठेविलेले उत्तम उत्तम आंब्याच्या पाटचा व जुन्या म्हाताऱ्या कोताऱ्यात तंबाखु

व पान खाण्याची प्रथा पाहून गोव्यासारख्या एखाद्या भारताच्या दूरच्या प्रांतात तर मी हिंडत नाहीना, अशी मला शंका आली.

गेल्या महायुद्धातील भीषण चकमकी मॅनीलाच्या गल्लीबोळातून व घराघरातून लढल्या गेल्या होत्या. त्या वेळच्या, गृहसौख्य बेचिराख करण्याला कारणीभूत झालेल्या जीप गाड्या, आज येथें दळणवळणाचे प्रमुख साधन होऊन बसलेल्या दिसत होत्या. या वाहनाला येथे 'जिपनी' असे नामाभिमान प्राप्त झाले असून सात आठ सवाऱ्या घेऊन भिंगरीसारख्या मिरविणाऱ्या या असंख्य जिपन्यामय रहदारीचे चित्र मोठें नाविन्यपूर्ण दिसत होते.

अमोरीन व मी प्रथम एका हॉटेलांत जाऊन मद्रासी पद्धतीचें भारतीय जेवण केलें तेथून आम्ही 'सँतो तोमास' ही प्रसिद्ध युनिव्हर्सिटी पाहण्यास गेलो. हार्वर्ड युनिव्हर्सिटीपेक्षाहि ही जुनी असून बरीच अवाढव्य आहे.

या युनिव्हर्सिटीच्या परिसरांत हिंडतांना दिवाण एस् बाथाला या नावाच्या एका हिंदी डॉक्टरानें मला पाहताच माझी ओळख करून घेऊन मेडिकल कॉलेज दाखविले. त्यांचे वडील तेथें एक प्रमुख व्यापारी असून या तरुण व देखण्या एम. डी ने भारतीय सुंदरीशी लग्न करण्याच्या दृष्टीने भारतात यावे काय? अशी माझेजवळ पृच्छा केली. अर्थात मी त्याला तो भारतात आल्यास पूण सहकार्य देण्याचे आश्वासन देऊन त्याचा निरोप घेतला.

पुढे आम्ही रामसन मॅकसायसे या रिपब्लिकन अध्यक्षाचे राजेशाही निवासस्थान, व सेक्रेटरीएट पाहून स्त्रियाच्या यनिव्हर्सिटीत आलो. ही युनिव्हर्सिटी गेली पसतीस वर्षे स्त्र-शिक्षणाचें कार्य करीत आहे. यावेळी येथे मुलीना प्रवेश देणे चालू होते. या प्रवेशाचे एक वैशिष्ठ्य माझ्या नजरेस भरले. ते असें की, प्रवेश घेऊ इच्छिणाऱ्या मुलीची डॉक्टरांकडून शारीरिक तपासणी करून अशा तपासणीला विशेष महत्व दिले जात होते.

वाटेंत आम्ही जोस रिझॉल या राष्ट्र-वीराच्या गौरवार्थ बांधलेला एक जंगी स्तंभ पाहिला. याच रिझालच्या नांवानें येथें सहा

टोलेजंग स्टेडियम् बांधलेले असून गेल्या मेमध्ये एशियन गेम्सचा जगी सोहाळा येथेच साजरा करण्यात आला होता.

फिलिपाईन्समध्ये येऊन मॅनीला येथील 'जय अलाई' हा नाविन्यपूर्ण खेळ ज्याने पाहिला नसेल तो जगांतील एकमेव अशा रोमांचकारी घटनेला मुकला असेंच म्हणावे लागेल.

'जय अलाई' हा चेंडूदांडूसारखा एक खेळाचा प्रकार असून त्याला घोडदौडीसारखे 'रेस'चे स्वरूप दिलेले आहे. हा खेळ ज्या राजेशाही चारमजली इमारतीत रविवारखेरीज दररोज चालू असतो ती 'जय अलाई बिल्डींग' चाळीस लक्ष 'पेसो' म्हणजे एक कोट रुपये खर्च करून लढाईनंतर पुनुर्जिवीत करण्यांत आली आहे.

यांत प्रमुख असे दोन भाग असून एक खेळण्याचे 'कोर्ट' व दुसरे हा खेळ आरामाने बसून पहाता यईल अशा तीन हजार प्रेक्षकांना बसण्याच्या गॅलऱ्या. तीन भिंतीवर चेंडू फेकून खेळण्याचा हा खेळ. या खेळांत एका वेळी सहा खेळाडू भाग घेतात. चौरस बत्तीस फुट अशा समोरासमोर दोन गुळगुळीत भिंती व एकशे अठ्याहात्तर फूट लाबीची ग्रानाईटची तिसरी भिंत. चवथी बाजू प्रेक्षकाना पहाण्याकरिता उघडी असून त्याला चेंडू बाहेर उडू नये म्हणून जाळी लाविलेली असते.

खेळाडू उजव्या हातात एक दोनअडीच फूट लांबीची विणलेली गोलाकार टोपली बांधून त्यांत भिंतीवरून उडून आलेला चेंडू कौशल्यानें झेलतो व झेलल्याबरोबर तितक्याच कौशल्यानें भिंतीवर फेकतो. तोच चेडू दुसऱ्या खेळाडूने झेलून बरोबर फेकला नाही तर तो गडी बाद होऊन नवीन गडी खेळायला येतो व यशस्वी फेकणाराला एक 'पॉइंट' मिळतो. अशा रीतिनें पाच पॉइंट मिळविणारा 'विनर' व चार पाईंट मिळविणारा 'प्लेस' म्हणून जाहीर होतो.

घोड्याच्या रेससारखे या खेळाडूवर पैसे लावून तिकीटे घेतल्या जातात व विन–प्लेसवर डिव्हिडंड वाटले जाते.

प्रेक्षकांचे चार वर्ग असून अर्ध्या पेसो म्हणजे सव्वा रुपयापासून दोन पेसो अशी वर्गवार तिकिटे असतात.

हा खेळ फारच प्रेक्षणीय व रोमांचकारी असून सारे प्रेक्षक खेळ पहातांना खेळाडूशी समरस होऊन जातात.

या खेळाला 'जय–अलाई' हे नांव कसे प्राप्त झाले कुणाला ठाऊक! पण त्यातील 'जय' या शब्दातील भारतीय निनाद कानाला गोड लागून आपल्याला जवळचा वाटतो. आशियाई राष्ट्रांत पेरल्या गेलेल्या भारतीय संस्कृतीचें हे आणखी एक स्पष्ट उदाहरण आहे, येवढे मात्र खरे!

अशा तऱ्हेनें ही माझी फिलिपाईनची धावती यात्रा संपवून सोमवार ता. १४ जून रोजी सकाळी नवाच्या प्लेनने मी सिंगापूरकडे मोर्चा फिरविला.



# सिंगापूर ते बँकॉक

## (त्रिविंशति खंड)

आतांपर्यंत माझा साधारण एकवीस हजार मैलांचा प्रवास झाला. रोज नवा देश, नवीन भाषा नवीं माणसें, सर्वच कांहीं नवीन. आपली ही पृथ्वी किती वैचित्र्यानें भरलेली आहे. त्याच त्याच गोष्टीचा वीट आला म्हणजे माणसाला रुचिपालट म्हणुन वैचित्र्य आवश्यक असतें.

पण मला आतां या वैचित्र्याचाच वीट येऊ लागला. कारण वरवर दिसणारें हे वैचित्र्य मुळांत सारें एकच आहे. मानव मग तो या पृथ्वीच्या पाठीवर कोठेहि राहो येथून तेथून सारखाच !

ही बघा फिलिपाईनच्या द्वीपसमुहातील बेटें ! पटावर नरद मांडल्यासारख्या दिसत आहेत. हा कोळी बघा ढुगणाला लंगोटी लावून मचव्यातून माशांची शिकार करीत आहे.

आम्ही सकाळीं नऊला मनीला सोडलें. आकाशाच्या पोकळीतून आमचें विमान संथपणें चालले होते. रिकामपणीं प्रवासांतील भोजनाची मजा कांही और असते. त्यांतून हे बसल्या जागी मांडीवरचें जेवण येथे जगाचा संबंध पायलटच्या बिनतारी संदेशानें जेवढा असेल तोच. प्रत्येक वेळी आपण निराळ्याच सृष्टीत वावरत असलो तरी त्याची जाणीव मात्र नसते.

दोनला सायगांव आले. वैचित्र्यांत कांहीं तरी नवीन भर पडणार असें मला वाटूं लागलें. कारण येथें फ्रेंच व व्हिएटनामीज यांच्यांत युद्ध चालु होते.

आणि खरोखरच आम्ही सायगांवच्या विमानतळावर उतरताना शेकडो विमानांचे गुरगुरणे आमच्या कानावर पडलें. जसे विमान थांबलें तसे सैनिक अधिकारी आमच्या विमानांत घुसले व त्यांनी जंतुनाशक औषधीच्या फवाऱ्याने येथील सारे वातावरण भरून टाकलें. नंतर घुबडासारख्या नजरेने आमचे सर्वांचे चेहरे व सामान न्हाहाळून सारे पासपोर्ट जमा करण्यांत आले, व सर्वांना खालीं उतरण्याची अनुज्ञा झाली. आणि बंदोवस्तानेच सभोरच्या विश्रामगृहांत आम्हाला पोचविण्यांत आले.

या चाळीस मिनिटाच्या आमच्या मुक्कामांत तेथे घडत असलेल्या आकाशयुद्धाची नौबत आम्ही प्रत्यक्ष ऐकत व पहात होतों. रामरावण युद्धात भाग घेतलेलीं माकडे जशी काळया तोंडाची असत तशी ही या हवाई युद्धांत भाग घेणारी छोटी छोटी विमाने खालून धुरकटल्या रंगाची दिसत होती

एकापाठी एक विमान घरघरत खाली येई व त्यांतून सशस्त्र सैनिक बाहेर पडत व शेजारच्या केंद्रांत निघून जात. कांहीं जखमी वीर स्ट्रेचरवरून उतरविले जात होतें.

दुसरीकडे नवी विमानें नव्या दमाच्या सैनिकांना घेऊन हुकुमा-प्रमाणे आपआपल्या कामगिरीवर निघून जात. शुभ्र पोषाखांतील पांचपचेवीस सेनाधिकारी त्या केंद्रातून सारखी आंत बाहेर करीत काकदृष्टीने जाणाऱ्या येणाऱ्या विमानावर नजर ठेवून दिग्दर्शन करीत होते

येवढी येथें धांवपळ—धुमाकुळ पण कोठे गडबड नाहीं कीं गोंधळ नाही सारे कसें शिस्तबद्ध चाललें होतें.

हे रोमांचकारी दृष्य पहात पहात आमचे चहापाणी आटोपलें व आम्हाला आपल्या वायुयानात बसण्याची सूचना मिळाली.

आतां आमचे विमान दक्षिण दिशेला सिंगापूरकडे वळलें. हिंदूचीनचा समुद्रकिनारा नव्या वैचित्र्याने नटलेला दिसत होता. भुभागाचा उथळ

किनारा सागराशी समरस होताना जी अनेक अर्धवतुळांची रेखीव रांगोळी घालीत होता, तें दृष्य डोळयांत उडुन बसत होते. त्यांतच लहान लहान चिंचोळया नागमोडी पाटांची पाखरण, किती अपूर्व दिसत होती !

सायंकाळचे साडेसहा झाले होते. सिंगापूर हा ब्रिटिशांचा अतिपूर्वेकडील दुसरा बालेकिल्ला. येवढे प्रचंड, आधुनिक पद्धतीचे व सुखसोईंनी सज्ज असें विमानतळ आशियांत दुसरे नसावे.

येथून मला बाली, सुमात्रा, बोर्नीओ इत्यादि पौर्वात्य द्वीपाना धांवती भेट द्यावयाची होती. आंतर्राष्ट्रीय विमान कंपन्यांची येथे पोच नसल्यामुळें स्थानिक 'गरूडा' या इंडोनेशियन विमान कंपनीकडे मी धांव घेतली. पण ही विमानें मोजकी, ठराविक दिवशी उडणारी व डकोटा जातीची लहान, लहानच आहेत. त्यामुळें ठराविक मुदतींत हा प्रवास आटोपणे मला शक्य दिसलें नाही. शिवाय या बाली द्विपकल्पातील भारतीय संस्कृतीने ओथंबिलेल्या ज्या अनेक मौजा मला अभ्यासावयाच्या होत्या त्याला निव्वळ धावती भेट देऊन कांही उपयोग नव्हता. म्हणून मी दुसऱ्या दिवशी मिळणाऱ्या बँकॉकच्याच विमानांत जागा मिळविली व कंपनीचा पाहुणा म्हणुन 'ओशानीया' हॉटेलांत एक दिवस पाहुणचार घेतला.

सिंगापूर हे हांगकांग सारखें अेक छोटेखानी बन्दर असून मॅले द्विपकल्पाचें दक्षिणेंचें टोक आणि इंग्रजाचे एक महत्वाचे व्यापारी व लष्करी केंद्र आहे. भारतात इंग्रजांचा अम्मल असतांता दिल्लीच्या व्हाइसरॉय मार्फतच सिंगापूरचा कारभार चालत असे. त्याकाळी स्थाईक झालेले कित्येक भारतीय अजुन येथे आहेत. मद्रासी पद्धतीच्या खाणावळी व हॉटेलें येथे असून भारतीय पद्धतीची मिठाई, पानाचे ठेलें सायकल रिक्षा वगैरे सारे कांहीं येथे दृष्टीस पडत होते.

बुधवारी ता. १६ जुनला दुपारी बाराला मी गरुडात आरूढ झालों व साडेचार वाजता बंगकॉकच्या हद्दीत पदार्पण केलें.

थायलंड हे पुर्णतया बौद्धधर्मी राज्य आहे. गुळगुळीत मुंडन करून पीतवस्त्र परिधान केलेले अनेक तरुण बुद्धभिक्षु हा येथील जीर्ण धार्मिक जीवनाचा अवशेष होय. वयात आलेल्या प्रत्यक तरूणाला सांसारिक भवचक्राच्या गोत्यांत स्वतःला गोवुन घेण्यापूर्वी कमीतकमी तीन महिने भिक्षुची दीक्षा घेऊन सर्वसंगपरित्याग अवस्थेचा अनुभव घ्यावा लागतो.

केंब्रीज-आक्सफोर्ड सारख्या उच्च विद्यालयोन शिक्षण घेऊन आलेले व विविध अधिकाराच्या जागी नोकरी करीत असलेले विज्ञान युगातील कित्येक तरुण, या बौद्धधर्मीय दीक्षायुक्त भिक्षूच्या आधुनिक आवरणांत भटकतांना पाहून मोठी मौज वाटते.

'असार जीवित केवळ माया' या त्यागवृत्तीनें प्रत्येक व्यक्तीने आपले आत्मनिरीक्षण करून विमोचन करीत राहिले नाही तर पृथ्वीवरील पापाचा घडा भरून प्रलयकाल समीप येण्यालां वेळ लागणार नाही, हा या बुद्धधर्माचा मुलमंत्र आहे.

अकरा लक्ष वस्तीचे बँकॉक, थायलंडच्या राजधानीचे शहर 'मेनाम चाओ फिया' या नदीच्या दोहो बाजूना वसलेले असून त्यांतून काढलेल्या लहान मोठ्या कालव्यांनी सारें शहर व्यापलेलें आहे.

पूर्वीच्या काळीं शहरांतील दळवळणाचें हेंच मुख्य साधन असें व आजहि ट्राम, रेल्वे, बसेंस, मोटार यांची रेलचेल वाढत असताना जवळपासच्या खेड्यांतून मचव्यांतून येणाऱ्या नित्योपयोगी वस्तूचा येथील नदीतच तरंगता बाजार भरतो. हा तरता बाजार येथील वैशिष्ठ्यांपैकी एक अभिनव दृश्य आहे

कांही राजमार्ग सोडल्यास येथील बहुतेक सडका अरुंद घाणेरड्या व वाढत्या दळणवळणाला अपुऱ्या पडत असल्यामुळें रहदारीच्या अडवणुकीचे भूत कोणाला कोठे किती वेळ अडवुन धरील हे सांगता येत नाहीं.

असें सांगतात कीं, तांदुळाचें अमाप पीक येथें विनासायास काढता येते, त्यामुळें उद्योग प्रियतेचा येथें अभाव असून शिक्षणहि बेताचेंच आहे.

आपण आपल्या परसात भाजीपाला काढूं म्हटले तर किती सायास करावे लागतात! पण येथे प्रत्येकाच्या आवारांत छोटे मोठे गड्डेकरून त्यांत सांचविलेल्या पाण्यांत बारोमास पिकणारे मासोळयांचे पीक घेण्यांत येते.

तेराव्या शतकांत चीनच्या यांगत्सी नदीच्या खोऱ्यांत वावरणारी ही थांय जमात पसरत पसरत हल्लीच्या थायलंडच्या अत्यत सुपीक अशा सखल भागांत उतरली. 'फा चाऊ यु थांग' या त्या काळच्या त्यांच्या राजानें अयुध्या येथ आपली राजधानी स्थापन करून त्यांच्या वंशजानें साडेचारशे वर्षे राज्य केलें. पुढें ब्रम्हदेशानें केलेल्या स्वाऱ्यावर स्वाऱ्यांनी ही आयुध्या नगरी बेचिराख झाली व आज त्याकाळच्या वैभवाचे हे अवशेष पाहण्याकरितां लोक मुद्दाम तेथें जात असतात.

१८७२ साली 'चाऊ फिया' यानें बर्मीज लोकांची हकालपट्टी करून 'चक्री' वंशाचे राज्य येथे स्थापन केले व तीच वशावळ आजतागायत येथे चालू आहे.

अलीकडे १९३२ साली राजा प्रजाधिपोक गादीवर असतांना सैन्याने केलेल्या उठावणीमुळे जी बंडाळी झाली त्यात पार्लमेंटरी पद्धतीचा अवलंब करणें भाग पडून आनंद मंहीडोल याला गादीवर बसविण्यांत आले. १९४६ साली या आनंद महीडोलचा त्याच्याच राजवाडयांत झालेल्या रहस्यमय अचानक मृत्यूचें कोडे अजून उलगडलेले नाही. 'फुमीफोल अदुलदेज' हे राजे आज तेथील गादीवर आहेत.

हे राजे बुद्धधर्मीय असले तरी त्यांचेवर हिंदु संस्कृतीचा पगडा किती जबर आहे हे येथे प्रत्यक्षांत पहातांना मला अनुनभूत आनंद होत होता.

हे पहा आम्ही आतां या भव्य राजवाडयाच्या आंगणांत उभे आहोत. युरोपियन पोषाखांतील स्त्री पुरूषांना येथें नेकटाय, कोट, पूर्ण लांब झगे अशा व्यवस्थित पोषाखांत असले तरच प्रवेश मिळतो. तसेच आंत फिरतांना कॅमेरे बाळगण्याचीहि मनाई असते.

भरगच्च नक्षीचे व एकावर एक उतरत्या छपराचे हे या राजप्रासादाचे तीन भाग एका ओळींत दिसत आहेत. मधल्या मुख्य भागासमोर हे बघा राजसिंहासन आहे. येथें नव्या राजाला राज्याभिषेक होतो. हा डाव्या बाजूचा महाल, यांत हे बघा सुवर्णमंडीत दुसरें एक भव्य सिंहासन असून यावर बसून राज्याभिषेकाचे कांहीं विधीं होत असतात. या उजव्या भागांतल्या प्रासादांत राजाचा मृतदेह नागरिकांच्या दर्शनार्थ ठेविण्याची ही बघा खास जागा !

आणि हा अलीकडे एक छोटासा प्रासाद दिसतो तेथें राजपुत्राचे हिंदु पद्धतीनें प्रथम केशकर्तन, हिंदु पुरोहितांच्या मंत्रोच्चारांत विशिष्ट थाटामाटांत करण्यांत येते. प्रत्येक प्रासादावर द्वाररक्षक म्हणून हात जोडून उभ्या केलेल्या या बघा विचित्र व प्रचंड मूर्ति, येथे जागोजागी आहेत.

तेथून आम्ही 'वाटपो' व 'वाट फ्रा केबो' हीं दोन बुद्धमंदीरे पहाण्यास गेलो.

---

# स्वगृही आगमन

## ( चतुर्विंशति खंड )

" नर ऐसी करणी करे तो नर का नारायण हो जाय "

---

आतां मातृभूमी माझ्या दृष्टीपथांत येऊं लागली होती. बॅन्कॉक वरून रंगून व रंगूनहुन कलकत्ता. दोन तास रंगूनला पोचायला आणि तेथून अवघ्या सव्वा तासांत कलकत्ता.

सान्या जगाची सफर! किति प्रदीर्घ प्रवास केला होता मी! जणु पृथ्वी खरोखरच गोल आहे किंवा नाही याचा सप्रयोग पडताळा घ्यायलाच निघालों होतो मी.

लांबच्या प्रवासाहून परत येताना आपले घर जसजसे जवळ येऊ लागते तसतसे घरी पोचण्याकरीता आपले पाय ओढ घेऊं लागतात· आणि संपत आलेले हे जवळचे अंतर, किती दूर आहे ! उद्या संपायचे ते आजच कां नाहीं संपत! असेंहि वाटायला लागते.

अशा मन:स्थितीत बॅकॉकच्या त्या प्रचंड बौद्ध मंदीरांतून मी फिरत होतो. "हे मंदीर चक्री वंशातींल पहिला राजा 'राम' याने बांधले, तर अमक्या मंदिराला इतके कोट रूपये लागले, किंवा अमूक मंदिराचे तें अवाढव्य काम कित्येक वर्षें चालले होते." वगैरे वर्णन दुभाषा सांगून आमच्या औत्सुक्याला गौरवीत होता.

त्या बिचान्या गौतम बुद्धाचे सोन्यांत, रूप्यांत, माणकांत, मोत्यांत काय वाटेल त्यांत रूपांतर केलेलें आहे त्याच्या भक्तांनीं. हे एमरल्ड

बुद्धाचे मंदीर केवढे अवाढव्य ! आपल्या भारतांत दक्षिणेकडे कशी गोपूरे आहेत, बस तशीच कांहिशी. पण गोपूरांच्या कलात्मक स्थापत्याची ही येथील मंदीरे बरोबरी करूंच शकणार नाहीत.

गौतम बुद्ध हा एक माणूस होता. पण 'नर ऐसी करणी करे तो नर का नारायण हो जाय' या उक्तीप्रमाणे त्याची करणी अशी होती कीं त्याला देवपण आले. गौतम, माणसातला हीरा होता, त्याने आपल्या करणीने मनुष्यदेहाच सोन करून घेतल.

बस, याच भावना प्रत्यक्षात व्यक्त करून येवढ्या मोठ्या थोर विभूतीचे व्यक्तीमत्त्व व आदर्श, सदोदीत समोर ठेविण्याच्या उद्देशानें बुद्धाची मंदीरे बाधल्या गेली असावीत. आणि त्याच्या अशा या प्रत्यक्ष सोन्याच्या, हीऱ्याच्या मुर्ती तयार झाल्या असाव्यात.

या मंदिरातली ही बुद्धाची मुर्ती अर्धपारदशक 'जास्पर' जातीच्या हिऱ्याची घडविलेली असून तिची उंची साठ सेंटीमिटर इतकी आहे

या मंदिराच्या परकोटवजा ऊंच ऊंच भिंतीवर कवले घालून आतल्या बाजूंना एक सारख्या ओसऱ्या काढलेल्या आहेत. आणि या भिंतीवर प्रचंड मूर्तींनी व्यापलेली ही पहा भडक रंगाची चित्रावली. गौतमानें बौद्धधर्म स्थापन केला. पण त्याचे रक्त हिंदूचे होते. त्याची व त्याच्या सप्त सागरावर प्रभाव पाडणाऱ्या धर्माची पैदास भारतात झालेली होती.

असे हे हिंदुत्वाचे संस्कार जेथें जेथे त्याचा बुद्ध धर्म गेला तेथे कायम असल्याचा जणू प्रत्यक्ष पुरावा म्हणूनच कीं काय, या मंदिराच्या या चित्रावलींतून भारतभूषण श्रीरामचंद्रप्रभुचे उदात्त चरित्र ग्रथीत केलेले दिसते.

हे पहिलेच चित्र पहा. हा पहा भाग्यवान शेतकरी. शेत नांगरत असताना, त्याच्या फाळाला लागून एका रत्नजडित पेटीचे झाकण उखडल्या गेले. आणि त्यात असलेल्या सुंदर युवतीच्या लावण्यप्रभेनें तो कसा स्तिमित झाला. ही सिताजन्माची कहाणी किति हुबेहुब चितारलेली आहे.

अशी एकापेक्षाएक सरस बोलकी चित्रे काढून सारेच्यासारे रामायण येथे कायमचे उध्रृत केलेलें पाहण्यास मिळते. रामायणाचे थाई भाषेत 'रामाकीन' व सितेंचे 'सीदा' असे नामकरण झालेलें आहे.

याशिवाय या ओवऱ्यांना असलेल्या प्रत्येक प्रवेशद्वारावर राम कथेतील भयानक राक्षसांच्या प्रचंड कोरीव मूर्ति जोडी जोडीनें उभारलेल्या आहेत.

याहीशिवाय जागोजागी आक्राळ विक्राळ सिंहाच्या व पंजांत पकडलेल्या सर्पासहीत गरूडाच्या मूर्ती विखुरलेल्या दिसतात. आणि गरूडावर आरूढ झालेल्या विष्णुच्या मूर्तीहि आधून मधून आहेतच.

एकसंधी हिऱ्यातून कोरलेल्या बुद्धाचे हे मध्यवर्ती मंदीर असून विशीष्ठ थाई कलाकुसरीनें ओतप्रोत भरलेले आहे. हातभर उंचीच्या या चंद्रगौरी सारखी नेत्रदीपक मूर्तीची स्थापना एका उंच नखशिखांत कोरीव चबुऱ्यावर केलेली असून त्यावर हे बघा, चकचकीत सूवर्णछत्र झळकत आहे.

आणि काय मौज पहा ! तेवढ्या त्या मूर्तीवरच पाडण्यांत आलेल्या प्रकाशकिरणांची योजना अपूर्व अशी आहे.

या मूर्तीची अशी दंतकथा सांगतात की ही मूर्ती नागसेन नावाच्या एका भारतीय भिक्षूला देवाधिदेव इंद्राने प्रसन्न होऊन प्रदान केली. तेथून ती हस्तांतर करीत करीत सिलोनमार्गे चिंगराईला आली व शेवटी ती या चक्री राजघराण्याचा सस्थापक, पहिला रामराजा याच्या हातात पडली व त्याने तिची, हे मदीर बांधून येथें स्थापना केली.

दुसरे, येथील राजवाड्याच्या दक्षिणेला असलेले हे भव्य मंदीर, उजव्या हातावर मस्तक ठेवून निद्रीस्थ अशा, निर्वाण स्थितीत पोचलेल्या बुद्धदेवाचे आहें. ही जवळजवळ तीस फूट लांबीची प्रचंड मूर्ती सूवर्णमय असून त्याच्या पदयुगुलावर शिंपल्यामध्ये 'धम्मचक्र' (नितीनियमनचक्र) घडविलेले आहे.

अशा या दोन अतीपवित्र मानलेल्या बुद्ध मंदीराशिवाय या प्रदेशांत बुद्ध मंदीरांचा व्याप फार मोठा आहे. प्रत्येक मदीरांत मुख्य मूर्तीशिवाय बुद्धाच्या ध्यानस्थ बसलेल्या इतक्या विविध मूर्ती असतात की कांहीं सोय नाही.

अशा या अध्यात्मवादाने व्यापलेल्या मानवी प्रदेशात मानसिक उन्नतिबरोबर शारीरिक विकासालाहि कसे महत्व प्राप्त झाले आहे ते पाहण्यासारखें आहे.

येथील नॅशनल असेंब्लीसमोरून गेलेल्या राजदमन या राजमार्गाने गेले म्हणजे डावीकडे एक शटकोनी भव्य इमारत दिसते. ही येथील प्रसिद्ध बाक्सीगची जागा आहे. आठवडयातून दोन दिवस येथे चुरशीनें बाक्सीगचे सामने नित्य चालू असतात.

माझ्या या मुक्कामात एक असा सामना पहाण्याचा योग मला लाभला तिकिटाच्या अभावी हजारो प्रेक्षक हारजीतीचे निर्णय उत्सुकतेनें जाणून घेण्यासाठी बाहेर गर्दीगर्दीने उभे होते वरच्या श्रेणीचे एक तिकीट मला मिळाले व मी रींगच्या जवळ आसपास माडलेल्या खुर्चीवर जाऊन बसलो. तेथील त्या तीन मजली गॅलऱ्या जागच्या जागी उसळया मारणाऱ्या प्रेक्षकानी चिकार भरल्या होत्या.

या चुरशीच्या सामन्यात भाग घेण्याकरीता नामवंत खेळाडू थायलडच्या दूरदूरच्या प्रांतातून अहमहमीकेनें येत असतात.

आपल्या येथेहि बॉक्सीग आज थोडेफार प्रचारात आलेले आहे. पण ही सारी पाश्चिमात्य पद्धती म्हणून आपण ओळखतो. थायलंडची पद्धती, कुस्तीतील फ्री स्टाईल सारखी असून खेळाडू बेछूटपणे रक्ताची रगपचमी खेळताना पाहून प्रेक्षक थरारून जातात.

'मारेन किवा मरेन' या दृढ निश्चयाने रिंगणात उतरलेले खेळाडू निमाज पद्धतीने समोरासमोर बसतात व बरेच हातवारे करून एकमेकाशी सलामी घेतात. आणि मग जे परस्पर तुटून पडतात ते, बुटाच्या लाथा झाडण्यापासून तो एकमेकाची आपटून आपटून डोके फोडण्यापर्यंत काय वाटेल ते प्रकार प्रतिपक्षाला नामोहरम करण्यासाठी उपयोगात आणतात. कुणाचे रक्त सांडल्याशिवाय एकहि जोड सुटलेला त्या दिवशी मी पाहिला नाही. आणि मौज ही की कोबडयाच्या झुन्जीमारखी, अगातून रक्त साडत

असतांना एक, दोन, तीन, दहा म्हणण्याच्यां आंत, तो पठ्ठा चिडून धावत जाऊन दुसऱ्याची मानगुटी धरण्याला आवेषानें पुढे येतो.

बँकॉक येथे उत्तर हिंदुस्थानी भय्यांची संख्या लक्षांत भरण्यासारखी आहे. कोणत्याहि मोठ्या कचेरीत, दरवान म्हणून हे भय्याजी आपल्याला भेटून जयरामजी करतील. शिवाय यांनी म्हशी बाळगून येथील दूधाचा धंदा आपल्या हातांत ठेविलेला आहे.

गेल्या महायुद्धांतील भयानक प्रसंग, हे डोळ्यांत पाणी आणून सांगतात. तसेच सुभाषबाबूच्या शौर्याची वर्णनें व त्याच्या त्या काळच्या धडाडीच्या गोष्टी सांगतांना त्यांची अंतःकरणें उचंबळून येतात.

आणखी दोन भारतीयाशी माझी येथे गाठ पडली. एक पुण्याचे अभ्यकर नावाचे गृहस्थ इथल्या 'एकाफे' (ECAFE) मध्ये नोकरीला आहेत. युनायटेड नेशनसचे या आशियाकरता उभारलेल्या एकानॉमिक कमीशनचे मध्यवर्ती केंद्र बॅन्कॉकला असल्यामुळे आशियातील निरनिराळ्या देशाचे कार्यकर्ते येथे नोकरीच्या निमित्ताने रहात आहेत.

दुसरे गृहस्थ वसंत एस. पडबिद्री. हे ट्वेंटीएथ् सेंचरी फॉक्स या बोलपट वितरण कंपनीचे मॅनेजर म्हणून येथे आहेत. ते रोटेरीयन असल्यामुळें त्यांची बँगकॉक रोटरीच्या सभेत माझी गाठ पडली.

रविवारी ता. २० जुनला दुपारी मी या पूर्वेकडील व्हेनीस म्हणून प्रसिद्ध असलेल्या शहराचा निरोप घेतला व पहाता पहाता रंगून गाठले.

रंगून ही ब्रम्हदेशाची राजधानी, एकेकाळी निटस् व सुंदर शहर म्हणून प्रसिद्ध होती. पण आज सर्वच अवकळा आलेली स्पष्ट दिसत आहे. हे आपले शेजारी राष्ट्र भारतीयांना येथे कांहि तोटा नाही.

सिंगापूरपासून तो थेट रंगूनपर्यंत साऱ्या स्त्री–पुरूषांचा तो लुंगीवजा पेहेराव विचित्रच वाटतो. पण स्त्रियांची डोक्याच्या माथ्यावर गुंडाळी करून ऋषीमुनीसारखी बांधलेली वेषभूषा मात्र विलोभनीय दिसते.

माझ्या रंगून येथील अवघ्या एका दिवसाच्या मुक्कामांत मी दोन प्रमुख तेवढ्या गोष्टी पाहील्या.

एक रंगूनचा तो पुराणप्रसीद्ध श्वेतड्रेगन पॅगोडा व दुसरा थाकीन नू या तेथील प्रधानमंत्री महोदयानें कांही कोटी रुपये खर्च करून नुकताच बांधलेला विश्वशाति पॅगोडा.

बॅन्कॉकला बुद्धाला मंदीरात स्थान मिळालें, तर येथे, बुद्धाच्या अवशेषावर उभारलेल्या स्तुपाच्या आवतीभोवती जागा सापडेल तेथें त्यांच्या अगणीत मूर्ती मांडण्यांत आलेल्या आहेत.

रंगून शहरापासून या दोन्ही पॅगोडाला जाण्याकरीता बसेस आहेत. या श्वेत ड्रेगन पॅगोडाचा सुवर्णकळस फार लांबून दिसतो. तो शहरापासून दोन मैल अतरावर आहे, तर थाकीन नूचा विश्वशांती पॅगोडा सात आठ मैलावर आहे

येथील बसेसची एक पद्धत मोठी मजेशीर आहे. निरनिराळ्या मार्गांच्या बसेस अज्ञ जनतेला चटकन ओळखता याव्या म्हणून त्यावर हत्ती, घोडा, मोर अशी चित्रे लाविली असून, अमक्या ठिकाणी जावयाचे आहेना? मग हत्तीच्या बसने जा, ती थेट आपल्याला तेथे नेवून सोडील, असे सांगण्यात येते.

मी घोडाछाप बसने श्वेतड्रेगन पॅगोडाला आलो. एका छोट्या टेकडीवर हा पॅगोडा असून त्याला चढण्याकरिता शभरवर पायऱ्या आहेत. या पायऱ्यांच्या दुतर्फा पुजा साहित्याची दुकानें व भावनेवर व्यापार करणारी चित्रे, मूर्ती वगैरेची दुकानांची तोबा गर्दी उडालेली आहे

वर गेल्यानंतर शेसवाशे फूट लाब अफाट पसरलेला गोल स्तूप एकदम निमुळता होत उचच उंच वर गेला असून त्यावर अती प्रचंड असा सुवर्ण कळस आहे. भोवताल लहान मोठी मंदीरे असून त्यांत व स्तुपाला लागून असंख्य बुद्धमुर्ती स्थापिलेल्या आहेत. पुजेचे प्रकार तर थेट आपल्यासारखेच दिसले. धूप, दीप, पुष्प, अभिषेक वगैरे सारे कांहीं प्रकार तेथे आहेत.

या स्तुपाच्या प्रशस्त प्रांगणांत बारीक बारीक हिऱ्यामाणकांचा सडा पडतो अशी भावना असल्यामुळें तेथे वावरणाऱ्या भक्तजनाची कांकनजर, नेममी प्रत्येक पावला गणीक, खाली खिळलेली असते.

येथून पुढें हत्ती छाप बसने मी विश्वशाति पॅगोडा पहाण्यास गेलो विश्वशाति पॅगोडा म्हणजे एक आधुनिक नवलच आहे.

बाहेरून पहातां तेथे एक छोटी टेकडी निर्माण केल्यासारखी दिसते. कांक्रीटच्या ओबडधोबड पहाडाला चोहिबाजूनी भुयारासारख्या चार वाटा ठेविल्या आहेत.

या वाटांनी आत प्रवेश केला की आंत एक भव्य हॉल असून समोरच्या तिन्ही बाजूनी त्यांत पायरी पायरीच्या गॅलऱ्या काढल्या आहेत. या गॅलऱ्यावर एकाच वेळी शेकडो बुद्ध भिक्षू बसून प्रत्येकांच्या समोर ठेवीलेल्या डेस्कवर असलेल्या पोथ्या वाचून हे भिक्षू एका आवाजांत मंत्रोच्चार करीत असतात. हजारोनी प्रेक्षक आंत समोरच्या भागांत बसून हा प्रयोग ऐकत व पाहात असतात.

अशा या शातिसभा येंथे नेहमीच तीन दिवस, सात दिवस अशा अव्याहत चालु असतात. थाकिन नू यांच्या कल्पनेप्रमाणे अशा या अध्यात्मिक पद्धतीनें विश्वात शाति प्रस्थापित होणार आहे.

बाहेर यात्रें सारखें स्वरूप येत चालले असून दूकानें,पाठशाळा प्रदर्शनें, शैक्षणिक कार्यक्रम वगैरे सारख्या गोष्टीची येथे सारखी भर पडत आहे.

आज मंगळवार ता. २२ जून. भारतात जाणाऱ्या एअर इंडीयाच्या डेकोटा मध्यें मी जागा मिळविली. काल पासून स्वप्नात मला मातृभूमी शिवाय काहीच दिसत नव्हते. बारा पचेचाळीसला निघालेलें विमान अवघें दोनलाच डमडम विमान तळावर पोचले आणि परमप्रीय अशा मातृभूमिला माझें पुन्हा एकदा पाय लागले.

---

# 'माझी पृथ्वी प्रदक्षिणा' या पृथ्वीगोलाच्या सफरीचा नकाशा




पृथ्वीचा संपूर्ण परीघ–मैल २५,१४३.

| प्रवासांतील विभागीय अंतर | = | सरासरी मैल |
|---|---|---|
| मुंबई–लंडन | = | ५,८०० |
| लंडन–न्यूयार्क | = | ३,८०० |
| न्युयार्क–सॅनफ्रॅंसिस्को | = | ४,००० |
| सॅनफ्रॅंसिस्को–टोकियो | = | ६,६७५ |
| टोकियो–हाँगकाँग | = | १,७८७ |
| हाँगकाँग–मॅनीला | = | ६९९ |
| मॅनीला–सिंगापूर | = | १,४९० |
| सिंगापूर–बॅंकाक | = | १,१८१ |
| बॅंकाक–रंगून | = | ३६२ |
| रंगून–कलकत्ता | = | ६३८ |
| कलकत्ता–मुबई | = | १,१०० |
| एकूण प्रवास मैल | = | २७,५३२ |



सॅन्फ्रान्सिस्को येथील स्फुर्तीदायक पुतळा.